# अमेरिका

(भाग पहिला)

## वसाहतींची स्थापना आणि स्वातंत्र्य-युद्ध.

लेखक- गुरुनाथ प्रभाकर ओगले.





जॉर्ज वॉशिंगटनचें अध्यक्षपदारोहण.

पान २३३

# अमेरिका

( भाग पहिला )

## वसाहतींची स्थापना आणि स्वातंत्र्ययुद्ध.



लेखक व प्रकाशक

गुरुनाथ प्रभाकर ओगले, एल्. एम्. ई.

ओगलेवाडी, सं. औंध.



१९३२



किंमत दोन रुपये.

# – निवेदन –



अमेरिकेसंबंधी भरपूर माहिती देणारे पुस्तक मराठी भाषेत नाही असे आढळून आल्यामुळे लेखकाने हा प्रयत्न केला आहे. शिक्षणाकरितां अमेरिकेंत राहण्याचा सुयोग आला, तेव्हा, तेथील विचार, राहणी व काम करण्याची तडफ यांच्या योगाने प्रेरित होऊन आपल्या बांधवांस या विषयासंबधीं कांही माहिती द्यावी अशी इच्छा उत्पन्न झाली. परंतु व्यवसाय निराळा पडल्यामुळे, ते काम मागे पडलें. नुकत्याच प्रसिद्ध केलेल्या 'एडिसन' या पुस्तकाबद्दल महाराष्ट्रवाचकांकडून प्रोत्साहन मिळाल्यामुळे, हे काम हातीं घेण्यास धीर आला. वास्तविक लेखनव्यवसायांत अधिक तपश्चर्या केलेल्या माणसानें हा विषय हातीं घ्यावयास पाहिजे होता. प्रस्तुत प्रयत्न अपुरा वाटून जर कोणी अधिकारी माणसाने हा विषय फिरून हातीं घेऊन त्यावर अधिक प्रकाश पाडला तर लेखकास त्याबद्दल धन्यताच वाटेल.

या पुस्तकांत वसाहतींच्या स्थापनेपासून जॉर्ज वॉशिंगटनचे अध्यक्षपदारोहणापर्यंत, कथाभाग आलेला आहे. पुढील भागांत सिव्हिल वॉर म्हणजे आपसांतील यादवीचा शेवट, इतका मजकूर येईल, व तिसरे भागांत अर्वाचीन अमेरिकेवर माहिती देण्यांत येईल.

या पुस्तकास श्री. काशिनाथ नरसिंह केळकर, हिंदुव्यवहार धर्मशास्त्राचे विद्वान् लेखक यांनीं प्रस्तावना लिहून लेखकास उपकृत करून ठेविले आहे. तसेंच 'किर्लोस्कर' मासिकाचे आर्ट डिपार्टमेंटनें उत्कृष्ट ब्लॉक करून दिले, श्रीयुत वाग्भट नारायण देशपांडे बी. ए. एल् एल्. बी. यांनीं उपयुक्त सूचना करून व श्रीयुत सदाशिव कृष्ण जोशी, बी. ए. एल् एल्. बी., यांनीं छपाईचें कामही लवकर करून दिले, याबद्दल या मित्रवर्गाचा लेखक फार आभारी आहे.

ओगलेवाडी
१ सप्टेंबर १९३२ } **गुरुनाथ प्रभाकर ओगले.**



# अनुक्रमणिका

# चित्रानुक्रम

# प्रस्तावना

माझे स्नेही श्रीयुत गुरुनाथ प्रभाकर ओगले यांनी प्रस्तुत पुस्तकास प्रस्तावना लिहिण्याची मला विनंति केली ती मी थोड्या संकोचानेच मान्य केली. अमेरिकन स्वातंत्र्याचा इतिहास मी कॉलेजमध्ये असताना ग्रीनच्या इतिहासातून व इतर पुस्तकामधून मोठ्या आवडीने वाचला होता त्यावेळी मनात उद्भूत झालेल्या भावनाची माझी आठवण अद्याप ताजी आहे. तथापि या पुस्तकास माझ्यासारख्या केवळ एकाद्या इतिहासप्रेमी लेखकाने प्रस्तावना लिहिण्यापेक्षा हे काम इतिहास व राजकारण याचा व्यासंग असलेल्या कोणा माणसाचे हातून होते तर ते अधिक सरस झाले असते अशी माझी भावना आहे प्रस्तुत ग्रंथात अमेरिकन लोकांची संस्कृति इतिहास व त्यांनी स्थापलेले स्वराज्य याचा मनोरम इतिहास आला आहे पण त्यापेक्षाहि, हे पुस्तक वाचून हिंदी वाचकाच्या हल्लीच्या राजकीय मनोभूमिकेवर जो एक उद्बोधक परिणाम होतो तेच माझ्या मताने या ग्रंथाचे वैशिष्ट्य किंवा मर्म आहे. व त्या दृष्टीने प्रस्तावना लिहिण्याला अधिकारी अशा एक दोघा व्यक्तींची नांवे मी ग्रंथकर्त्यास सुचविलीहि. तथापि अखेर ' हे काम मीच करावे ' असें ग्रंथकर्त्याने स्नेहाच्या हक्काने ' ठरवून ' टाकल्यामुळे मी यथामति प्रस्तावनेचे चार शब्द लिहित आहे. अर्थात् या निमित्ताने का होईना पण अमेरिकेविषयी आणखी काही पुस्तके वाचण्याचा मला योग आला याबद्दल ग्रंथकर्त्यांचे आभारच मानले पाहिजेत. असो.

हिंदुस्थानचा व अमेरिकेचा संबंध काय ? हा प्रश्न कोणाहि वाचकाने स्वतःस विचारला तर त्याचे मनात साम्यापेक्षा वैधर्म्याचीच प्रतीति अधिक येईल ' भौगोलिक दृष्ट्या पाहिले तर अमेरिका ही हिंदुस्थानची ' पाताल भूमि ' आहे आधिभौतिक सत्ता व सुधारणा या दृष्टीने पाहिले तर, हिंदुस्थानच रसातळास गेले आहे हे कोणीहि कबूल करील !

आज हिंदुस्थान सुवर्णभूमी नसून ' सोन्याचा धूर ' अमेरिकेत दृष्टीस पडत आहे ! हिंदुस्थानात पारतंत्र्याची रात्र पडली आहे; तर अमेरिकेवर स्वातंत्र्याचा भाग्यरवि उगवला आहे ! इकडे हिंदुस्थानात दारिद्रय व दु:ख याचे निखारे पिचत आहेत तर तिकडे अमेरिकेत कुबेराला देखील कर्ज देतील असे नवकोटनारायण न्यूयॉर्कसारख्या शहरातून वास्तव्य करीत आहेत हल्लीच्या काळी जगातील सर्व संपत्तीचा प्रवाह सहस्त्रार्जुनाप्रमाणे अमेरिकेने अडवून धरिला आहे इतकेच नव्हे तर, गल्या महायुद्धाच्यापायी झालेल्या कर्जाने बेजार होऊन इंग्लंड फ्रान्स जर्मनी वगैरे युरोपियन राष्ट्रे कर्जात तहकुबी अगर सूट मागण्याकरिता अमेरिकेच्या पाया लोळण घेत आहेत हे पाहिले म्हणजे, आज सर्व जगाचे भवितव्य एका अमेरिकेने कसे आपल्या मुठीत सामाविले आहे ते प्रत्ययाला येते ! विहंगम दृष्टीने कोणी हिंदुस्थानाकडे पाहील तर त्याला जिकडे तिकडे खेडीच खेडी दृष्टीस पडून, एकीकडे वन्य वनश्री नयनाला आल्हादवीत असता दुसरीकडे मनात असा आचंब्याने उद्गार निघेल की " काय हे हिंदी लोक! व काय यांची राहणी पाहा ! भौतिक सुधारणेचा उदय जगात झाला की अजून तो व्हावयास एकदोन शतके अवधि आहे ? " पण तेच अमेरिकेकडे पाहा. त्यांतील सुधारलेले लोक, साठसाठ मजल्याच्या गगनचुंबी इमारती, जगाचा व्यापार हादरविणारे प्रचंड कारखाने, पंचमहाभूताचे आक्रमण करणारी भौतिक सुधारणा इत्यादि पाहिले म्हणजे, आधिभौतिक सुधारणेचे अमेरिकेने अगदी शिखर गाठले आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय वाटत नाही ! अर्थात् कोण कोठे अमेरिका व कोठे हिंदुस्थान !! त्याच्या भाग्यात दक्षिणोत्तर ध्रुवाइतके अंतर. त्याची तुलना तरी करावयाचे कोण मनांत आणील ?

पण ' इतिहास ' हा मनुष्यजातीचा असा एक जिवलग मित्र आहे की संकटकाळी धीर खचला असता मनुष्याचे पुढे ' ऐतिहासिक ज्ञाना'चा त्रिकालदर्शी आरसा उभा करितो. त्यांत ' ऐतिहासिक ज्ञान ' ही एक दिव्यदृष्टि त्याला लाभते व नंतर तोच मनाच्या पहिल्या परिप्रश्नास प्रत्युत्तर देतो की " होय. आज आम्ही पाताळात व अमेरिका स्वर्गास भिडलेली

असेल! पण हे सर्व स्थित्यंतर गेल्या किती शतकांतलें आहे? दोन अडीचशें वर्षापेक्षां याला अधिक काळ गेला नाही! दोन शतकांपूर्वी इंग्लंड हे किती कंगाल होते व पाटणा मुर्शिदाबाद वगैरे शहरांचे वैभव तत्कालीन लंडनपेक्षांहि कसे आधेक संपन्न होते हे क्लाइव्हसारख्या समकालीन इंग्रज लोकांनीच लिहून ठेविले आहे ह्मणून बरें! तीच बोटे घेऊन विपर्यास करणाऱ्या इंग्रजांच्या डोळ्यांत घालतां येतात. जपानला साठ वर्षापूर्वी स्वत चे असें एकहि दर्यावर्दी जहाज नव्हते की कारखाना नव्हता हे कोणास सांगून खरेंहि वाटणार नाही पण आज 'पश्चिमेस अमेरिका तर पूर्वेस जपान' इतकी प्रचंड सत्ता व इभ्रत या चिमुकल्या राष्ट्राने अवघ्या साठ वर्षात पैदा केली. हे ऐतिहासिक ज्ञानच मनुष्याच्या मनांत महत्वाकांक्षा उत्पन्न करिते. अमेरिकन लोकांनी इंग्रजांसारख्याशीं झगडा करून साम्राज्यापासून आपले स्वातंत्र्य मान्य करवून घेतले! या दृष्टीने आज स्वराज्याची पाउलवाट चालणाऱ्या हिंदी राष्ट्रास अमेरिकेच्या इतिहासापासून पुष्कळ गोष्टी शिकण्यासारख्या आहेत. One touch of nature makes the whole world kin—अशी जी इंग्रजीत ह्मण आहे ती स्वातंत्र्यभावनेचे बाबतींत अगदी खरी आहे. अमेरिकेचा इतिहास वाचतांना, आपण आपल्याच देशाचा इतिहास वाचत आहो काय अशी क्षणभर अद्वैताची भावना मनांत येते; व त्याचे प्रत्यंतर वाचकांना हे पुस्तक वाचीत असता ठिकठिकाणी आढळून येईल.

प्रस्तुत पुस्तकांत अमेरिकेमध्ये निरनिराळ्या युरोपियन राष्ट्रांनी चौदाव्या शतकांत वसाहत केल्यापासून तों सतराव्या शतकाअखेर त्यांनीं 'अमेरिका हाच आपला **स्वदेश**' असे मानून स्वातंत्र्य स्थापन केले येथपर्यंत हकीगत आली आहे. स्वराज्य अगर स्वातंत्र्य हाच सर्व उत्कर्षाचा पाया होय. अर्थात् ते स्वराज्य हस्तगत झाल्यानंतर अमेरिकेमध्यें सामाजिक राजकीय धार्मिक स्थित्यंतर कसें झाले, भौतिक सुधारणेचा परिस हातीं लागून विसाव्या शतकाच्या ' चमत्कार युगांत ' केवढी क्रांति घडून आली ही रम्य नवलकथा पुढील खंडात येणार आहे; तथापि या खंडांत

आलेल्या कांही गोष्टी 'इतिहास' या दृष्टीने वाचकांस फार बोधप्रद व मनोरंजक वाटतील. उदाहरणार्थ, अमेरिकेचा शोध लावणारे दर्यावर्दी वस्तुतः हिंदुस्थानास येण्याकरितां निघाले होते. अमेरिकेलाच त्यांनी इंडीज हे नांव दिले व आपण हिंदुस्थानचाच शोध लावला ही कल्पना कोलंबसाचे डोक्यांतून मरेपर्यंत गेली नाहीं! युरोपांतील त्यावेळची कंगाल राष्ट्रे संपत्ती-करितां इतकी हावरी झाली होती कीं वसाहती करणे हा तत्कालीन धंद्यापैकी एक प्रतिष्ठित धंदा झाला होता. टोळधाड यावी त्याप्रमाणे अमेरिकेच्या किनाऱ्यावर प्रथम स्पॅनिश आले, पोर्तुगीज आले, फ्रेंच आले, इंग्रज आले, डच आले, असे करितां करिता ज्या देशी इंडियन लोकांनी त्याचा पाहुणचार व आतिथ्य करून देशात येऊं दिले त्याना या विदेशी चांचे लोकांनीं नुसते परतंत्र केले इतकेच नव्हे तर, तेथील सर्व रेड इंडियन (देशी अमेरिकन) लोकाची 'मृगया' करून त्यांचा निपात केला! 'मूळ या लोकांची संख्या किती कोटी असेल ते एक परमेश्वर जाणे! आज त्यातले फक्त अडीच लक्ष लोकच उरले आहेत!'" असा अंगावर कांटा आणणारा उल्लेख लजपतरायाच्या पुस्तकात सापडतो. आज तीनशे वर्षानंतरहि तेथील इंडियन लोकाच्या स्मरणांतून ही गोष्ट गेलेली नाहीं. व इंग्रजी शब्द ऐकला की त्यांचे कपाळास आढी चढते! "मित्रहो, परस्पर विश्वासाच्या प्रशस्त भूमीवर आपण उभे आहो. इंडियन लोक या देशाचे मालक आहेत ही गोष्ट विसरूं नका" हा विल्यम पेन या थोर क्वेकर पुढाऱ्याने केलेला उपदेश फुकट गेला. Ingratitude! Thy name is man हें वाक्य खोटें कसें होईल?

मुदतबंदी मजुरांची पद्धति व गुलामगिरी ही दुसरी एक गोष्ट अमेरिकेच्या इतिहासांत आलेली आहे तिचा निर्देश मुद्दाम केला पाहिजे 'स्वातंत्र्य! गुलामगिरीचा नाश!" असे ख्रिस्त-धर्मानुयायी (?) युरोपियन राष्ट्रे आज घरादारांच्या छपरावर उभे राहून जगास कितीहि कंठरवानें सांगत असलीं तरी, मनुष्यजातीच्या रक्तानें माखलेली इतिहासाचीं पानें वेगळी साक्ष देत आहेत! "जग म्हणजे केवळ युरोपखंड,

व मनुष्यजात म्हणजे गोरे लोक " अशी युरोपियन लोकांच्या भूतदयेची व्याख्या ना. गोखले हे विनोदाने वर्णन करीत. विकृत इतिहासाच्या वडाची साल स्वार्थबुद्धीनें राजकारणाच्या पिपळास चिकटवितांना टाईम्ससारखी वर्तमानपत्र हिंदु धर्मातील अस्पृश्याच्या 'गुलामगिरीची' पाल्हाळिक वर्णने करीत असतात ! पण " ख्रिस्ती धर्माचा उदय होण्यापूर्वी रोमन अगर आर्य राष्ट्रात ज्या प्रकारची गुलामगिरी चालत होती तिचे स्वरूप अगदी वेगळे होतें ! पण नंतर ख्रिस्ती राष्ट्रांनी रूढ केलेली गुलामगिरी इतकी अघोरी भयानक व राक्षसी होती की पूर्वीची गुलामाची पद्धति तुलनेमध्ये या दुसरीच्या पासंगालाहि येणार नाही " असे जोसेफ मॅकेब, चपमन कोहेन, इत्यादि पाश्चात्य ग्रंथकारांनीच स्वच्छ म्हटले आहे. ब्रेस, लेकी, इनग्रॅम याचे इतिहासग्रंथ काढून पाहिले तर, ख्रिस्ती धर्माला व माणुसकीलाहि या राष्ट्रांनी कलंक लावल्याबद्दल या इतिहास-लेखकानीं पदोपदीं धिक्कारच केला आहे. आफ्रिकेतून झडप घालून माणसे पळवून आणीत आणि ज्या जहाजातून ती अमेरिकेच्या किनाऱ्यावर येत त्याचे नाव " जीजस ख्राइस्ट " असे होतें ! ! खुद्द इंग्लंडच्या एलिझाबेथ राणीच्या मालकीचे हे जहाज होते " पूर्वी आफ्रिकेत गुलामगिरी नव्हती, ख्रिस्ती राष्ट्रांनीच ती तेथे प्रथम सुरू केली " असे ऑफ्रिकेतील प्रवासी लीव्हिंगस्टन याने लिहून ठेविले आहे. १७१३ साली स्पेनपासून तहान्वयें निग्रो गुलामांचा व्यापार करण्याची सनद इंग्लंडने तीस वर्षाच्या करारानें घेतली. दरसाल २५००० गुलाम अमेरिकेत येत व १७९० साली ही संख्या सहा लक्ष सत्याण्णव हजार इतकी होती अठराव्या शतकांत एकट्या लंडनमध्ये ऐशी हजार गुलाम असून हा व्यापार करणारीं शंभर जहाजें होती. लिव्हरपूलमध्ये १८५ जहाजातून पन्नास हजार गुलाम विकण्या-करितां येत. व गुलामगिरी नाहींशीं करण्याचे बिल इंग्लिश पार्लमेंटांत आले तेव्हां एकट्या लिव्हरपूलतर्फे त्याविरुद्ध दोन हजार व्यापाऱ्यानी आपल्या सह्या दिल्या ! पार्लमेंटचेहि अनेक सभासद स्वतः हा गुन्हा करणारांपैकीं होते. व १७८९ सालचे पाहिले बिल १६३ विरुद्ध ८८

इतक्या प्रचंड बहुमताने नापास झालें ! गुलामगिरीच्या शत्रुत्वाबद्दल आज नाकानें वांगीं सोलणारे इंग्रज लोक " बायबलमध्येच गुलामगिरी विहित आहे " असे त्यावेळी समर्थन करीत होते हें लक्षांत ठेविले पाहिजे. हेंच काय पण " एकोणिसाव्या शतकापर्यंत एकाहि प्रमुख ख्रिस्ती पुढाऱ्यानें गुलामगिरीविरुद्ध पुकारा केला होता असे दाखवितां येणार नाहीं. " असे ब्राइस यानें स्वच्छ विधान केलें असून, जोसेफ मॅकेब याचे विधान तर फारच मार्मिक आहे. तो ह्मणतो " No christian leader denounced slavery until the nienteenth century *when the age of slavery was over* ! " या वाक्याच्या अर्थावर भाष्य करण्याचेंहि कारण नाही !!

अमेरिकेचे साम्राज्य याप्रमाणे रुधिर-प्रादग्ध वास्तूवर कसे उभारले आहे हे पाहिले ह्मणजे, अमेरिकेच्या आजच्या भौतिक सुसंपन्नतेबद्दल मनांत क्षणभर तिरस्कार व वैराग्य उत्पन्न झाल्याशिवाय रहात नाही. यामुळे तेथील सुधारणेच्या लखलखाटात व सुखाच्या साम्राज्यात वास्तव्य करणाऱ्या लाला लजपतराय याच्यासारख्या एकाद्या विवेकी हिंदी प्रवाशाच्या मनांत असा विचार डोकावल्याशिवाय राहिला नाही की हे चालले आहे हे कांही ठीक लक्षण नव्हे ! ( " All is not well with the world " ) तथापि " अंतिम दृष्टीने पाहतां पाश्चात्य संस्कृति श्रेष्ठ की पौर्वात्य संस्कृतीच अधिक हितकर याचा निर्णय करणे फार कठीण आहे " असें लजपतराय यांनी आपल्या पुस्तकांत उद्गार काढले असले तरी, मला वाटते की या दोन्ही संस्कृतींचा शहाणपणाने मेळ घालण्यांतच हिंदुस्थानचा आतां तरणोपाय आहे. कारण पौर्वात्य संस्कृति श्रेष्ठ असें ठरविले तरी भौतिक सुधारणेमुळे पाश्चात्य संस्कृतीचे जगावर जे आक्रमण होत आहे ते कोणाला कोणत्याहि उपायाने टाळता येणें शक्य आहे काय, हाच सर्वात मोठा बिकट प्रश्न आहे. अशावेळीं " असाधु हा साधुत्वानें किंवा अनृत हे सत्याने जिकतां येणे शक्य नाहीं " हाच नीतिशास्त्रांतलि प्रतियोगीत्वाचा नियमच अधिक खरा व उपयोगी ठरतो असें

मला वाटते. अर्थात् हिंदी लोकानीं जे अमेरिकेकडे पहावयाचे तें ' हिंदु-संस्कृति विरुद्ध पाश्चात्य संस्कृति ' या दृष्टीनें नव्हे; तर जीवनकलह जिंकण्याकरितां खुद्द इंग्रजांच्याच अमेरिकन देशबांधवांना इंग्लंडशी ज्याप्रकारें हक्काकरितां भांडण करावे लागलें तो आदर्शच यावेळी हिंदी लोकांना अधिक मार्गदर्शक होईल.

व या दृष्टीने अमेरिकेचा इतिहास हिंदी राष्ट्राला आजच्या परिस्थितीत स्फूर्तिदायक वाटेल. इंग्रज राष्ट्राचा हिंदी लोकांचा आतां चांगला परिचय आहे! धर्माने व संस्कृतीनें परक्या अशा हिंदी लोकांचा इंग्लंडने स्वातंत्र्य-नाश केला ते एकवेळ असो, पण याहिपेक्षां स्वतःच्या हाडामांसाचे, स्वतःच्या धर्माचे, स्वतःच्याच राष्ट्राचे, किंबहुना तंतोतंत स्वतःच्याच संस्कृतीचे राष्ट्रबांधव देशांतर करून अमेरिकेत वसाहत करावयास गेले असता, केवळ इंग्लंडच्या साम्राज्यविषयक हट्टाने व जुलमी कारभाराने त्यांना इंग्लंड विरुद्ध बंड पुकारण्याची कशी पाळी आली, हे मर्म ओळखणाऱ्या वाचकांना इंग्लंडचा खरा स्वभाव अधिक चांगल्या रीतीने प्रतीत होण्यासारखा आहे! आयर्लंड हे तर अमेरिकेइतकेहि दूर नाही; पण इंग्लंडच्या टांचेखाली आयर्लंड आठशे वर्षे खितपत होते! स्वतःच्या देशबांधवाना इंग्लंडच्या हातून सुखासुखी स्वराज्य मिळाले नाही. त्याकरितां अखेर युद्ध झाले व तरवारीच्या खणखणाटाने या गोष्टीचा निर्णय लागला! बर्क, चॅथॅम याच्यासारख्या ज्या उदारधी मुत्सद्यांना अमेरिकन लोकांच्या न्याय्य आकांक्षा हाणून पाडण्याचे नाकारले त्यांची " Trumpet of Sedition " म्हणजे " राजद्रोही, फितवे " अशी तिसऱ्या जॉर्जकडून हेटाळणी होऊन, हाऊस ऑफ कॉमन्स व हाऊस ऑफ लॉर्डस् या दोन्ही सभांनी अमेरिकेच्या स्वातंत्र्यावर नांगर फिरविण्याचे ठराव बहुमताने पास केले!! याप्रसंगीं इंग्रज राष्ट्राचा खराखुरा अभिमान बाळगणाऱ्या बर्क, पीट यांसारख्या मुत्सद्यांनी केलेली आवेशपूर्ण भाषणें वाचण्यासारखी आहेत. " Had I been an American, as I am English-

man now, I would have never laid down my arms! *never* ! *never* ! " अशा जळजळीत शब्दांनीं वार्धक्याने जर्जर झालेल्या पिटची सिंहगर्जना पार्लमेंटमध्ये चालू होती. पण इंग्लंडने युद्ध थांबविले नाही व अखेर त्यांत अपयश घेऊन आपल्याच बांधवांविरुद्ध शस्त्र धरल्याचा कलंक मात्र इंग्लंडच्या कपाळी कायमचा लागला! जॉर्ज वॉशिंग्टन व बेंजामिन फ्रँकलिन हे कट्टे राजनिष्ठ लोक पण त्यानी या बंडाचे पुढारीपण घेतले, इतका इंग्लंडचा जुलूम स्वार्थी व मूर्खपणाचा होता! याबद्दल प्रस्तुत पुस्तकात 'स्वातंत्र्य-युद्धाची कारणे' हे समग्र सातवे प्रकरण तसेच, पृष्ठें १९६ ते २०६ ही फार वाचनीय आहेत यांत अनेक ठिकाणी हिंदी वाचकाना आपण हिंदी चळवळींचेच प्रतिबिंब पाहात आहोत की काय असा भास झाल्याशिवाय राहणार नाही.

परकीयाविरुद्ध बहिष्काराची तीव्र भावनाच अमेरिकेच्या उपयोगी पडली. अमेरिकन लोकांनी पुढे कायदेभंगांत पाऊल टाकले ते त्याच्या मानसिक भावनेचे दुसरे रूप होय इतकेच आपलेपणाची भावना ही ठेवावी तशी आहे. स्वाभिमान व इभ्रत यांच्या खोट्या कल्पनाना बळी न पडता अमेरिकन वसाहतीशी इंग्लंड थोडे अधिक उदारपणाने वागते तर, डोमिनियन स्टेटसमध्यें समाधान मानून अमेरिकेने मातृदेशाशी असलेल्या संबंधाचा खात्रीने अभिमान बाळगला असता. कारण इंग्रज लोकाना आपल्या साम्राज्याचा अभिमान किती कट्टा असतो हें विख्यात आहे. पण त्या अभिमानाचा इंग्लंडनेच अंत पाहिल्यावर "Live Ireland! Perish the Empire!" या ग्रॅटनच्या सुप्रसिद्ध उद्गारांप्रमाणे अमेरिका डोमिनियन स्टेटसच्या भ्रमांतून निघून तिने निर्भेळ स्वातंत्र्यच प्रस्थापित केले! आज अमेरिकेचा व इंग्लंडचा कार्डाचाहि संबंध राहिला नसून अमेरिका पूर्ण स्वतंत्र आहे. स्वातंत्र्य प्रस्थापनेनंतर अमेरिकेचा पहिला प्रेसिडेंट विलायतेस गेला असतां इंग्लंडच्या राजानें त्याच्याशी हस्तांदोलन करून म्हटलें, "पूर्वी माझ्यासारखा तुमचा कट्टा दुष्मान कोणी नव्हता. पण आज तुम्ही माझे मित्र झाला आहा!" याचे कारण अर्थातच 'स्वातंत्र्याची किमया' होय हें वेगळे सांगावयास नकोच!

अमेरिकेशी भांडण सुरूं होतांच एका फ्रेंच मुत्सद्याने भविष्य केलें होतें की वसाहती या साम्राज्य-वृक्षाच्या फळाप्रमाणे होत. त्या पक्व होई-पर्यंतच साम्राज्याला चिकटून राहावयाच्या. " प्राप्ते तु षोडशे वर्षे पुत्रे मित्रवदाचरेत् " हे न ओळखल्याकारणाने इंग्लंडला अमेरिका अंतरली व आयर्लंड फुटून निघालें सध्यांच्या काळीं आयरिश पुढारी डी व्हॅलरा याने राजनिष्ठेच्या शपथेचा वाद निकराने धसाला लाविला आहे याचें तरी मर्म हेंच होय ! पूर्वी इंग्लंडच्या राजाविषयीं मान्यता व त्याचा प्रतिनिधी ह्मणून फक्त एका गव्हर्नर जनरलचा अधिकार मान्य केला ह्मणजे वसाहतीच्या डोमिनीयन स्टेटसमध्यें इतर कोणतेंही व्यंग अगर बंधन नव्हतें. तथापि अलिकडे नुकत्याच पास झालेल्या वेस्ट मिन्स्टर ॲक्टानें वसाहतीचें जवळ जवळ पूर्ण स्वातंत्र्य इंग्लंडनें मान्य केलें आहे. १९२६ च्या साम्राज्य परिषदेने सर्व वसाहती या स्वयंसत्ताक मानून त्यांचा दर्जा समान मानला त्या सर्वांमध्यें उरलेलें बंधन ह्मणजे फक्त बादशाहाशीं निष्ठा हे होय. पण त्याचाही अर्थ स्पष्ट करण्याकरितां एक तज्ञ मंडळ नेमण्यांत आलें व त्याचा अहवाल १९३० च्या सामाज्य परि-षदेत सादर होऊन हल्लींचा वेस्ट मिनिस्टर कायदा जन्मास आला. तात्पर्य हल्लीं हिंदुस्थानांतील नोकरशाही डोमिनियन स्टेटस या शब्दाचा अर्थ आपल्या स्वार्थी मनाप्रमाणे कसाही करीत असली तरी, साम्राज्यातील वसाहतींचे बाबतींत डोमिनियन स्टेटस व संपूर्ण स्वातंत्र्य यांत फारसा भेद उरलाच नाहीं हे वाचकांच्या लक्ष्यांत येईल. इंग्लंडला जसजशा अधिकाअधिक अडचणी येत गेल्या तसतसे वसाहतींचे हक्क व अधिकार वाढत गेले असा मुळीं इतिहासाचाच दाखला आहे. सांप्रत जितके स्वातंत्र्य इंग्लंडला तितकेंच वसाहतींना आहे. वसाहती या राष्ट्रसंघाच्या सभासद आहेत. त्यांचे स्वतंत्र परराष्ट्रीय वकील आहेत. व्यापारी तह अगर युद्ध करण्याचा त्यांना अधिकार आहे. मात्र समजा एकाद्या वसाहतीनें खुद्द इंग्लंडशीच युद्ध पुकारलें तर काय स्थिति होईल हें पाहणे मौजेचें होईल. पण ही पुढची गोष्ट होय. तात्पर्य, वसाहतींचे स्वराज्य व

स्वातंत्र्य यांतील भेद केवळ नांवांत आहे, वस्तूंत नाहीं. पण हा भेद तूर्त लक्षांतही घेण्यांत अर्थ नाहीं, कारण आपण हिंदी लोक त्या दोहो पासून खूप दूर आहोंत ! स्वराज्य मिळविण्याचे प्रयत्न करीत असता आज आपण डोमिनियन स्टेटसची भाषा बोलतो. पण स्वराज्य प्रत्यक्ष हातीं येण्याच्या काळापर्यंत हिंदुस्थानची स्वराज्याची कल्पना अधिक विस्तृतहि होईल, नाही कोणी ह्मणावे ?

डोमिनियनस्टेटसचा वाद सोडला तरी प्रस्तुत पुस्तकाने आणखी एक महत्वाची गोष्ट वाचकांच्या लक्षांत येते ती ही की, अमेरिकन लोकांना स्वराज्य स्थापन करण्यात धर्मभेद, प्रांतभेद वगैरे कोणत्याही अडचणी दुस्तर वाटल्या नाहीत. हिंदुस्थानला स्वराज्य देतांना, तुमच्यांत पात्रता नाहीं, तुमच्यांत जातिभेद आहेत, तुमच्यांत धर्मभेद आहेत, मुसलमानाचे समाधान तुह्मी कसे करणार ? ८०० संस्थानिकाची तुह्मी काय वाट लाग-णार ? वगैरे हजार प्रश्न उपस्थित करून सरकार लोकांच्या तोंडावर मारते. पण अमेरिकेचा इतिहास पाहिला तर अशी एक गंमत दिसते कीं अमे-रिकन लोकांनी सर्वांना जाचणाऱ्या परकीय साम्राज्य सत्तेचा प्रथम निकाल लाविला व नंतरच राज्यघटना निर्माण केली. हे प्रश्न प्रथम सोड-वून दाखविल्या नंतर त्यांना स्वराज्य मिळाले असें नव्हे ! धर्मभेदासारख्या अडचणींचें कोणी निष्कारण थोतांड माजविण्यांत अर्थ नाही. एका ख्रिस्तीधर्मातही पक्षभेद व मतभेद हे आमच्या जातिभेदापेक्षाही अधिक तीव्र आहेत. आपल्या वैशिष्ट्याचा आग्रह धरणाऱ्या ८५ ख्रिस्ती धर्मपंथांचीं नावनिशी मॅक्स ऑरेल या फ्रेंच ग्रंथकारानें 'जॉनबुल अँड हिज आयर्लंड, या पुस्तकात दिली आहे. व यांची खानेसुमारी ' ख्रिस्ती ' या एका नावानें होत नाहीं तर, शिरगणतीच्या वेळीं विशिष्ट पंथभेदानेच आपला उल्लेख झाला पाहिजे असा आग्रह या लोकांनीं धरल्याचे इतिहासांत नमूद आहे ! अमेरिकेच्या ज्या अनेक स्वयंसत्ताक संस्थानांनीं एकसूत्री सजीव राष्ट्र निर्माण केले त्यांचे आर्थिक संबंध हे तरी धर्मभेद व पंथभेद यापेक्षां त्यांना अधिक बिकट व जिव्हाळ्याचे असतील कीं नाहीं ? पण

ा सर्व प्रश्नांचा निकाल त्याना समजुतीने करता आला याचा अर्थ, त्याना
च्छा होतीच पण सत्ताहि होती. हे आपसांतील तंटे तोडताना अनेक
ुत्सद्यांचे रक्त आटले हें खरे पण यादवी होऊन रक्तपात झाला नाही हे
क्षांत ठेवले पाहिजे. रक्तपात झाला तो इंग्रजांची सत्ता झुगारून देतानांच
ाला असेल तेवढा! जबाबदारी पडली की सर्वांना शहाणपण येतेच.
ण हातांतील सत्ता न सोडणाऱ्या परकीयांशी हा वाद करण्यांत अर्थ
ाय? स्वातंत्र्य प्रस्थापित झाल्यानंतर जबाबदारीची वाट चालता चालता
मेरिकन-राष्ट्राला विविध अनुभव आले. पण जॉर्ज वॉशिंग्टन व इतर
ंस्थानाचे मुत्सद्दी याच्या विवेकाने व देशभक्तीने अखेर बिकट परिस्थि-
ीवर कशी मात केली याचे वर्णन या स्वातंत्र्ययुद्धापेक्षांहि मनोरंजक
ाहे लायोनेल कर्टिस यांनी आपल्या "कॉमनवेल्थ ऑफ दी नेशन्स"
ा पुस्तकांत ते फार समर्पक व खुलासेवार दिले आहे. असो. प्रस्तुत
ोगले यांचे पुस्तक फार योग्यवेळीं लिहिले गेले असून विशेषत अमेरि-
मध्ये कांहीं काळ ग्रंथकर्त्याने वास्तव्य केल्यामुळे, इतिहासाची मर्मदृष्टी
ुदर भाषेबरोबरच त्यात ग्रथित झाली आहे. या दृष्टीने ग्रंथकाराचे पुनः
कवार अभिनंदन करून ही प्रस्तावना पुरी करितो.

सातारा
२५ ऑगस्ट १९३२

**काशिनाथ नरसिंह केळकर**

# ग्रंथसूचि

ज्या ग्रंथांचे आधारें पुस्तक लिहिण्यात आले त्यांची यादी.

1 The rise of American civilization
C. A. & M. R. Beard.

2 The United States of America
W H. Hudson & Irwin Guerney

3 Columbus & Columbia
Historical Pub Company. Philadelphia

4 The United States of America
Lala Lajapatrai.

5 A search light on America
James Truslow Adams.

6 Industrial History of The United States
by Katharine Coman.

7 Economic Developement of The United
States by Isaac Lippincott.

8 The American Government by Haskin.

# अमेरिकन लोक
# व
# त्यांची संस्कृति

## प्रकरण १

## प्रास्ताविक



रोमन साम्राज्याचे आरंभापासून, पूर्वेकडील संपन्न व प्रगतिमान राष्ट्रांशीं रोमन लोकांचा व्यापार चालू होता. पूर्वेकडील बाजारांतून, रेशीम, तलम कपडा, सौगंधिक पदार्थ, मसाल्याचे जिन्नस, हस्तिदंत, मौल्यवान गालिचे, कलाकुसरीच्या वस्तू, बहुविध रत्ने, दिव्य औषधी वगैरे नामांकित चिजांनीं रोमच्या राजधानींतील व्यापारीपेठ फुलून गेली होती. संपत्तिमान युरोपियन राजेरजवाडे, अमीर उमराव, व्यापारी व त्यांच्या गुलहौशी स्त्रिया या चैनीच्या वस्तू खरेदी करण्याकरितां वाटेल तें मूल्य द्यावयास तयार असत. रोमन साम्राज्यांतील प्यूरिटन लोकांनी, वाटेल ती किंमत देऊन तरुण स्त्रिया किंबहुना वृद्ध स्त्रिया सुद्धां सौंदर्यविकासाचे व चैनीचे पौर्वात्य जिन्नस खरेदी करून पैशाची अतोनात खराबी करितात, यासंबंधी बरीच ओरड केली; पण तिचा कांहीएक परिणाम न होतां तो व्यापार अबाधित चालला. रोमन साम्राज्याचे लयानंतर जर्मन शिलेदारीचे काळांतही पूर्वेकडील देशांशी व्यापार चालू राहिला इतकेंच नव्हे तर त्याची सपाट्याने वाढ होऊं लागली; व या व्यापारांत मुसलमान व इटालियन व्यापाऱ्यांची विलक्षण प्रगति होऊन त्यांना अपरंपार संपत्ति मिळूं लागली. मॅद्रिद, लिसबन, पॅरिस, ब्रूजेस व लंडन वगैरे युरोपातील सर्व राजधान्यांतून पूर्वेकडील मालाला भरपूर मागणी असे. पूर्वेकडील देशांशी व्यापार करणे धाडसाचे व कटकटीचे काम होते. पण त्यांत फायदाही

तसाच जबर असे. चौदाव्या शतकाचे अखेरीस या व्यापाराचे कामी एक मोठें विघ्न आले. हा सर्व व्यापार मुख्यतः तीन मार्गांनीं चाले. सर्वात उत्तरेकडचा मार्ग भूमध्य समुद्रांतून कास्पियन समुद्रापर्यंत व पुढे तेथून भूमार्गाने थेट पोर्कनूपर्यंत होता मधला मार्ग भूमध्य समुद्रांतून आशिया मायनर, तेथून यूफ्रेटीस व तैग्रीस या नद्यांमधून इराणचे आखात व तेथून अरबी समुद्राचे मार्गाने हिंदुस्थानपर्यंत होता. तिसरा दक्षिणेकडील मार्ग भूमध्य समुद्र व तांबड्या समुद्राचे मार्ग होता या तीनही मार्गांचे नाक्यावर म्हणजे भूमध्य समुद्राचे पूर्वेकडील भागात तुर्क लोकांचे आधिपत्य स्थापन झाले. त्यांनी व्यापारी मालावर जबर कर लादले, त्यामुळे व्यापाराची गळचेपी होऊं लागली. पूर्वेकडून येणाऱ्या व्यापाराचे महत्व विशेष होते व मध्ययुगीन यूरोप सर्व ऐषआरामाचे पदार्थांचे बाबतीत पूर्वेकडील व्यापारावर अवलंबून होता. ज्याअर्थी सर्व चैनीचे व कारागिरीचे पदार्थ पूर्वेकडील देशांतून येतात त्याअर्थी तेथे सोन्याचा धूर निघत असला पाहिजे अशी केवळ धाडशी प्रवाशांचीच नव्हे, तर युरोपांतील सामान्य जनसमूहाची सुद्धां कल्पना असणे साहाजिक होते. याच कल्पनेमुळे तत्कालीन प्रवाशांचे मनांत थेट हिंदुस्थानला जाण्याचा समुद्रमार्ग शोधून काढण्याचे आले. स्पेन–पोर्तुगालचे राजांनी निरनिराळ्या प्रवाशांस या कामी फार मदत केली, व दक्षिण युरोपामध्ये दर्यावर्दी लोकात फार लांब लांबच्या सफरी करण्याची अहमहमिका सुरूं झाली. आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्याने पोर्तुगीज खलाशांनीं लांब लाब सफरी सुरूं केल्या.

इ. स. १४४१ सालीं नूनो ट्रिस्टाम केप ब्लॅकोपर्यंत गेला. पुढे डिनिस डायाझ हा केप व्हर्डपर्यंत गेला. इ. स. १८४६ सालीं बार्थो लोमो डायाझ हा आफ्रिकेचे दक्षिण टोंकास वळसा घालून पुढे गेला पण येथे त्याचे खलाशांनीं अधिक पुढें जाण्याचें साफ नाकारिले. पुढें थोडेच वर्षांनी म्हणजे इ. स. १४९७ सालीं वास्को डी गामा याने हिंदुस्थान गांठलें. इतकेच नव्हे तर उत्तमोत्तम पदार्थ आपल्या जहाजावर लादून घेऊन तो पोर्तुगालला परत आला इ. स. १४९२ साली कोलंबसाचे डोक्यांत अशी



अमेरिकेच्या किनाऱ्यावर कोलंबसाचें प्रथम आगमन. पान ३.

कल्पना आली की, पृथ्वी ज्याअर्थी वाटोळी आहे, त्याअर्थी पश्चिमेकडून पूर्वेकडील हिंदुस्थान देशास तरी कां पोहोंचता येऊं नये? ह्मणून या नवीन दिशेनें त्याने प्रयत्न सुरू केले. आफ्रिकेस वळसा घालून गेल्यास हिंदुस्थान फार लांब पडेल असें त्याचे मनाने घेतले होते. कोलंबसास त्याचे या धाडसाचे प्रवासाचे कामीं स्पेन देशाचे राजाने व राणीनें सर्व मदत करण्याचे कबूल केले तो तारीख ३ ऑगस्ट रोजी स्पेनचे किनाऱ्यावरून निघाला. तो प्रथम दाक्षिणेकडे निघाला व त्याने कनेरी बेट गाठले, व तेथून अनुकूल वाऱ्याचे दिशेने थेट पश्चिमेकडे गेला. आक्टोबर महिन्याचे बाराव्या तारखेस त्याचे नजरेस नवीन जमीन पडली. त्याला वाटले की आपण हिंदुस्थानास पोहोचलो खास! यावेळी तो हल्ली बहामा या नावाने संबोधिल्या जाणाऱ्या बेटास पोहोचला होता. थोड्याच दिवसांत त्याला आपण पोहोचलो तो देश मोठा नसून एक बेट आहे असे आढळून आले. पुढें त्यानें लगतच्या ह्मणजे क्यूबा व हयार्टा बेटाचा शोध लावला. हिंदुस्थानच्या किनाऱ्यालगतचींच ही बेटें असली पाहिजेत असें त्याचे मनानें घेतले व त्यांना तो 'इंडिज' असें ह्मणूं लागला. हिंदुस्थानचा शोध लागल्यानंतर या बेटास मग 'वेस्ट इंडिज' असे नाव पडले. कोलंबसानें 'वेस्ट इंडिज्' च्या तीन सफरी केल्या. अगदी शेवटच्याच सफरींत कायतो तो खरा मध्य अमेरिकेच्या किनाऱ्यास लागला होता. मरेपर्यंत आपण हिंदुस्थानच्याच किनाऱ्याचा शोध लावला या कल्पनेने त्याला सोडलें नाही. या मुलखापासून पुढे आशिया खंड किती दूर आहे याची त्याला कल्पनाही आली नाहीं वेस्ट इंडिजमधील सुंदर वनश्री, घनदाट अरण्यें, बहुविध रंगांच्या फळापुष्पांनी समृद्ध भूमि, ऊस, केळी व ताडांचा झाडें, उष्ण हवा, निरभ्र व नीलवर्ण आकाश, वगैरे युरोप खंडापासून पूर्ण भिन्न वातावरणांत आलेल्या कोलंबसास हें हिंदुस्थान असे वाटल्यास त्यांत नवल तें कोणते?

कोलंबसाप्रमाणें इतरही प्रवासी या नवीन जगाकडे निरनिराळ्या दिशांनीं जावयास निघाले. इ. स. १४९७ सालीं जॉन कॅबट हा ब्रिस्टोनहून निघाला कोलंबसापेक्षां अधिक उत्तरेकडील दिशेनें त्यानें

प्रवास करून थेट न्यूफाऊंडलंड गांठलें. तेथून पुढें सेंट लॉरेन्स नदींतून केप ब्रिटन आयलंडपर्यंत जाऊन परत युरोपास आला. दुसऱ्या खेपेस थेट लाब्राडोर पासून तो फ्लोरिडापर्यंत त्यानें उत्तर अमिरिकेच्या पश्चिम किनाऱ्याने प्रवास केला.

अमेरिगो व्हेसपूसी नांवाच्या इटालियन गृहस्थाचे नांवच या नवीन खंडास मिळालें. ' अमेरिका ' असें या नवीन खंडाचे नांव ठेवण्याबद्दल एका भूगोल शास्त्रवेत्त्या जर्मन प्रोफेसराने पोर्तुगालचे राजास शिफारस केली. अमेरिगो व्हेसपूसी हा इ. स.१५०० शें चे सुमारास पोर्तुगालचे राजाचे मदतीनें ब्राझिलचे किनाऱ्यास येऊन पोंहोचला. त्याने बऱ्याच आंत-पर्यंत या देशाचा शोध लावला व उपयुक्त अशी माहिती प्रसिद्ध केली. हा देश हिंदुस्थान नसून स्वतंत्र व विस्तृत असे एक खंडच आहे ही गोष्ट अमेरिगस्नेंच प्रथम जाहीर केली, ह्मणून त्याचेंच नांव या नवीन प्रदेशास मिळालें हें योग्यच झाले. पुढे हेच नांव उत्तर दिशेकडील मुलखांस ह्मणजे हल्लींच्या युनायटेड स्टेट्सलाही लावण्यांत आले. खुद्द कोलंबसाचें नांव त्यानें शोध न लाविलेल्या कानडांतील दुसऱ्याच एका प्रांतास त्याचे स्मारक ह्मणून देण्यांत आलें आहे. तसेच युनायटेड स्टेट्समध्यें बरींच शहरे व संस्था त्याच्या नांवानें संबोधिल्या जात आहेत.

बालबोवा नांवाच्या स्पॅनिश गृहस्थाने १५१३ सालीं पनामा संयोगभूमि ओलांडली.

पुढे इ. स. १५२०-२१ साली मागलान नांवाच्या गृहस्थाने दक्षिण अमेरिकेच्या दक्षिण टोकास असलेल्या ' मागेलान ' सामुद्रधुनीतून पॅसिफिक महासागरांत प्रवेश केला. या समुद्र प्रवासांत त्याची सफर फार शांतपणे पार पडली. कांहीं वादळे वगैरे झाली नाहींत त्यामुळें त्या समुद्राला ' पॅसिफिक ' ( प्रशांत ) महासागर नांव पडले. युरोपांतून आतांपर्यंत जे लोक आले त्यांचा मुख्य हेतु मिळेल तितक्या झपाट्याने संपत्ति मिळवि-ण्याचा होता. त्यांनीं मूळच्या रहिवाशांशी व्यापार सुरू केला. या प्रथमच्या व्यापारांत स्पेनचींच जहाजें विशेष दिसत असत त्यांतील कांहीं लोकांनी

वसाहती केल्या, व तेथील खनिज संपत्तीची माहिती करून घेतली. युरोपांतून पुष्कळ मजूरही आणण्यांत आले, त्यांच्याच्यानें काम होईना, तेव्हां आफ्रिकेंतून निग्रो लोक पकडून आणून त्यांना गुलाम म्हणून नवीन देशांतील शेतातून व खाणीतून कामास लावून स्पॅनिश लोकांनीं अतोनात सोने, चांदी वगैरे पैदा केली, व थोडेच दिवसांत स्पेन देशांत संपत्तीचा पूर लोटूं लागला. अमेरिकेंत जाणारीं सर्व जहाजे स्पेनमधील सेव्हील बंदरांतून निघत. तीं सर्व सेव्हील येथील व्यापाऱ्यांचीच होतीं, व फक्त सेव्हीलच्याच व्यापाऱ्यास नवीन वसाहतींत व्यापार करण्याचे खास परवाने देण्यांत येत असत. सोळाव्या शतकाचे प्रथमार्धांत, पेरू, मेक्सिको, व मेक्सिकोच्या आखातांतील बेटे येथेच सर्व व्यापार चालू होता व तो फक्त स्पॅनिश लोकाचेच हातांत होता. इतर देशांतील लोकांस स्पॅनिश जहाजे आसपास फिरकूंहि देत नसत.

इ. स. १५१३ ते १५४२ चे दरम्यान स्पॅनिश लोकांनीं मेक्सिकोचे आखातास मिळणाऱ्या नद्यातून वर म्हणजे युनायटेड स्टेटस्चे दक्षिण भागातील प्रांतात बऱ्याच आतपर्यंत प्रवेश केला होता. पण या सफरीचा उद्देश वसाहती करून राहण्यासाठीं सुखावह जागा शोधण्याचा नसून फक्त सोने व चांदी याच्या खाणीच शोधण्याचा होता. दैववशात तो सफल न झाल्यामुळे त्यांना तेथून परत फिरावे लागले.

या नवीन खंडाच्या अंतर्भागांत प्रवेश करून त्याचा पूर्ण शोध लावण्याचे कामीं फ्रेंच लोकानीं बरेंच यश संपादन केले. सेंट लॉरेन्स नदींतून कानडाचे प्रातात शिरून त्यांनी सावकाशपणे तेथील मूळचे लोकांशीं म्हणजे इंडियन लोकांशीं व्यापार आरंभिला. हळूं हळूं मिचिगन सरोवरांतून पलीकडील प्रांतापर्यंत त्यांनीं शोध लाविला. चॅम्लेन नावाचा गृहस्थ ओटावा नदींतून पोर्ट हूरॉनपर्यंत पोहोचला, पुढें जीन निकोलस हा विस्कानसीनपासून इलिनॉवपर्यंत गेला.

जॉन कॅबट याचा मुलगा सिबॅस्टियन कॅबट यानेंही बापाच्या मागोमाग अमेरिकेच्या सफरी केल्या. त्यानें लाब्राडोरचे किनाऱ्यापर्यंत मजल

गांठली. त्यानंतर त्याने न्यू ब्रन्सविक, नोव्हास्कोशिया, व मेनलॅंडपर्यंत प्रवास केला. सिबॅस्टियन कॅबटचे अमदार्नीत म्हणजे पंधरावे शतकाचे शेवटी नौकायनासंबंधीचे शास्त्राची माहिती बेताचीच उपलब्ध होती. समुद्रांतील अन्त प्रवाहांनी हवेच्या उष्णतामानांत फरक होतो हे त्यावेळच्या प्रवाशास माहीत नसावें असे दिसतें भूमध्यरेषेपासून ठरांव अंशावर ठरीव उष्णतामान असावयाचेच अशी त्यांची समजूत होती. इंग्लंडमधील दमट हवा व बेताची थंडी तितक्याच अंशावर असलेल्या अमेरिकेंतील प्रदेशांत असेल हा कॅबटचा अंदाज साफ चुकला. अमेरिकेच्या थंडीच्या कडाक्याने त्याची गठडीच वळण्याचे बेतात आली.

अमेरिकेतील उत्तर प्रदेशात कॅबट प्रथम जाऊन पोहोचला. इंग्लिश जहाजातील खलाशानी हीं भूमि प्रथम पाहिली येवढी गोष्ट त्या प्रदेशावर हक्क सांगण्यास इंग्रज लोकांस पुरेशी होती. कारण त्यावेळच्या युरोपीय कायद्याप्रमाणे म्हणजे युरोपांतील ख्रिस्ती राज्यकर्त्यामध्ये असे ठरले होते की, इतर ख्रिस्तीधर्मविहीन राष्ट्रांतील जमीन ज्या राष्ट्राच्या प्रथम नजेरेस पडेल त्याने घ्यावी. या ठरावांत परकी राष्ट्रांतील मूळच्या लोकास कांही हक्क असतात, या गोष्टीची जाणीवही नव्हती; व जसजसे नव्यानव्या प्रांतांचे आक्रमण होत गेले तस तसा तेथील रहिवाशाचा नायनाट होत गेला. इंग्रज जहाजाचा कप्तान हातात निशाण फडकावीत लाब्राडोरपासून केप हॅटर्सपर्यंत, इतर कोठल्याही युरोपियन राष्ट्रांचे अगोदर गेला. ब्रिटिश जहाजांतील लोकांनी ही भूमि लांबून कां होईना, अवलोकन केली होती ही गोष्ट त्यांची तेथे मालकी स्थापन होण्यास पुरेशी होती. मग त्या गोष्टीकडे भावी इतिहासकार कोणत्याही दृष्टीने पाहोत.

सिबॅस्टियन कॅबट याच्या कामगिरीचे, त्यावेळेचा कंजूष व आपमतलबी राजा सातवा हेनरी याचेकडून व्हावे तसे कौतुक झालें नाही. सातव्या हेनरीला त्याच्या कामगिरीचे महत्व पटले नव्हतें असें मुळींच नाहीं, पण कांहीं एक बक्षीस दिले नाहीं तरी चालण्यासारखें आहे असें त्याने पाहिलें. मग विनाकारण खर्च कां ? त्याचा स्वभावच तसा हे



कोलंबसाचें अमेरिकेहून स्वदेशीं आगमन.

पान ६.

फ्रोबिशर, एक एस्किमो व सोन्याची अशोधित धातु घेऊन इंग्लंड-मध्यें पोहोंचला मात्र, लगेच जिकडे तिकडे या गोष्टीचा पुकारा झाला. सोनें सांपडलें! मग काय विचारतां? इंग्लंडचे बाहू पराक्रमानें स्फुरूं लागले, खुद्द एलिझाबेथ राणीसुद्धां फार खूष झाली. तिनें आपण स्वतः एक जहाज फ्रोबिशरला बहाल केलें. दुसरा अनेक जहाजांचा तांडाच्या तांडा 'मेटा इन् कॉगनिटा' ला निघाला. निघतांना या सर्व तांड्याचा मोठा जयजयकार करण्यांत आला. कारण आतां हीं सर्व जहाजे सोन्यानें भरून येणार होतीं! फ्रोबिशरचीं जहाजें नवीन देशाचे किनाऱ्यास येऊन पोहोंचलीं, पण यावेळीं जितक्या उत्तरेस जावयास पाहिजे होते तितकें जातां आलें नाहीं, असें त्यांस आढळून आलें. या प्रदेशांत बर्फाचे डोंगरचे डोंगर समुद्रांमध्यें तरतांना त्याला आढळून आले. ते एका ठिकाणी स्थिर नसून तरंगत असत. अशा डोंगरांमध्यें सांपडून जहाजांची दामटी वळते की काय अशी त्याला भीति वाटूं लागली. भर उन्हाळ्याचे दिवस, तरी थंडी इतकी कडक होती कीं त्याला बाहेर तोंड काढवेना. खलाशी लोक कंटाळून गेले व या ठिकाणाहून केव्हां परत फिरतों असें त्यांना झाले होते तो सर्व तांडा तसाच रिकाम्या हातानें इंग्लंडला परत आला. या तांड्यावर इंग्रज लोकांनी भित्रट व नामर्द असा शिक्का मारला; पण फिरून त्यांनी दुसरा मजबूत व सुसज्ज अशा पंधरा जहाजांचा तांडा उभा केला; व या नवीन प्रवासाचे सर्व खर्चाची तरतूद एलिझाबेथ राणीने केली. या पंधरा जहाजांपैकीं तिन नव्या देशांत राहून बाकी बारा सोन्याने भरून परत यावयाचीं होती. ठरल्याप्रमाणे हा सर्व तांडा बरेच धक्के खात खात इच्छित ठिकाणीं म्हणजे 'मेटा इन्कॉगानिटा' येथें सुखरूप पोहोंचला. चकाकित दिसणारी अशोधित धातु अत्यंत कडाक्याच थंडींत सुद्धां मोठ्या कष्टानें त्यांनीं भरून घेतली, पण काय ? दुर्दैव! त्याचे खाण्यापिण्याचे जिन्नस असलेल्या जहाजाने पळ काढला व इंग्लंड गांठलें. काय करतात बिचारे! उपाशीं मरण्याची पाळी सर्व जहाजांचे खलाशांवर येऊन गुदरली. मोठ्या कष्टानें हा खलाशी तांडा परत स्वदेशी येऊन पोहोचला.

चकचकणारी धातु कमी दर्जाचा अभ्रक व शुद्ध माती यांचें मिश्रण आहे असें आढळून आलें. व अशारीतीनें या शेख महमंदी स्वप्नाचा शेवट झाला ! ही गोष्ट इ. स. १५७९ चे सुमारास घडली.

एलिझाबेथ राणीचे कारकीर्दीत सर फ्रान्सिस ड्रेक या इंग्रजी कप्तानानें खाजगी आरमार बाळगून चांचेगिरी आरंभिली. स्पेन देशास येणाऱ्या जाणाऱ्या जहाजांवर धाड घालून त्यानें अलोट संपत्ति मिळविली. पुढे याचें आरमार अमेरिकेस गेलें. तेथेंही पॅसिफिक समुद्राचे बाजूस तळ देऊन त्याने स्पेनच्या जहाजांस सळो का पळो करून सोडलें. पुढें याही धंद्यास कंटाळून त्याने अमेरिकेचे पश्चिम किनाऱ्यानें उत्तरेकडे प्रवास सुरूं केला. तो थेट ओरेगामपर्यंत गेला होता. वाटेंत सॅन फ्रॉन्सेस्को येथें त्यानें एक किल्ला बांधिला, व तो तेथील इंडियन रहिवाशांचा राजा बनला. फ्रॅन्सिस ड्रेक बरोबरचे खलाशांस येथील थंड हवा मानवेना ह्मणून तो पुन्हां मेक्सिकोस परत फिरला, व पुढें स्वदेशीं आला. ह्मणजे इ. स. १५८० पर्यंत इंग्रंजांची खास वसाहत अशी अमेरिकेंत स्थापन होऊं शकली नाहीं.

अमेरिकेच्या किनाऱ्यावर शेती आणि व्यापार करण्यासाठी, स्वतंत्र वसाहत करण्याचें आतांपर्यंत कोणाचे डोक्यांत आलें नव्हते. प्रथमतः सर हंफ्रे जिलबर्ट यानें ही कल्पना काढली. याच गृहस्थानें प्रथम " वायव्य दिशेनें प्रवास करून हिंदुस्थानचा मार्ग " या विषयावर एक पुस्तक लिहिलें होते. याच पुस्तकातील कल्पनांनीं उत्तेजित होऊन फ्रोबिशर हा आपल्या प्रवासास उद्युक्त झाला होता. सर हंफ्रे जिलबर्ट यानें आपली कल्पना एलिझाबेथ राणीपुढे मांडली. एलिझाबेथ राणीनें त्याचे म्हणण्यास संमति दिली. इतकेंच नव्हे तर, अमेरिकेंत जाऊन न वसाहत केलेली अशी सहाशें चौरस मैल जागा काबीज कर आणि ती तुला बक्षीस घे असें सांगितलें. त्याचप्रमाणें तेथे वसाहत करून त्या वसाहतीचा मालक व गव्हरनर हो, ह्मणून त्याला परवाना दिला. झालें ! इतकी परवानगी मिळतांच सर हंफ्रे जिलबर्ट व त्याचा सावत्र भाऊ सुप्रसिद्ध सर वॉलटर रॅले हे दोघे पांच जहाजांचा तांडा घेऊन १५८३ चे जून महिन्यांत अमेरिकेस गेले. अवघ्या

दोन दिवसांतच बरोबरच्या एका जहाजानें पळ काढला व तें परत इंग्लंडला आले. जिलबर्ट व रॅले ऑगस्टमध्ये न्यू फाऊंडलंड येथें पोहोचले. हे दोघेहि बंधू किनाऱ्यावर उतरले व आपल्या राणीच्या नांवाचा जयजयकार करून त्यांनी तो मुलुख ताब्यांत घेतला. ते उतरले होते तेथेच एका टेकाडाचे बाजूस अभ्रकाची माती चमकत असतांना कांहीं खलाशांस दिसली. सर हंम्फे जिलबर्टनें बरोबर एका धातुशास्त्रविशारदासही आणलें होते त्यानें सांगितलें की ही चांदीची अशोधित धातु आहे. खलाशी लोकात बंड उद्भवले. त्यांच्यापैकी काही ही अशोधित चांदी खोदून आणण्यास व ती जहाजांत भरण्यास निघून गेले. बाकीच्या लोकांनीं स्पॅनिश व पोर्तुगीज जहाजांवर हल्ला करून त्यांना लुटण्याची कामगिरी आरंभिली. थोडेच दिवसांत एक जहाज नादुरुस्त झाल्याचे आढळून आलें. ते तेथेच सोडून देऊन उरलेल्या तीन जहाजांनिशी तो दक्षिणेकडे चालला. मॅसॅचुसेट्स्चे किनाऱ्यानजीक त्यांचे सर्वात मोठें जहाज, त्यावरील काल्पनिक चांदीची अशोधित धातु व खलाशी हे सर्वच मोठे वादळ झाल्यामुळें समुद्राच्या तळाशी गेले. उरलेल्या दोन जहाजांनिशीं ते परत फिरले, पण दुर्दैवाने त्यांचा पाठ पुरावली. त्यांचीं दोन्हीहि जहाजें निकामी झाली व गळूं लागली. सर हंम्फे जिलबर्टचे ' स्किवरल ' नांवाचे जहाज वादळांत सांपडून सर्व खलाशांनिशीं ' समुद्रास्तृप्यन्तु ' झालें फक्त एका जहाजानिशीं सर वॉलटर रॅले इंग्लंडास कष्टी अंन्तःकरणाने परत आला.

पण अशा रीतीने केवळ निसर्गाचे अवकृपेने परत यावे लागलें ह्मणून त्याचा धीर खचला नाही. तर उलट त्याचे मनाने हे वसाहतीचे काम तडीस नेण्याची उचल खाल्ली. एलिझाबेथ राणीपासून पुन्हां त्याने एक सनद करून घेतली, तिच्या अन्वयें तो बऱ्याच मोठ्या भूप्रदेशाचा मालक बनणार होता. तें एक स्वतंत्र संस्थानच करावयाचें ठरले असून त्याची सर्व व्यवस्था रॅलेने पहावयाची होती व तो प्रदेश फक्त इंग्लंडच्या राणीच्या राज्याचा भाग समजला जाणार होता. या नवीन संस्थानांत इंग्लंडमधून वसाहतवाल्यांस भरपूर जमीन व इतर वसाहत करण्यास लागणारी सर्व मदत मिळणार होती.

या नवीन वसाहतीस जागा शोधावयाची ती उत्तरेकडील थंड व बर्फमय मुलुखातील न शोधतां डिलावेटच्या समशीतोष्ण किनाऱ्यापाशी शोधण्यांत यावयाची होती. पुढील आघाडीस दोन जहाजांचा तांडा तयार करून त्यावर फिलिप आमिडास व आर्थर बार्लो या दोन कसलेल्या दर्यावर्द्यांची कॅप्टन म्हणून नेमणूक करण्यांत आली. इ. स. १५८४ च्या एप्रिल महिन्याचे २७ तारखेस या आघाडीचे तांड्याने कूच केलें. प्रथम कनेरी बेटापर्यंत जाऊन त्यांनी 'वेस्ट इंडीज्' बेटे गांठलीं व त्यानंतर १३ जुलै रोजी त्यांची जहाजे ओक्रॅकोक नांवाच्या नदीतून वर शिरली. समुद्र प्रशांत होता. भोंवतालच्या रम्य भूप्रदेशाने त्यांची मने आकर्षून घेतली, एखाद्या उत्तम उद्यानांतच आपण प्रवेश करीत आहोत असे या सर्व खलाशांस वाटूं लागले. त्यांची मने आनंदाने प्रफुल्लित झाली. त्या प्रदेशांतील मूळचे रहिवाशी सुद्धां स्नेहभावपूर्ण व प्रेमळ असल्याचे आढळून आले. लवकरच या पार्टीने 'रोयानोक' नांवाच्या बेटावर वसाहत करण्याचे ठरविले या बेटावरील 'इंडियन' राणीने त्यांचा चांगला पाहुणचार केला. सुमारे दोन महिन्यांपर्यंत तेथे राहिल्यानंतर आमिडास व बार्लो दोघेहा इंग्लंडास परत आले. कारण त्यांच्यामध्ये वसाहतवाल्यास योग्य ती सहनशक्ति किंवा धोरण असल्याचें दिसून आले नाही. मात्र या नवीन भूप्रदेशाच्या सौंदर्याचे काव्यमय वर्णन करून इंग्लंडांतील लोकांची मने त्यांनी गुंग करून सोडलीं. या नवीन प्रांताचे नांव एलिझाबेथ राणीनें स्वतःचे चारित्र्यानुरूप 'व्हर्जिनिया' ( कौमार्यभू ) असे ठेविले.

आपल्या वसाहतीच्या धोरणास सर वालटर याने १५८४ साली पार्लमेंटची संमति व कांही अधिक सवलती मिळविल्या. असें करण्यांत त्याचा हेतु केवळ अधिक सवलती मिळविण्याचा नसून आपल्या मसलतीस सार्वजनिक संमति मिळविण्याचा व तिची प्रसारणा करण्याचा होता. इकडे आमिडास, बार्लो व त्याचे बरोबरचे लोक या नवीन भूप्रदेशाची मुक्तकंठानें स्तुति करीत होते. तेथील संपत्तीचीं अद्भुत वर्णनें वाचून वसाहतेच्छु लोकांचे तोंडास पाणी सुटले असेल यांत नवल नाहीं.

नवीन वसाहतीचे कामास जोरानें चालना देण्याचें ठरल्यानंत रॅलेनें पुन्हां एक जहाजांचा तांडा उभारला. नवीन प्रदेशावर सर राल्प लेन याची गव्हरनर ह्मणून नेमणूक केली व सर रिचर्ड ग्रेनव्हील यास र तांड्याचा कप्तान करण्यांत आलें. सर राल्फ याचे एलिझाबेथ राणीश दूरचें नातें होतें व सर रिचर्ड हा रालेचा चुलतभाऊ होता. दोघांचेह इंग्लंडच्या दरबारांत चांगलें वजन होतें

या नवीन वसाहतवाल्या टोळीत मुख्यत्वेकरून इंग्लंडांतील बड लोकांची तरुण व द्वाड मुलेंच होती, या तांड्यात सात जहाजे होती. स. १५८५ च्या एप्रिल महिन्यांत निघून जून महिन्यांत ही वसाहत वाल्यांची टोळी तेथे पोहोंचली. वाटेंत एका टोंकापाशीं मोठें वादळ झालें त्यावरून त्या टोंकाचे नांव ' केप फियर ' असे पडले. तेथून मोठ्या शिव स्तीनें निघून सुमारें सहा दिवसांनी सर्व ' रोयानक ' बेटावर सुखरू पोहोंचले.

येथेच वसाहत करण्याचे ठरल्यामुळे सुमारे १८० लोक या बेटाव उतरले. लवकरच त्यांनीं सभोंवतालच्या भूप्रदेशांत प्रवेश करून माहित मिळविण्यास सुरुवात केली. एके दिवशी कांहीं निमित्तानें मूळच्या रहिव शांशीं तक्रार होऊन सर रिचर्ड ग्रेनव्हील यानें इंडियन लोकांच्या सबं गांवास आग लावून दिली व त्यांची मक्याची शेते सुद्धां उध्वस्त करू टाकली. बाकीच्या वसाहतवाल्यांस या बेटावरच ठेऊन, सर रिच ग्रेनव्हिल इंग्लंडांत परत आला, येताना त्यानें एक स्पॅनिश जहाज मौल्यवा पदार्थांनीं भरून चालले होते तें पकडून आणलें. वसाहती करणें व चाचे गिरी करणे हा जोड धंदा बरेच दिवस ठीक चालला होता.

वसाहतवाल्यांच्या दुष्ट वर्तनाचा इंडियन लोकांनां राग येणें साह जिक होते. केवळ पाहुणे ह्मणून राहिलेल्या लोकानी गांव व पिके जाळू टाकिलीं, या नीच वर्तनाचा त्यांनां फार राग आला. ते युरोपच्या प्रत्येक रहिवाश्याकडे पूर्वीच्या दिलदारपणानें न पाहातां, संशयी, तिरस्कारयुक्त व द्वेषबुद्धीनें पाहूं लागले. लेन व त्याचे बरोबरीचे लोक यांस तेथी

इंडियन लोकांनीं, सोन्याच्या खाणी दाखविण्याचे निमित्तानें दूर जंगलांत नेलें व तेथें त्यांचा घात करण्याचा घाट घातला. मोठ्या मिनतवारीनें लेनच्या टोळीनें पळ काढला व परत रोयानक बेट गांठलें. उलट इंग्रज लोकांनीं कावा साधून त्या इंडियन टोळीचे प्रमुखास व त्याचे सहाय्य-कर्त्यास दगलबाजीनें ठार केले. अशा रीतीनें सर्व वातावरण संशयी व खुनशी बनलें होतें.

गरीब व आदरशील अशा मूळच्या रहिवाश्यांचा विश्वासघात केला, त्यांच्यावर क्रूरपणाने छापे घातले, व अन्यायानें त्यांचे खून पाडले, या गोष्टी इंडियन लोकांचे मनांतून तीनशे साडेतीनशें वर्षें झालीं तरी अद्यापि निघून गेल्या नाहींत. इंग्रजी भाषा बोलणाऱ्याचा शद्ब ऐकला कीं त्यांचे कपाळास आंठ्या पडतात, व अद्याप प्रत्येक युरोपीय माणसाकडे इंडियन लोक संशयीवृत्तीनें व द्वेषभावानें पाहातात यांत नवल तरी कसलें ?

सर फ्रॅन्सिस ड्रेक हा आपल्या पॅसिफिक समुद्रांतील लीला आटोपून परत स्वदेशीं येत असतां रोयानक बेटास आला, त्याच्या बरोबर या नवीन वसाहतवाल्यांनीं परत स्वदेशीं प्रयाण केलें. रोयानक बेटावर कोणीही राहिलें नाहीं. तिकडे रॅलेनें एक नवीन जहाज भरून शिधा-सामुग्री रोयानक बेटाकडे पाठविली. पण तेथें त्या जहाजास एकही रहि-वाशी आढळला नाहीं. नंतर ग्रेनव्हील स्वतःच एक जहाज भरून शिधा-सामुग्री घेऊन आला. त्यानें रोयानकचे आसपास फार शोध केला पण कोणीही आढळलें नाही. त्याला वाटलें की इंडियन लोकांनी आपल्या सर्व जातभाईचा फन्ना उडविला. मग जवळच्या लोकांपैकी निवडक पंधरा लोक तेथे ठेऊन ग्रेनव्हील स्वदेशी परतला.

या सर्व हाकिकतीचा इंग्लंडमध्यें वाईट परिणाम दिसून येऊं लागला. त्यांची परदेशांत जाऊन वसाहत करण्याची महत्वा-कांक्षा थंड पडत चालली. राले या कामी स्वस्थ बसला नाही. अमेरि-केच्या या किनाऱ्याची रसभरित वर्णने त्यानें प्रसिद्ध केलीं, व एकंदरीत चळवळ थंड पडूं दिली नाहीं. पूर्ण वसाहती करून राहण्यास आतां फारसा काल लागणार नाही असें त्यास वाटत होतें. थोडे दिवस राहून लोक

कंटाळून माघारीं येतात ही गोष्ट रालेच्या नजरेंत प्रामुख्यानें आली ह
त्यानें मोठमोठी कुटुंबेंच्या कुटुंबेच तेथे जाऊन राहतील अशी खटपट
व पुष्कळ लोक तयार केले. त्यांना एक नवीन सनद व पुष्कळ स
दिल्या व तुह्मी अमेरिकेत जाऊन एक शहरच वसवा, त्याला माझे
द्या, तेथें सुखासमाधानाने राहा, व आपल्या राज्याचे कल्याण चिंतन
असे ह्मटलें. अशा रीतीने अमेरिकेच्या किनाऱ्यावर ' राले ' शहर ' ब
ण्याचा त्यानें पुरा बंदोबस्त केला. इ. स. १५८७ चे जुलै महिन्यांत ही
वसाहती टोळी रोयानक येथें येऊन पोहचली. मागें सोडलेल्या
माणसांचे टोळीचा वसाहतवाल्यानीं शोध केला, पण त्यांचा थाग ला
शत्रू बनलेल्या इंडियन लोकांनी त्यांचा नाश केला असला पाहिजे
शेवटीं ठरले. वसाहतवाल्यांचा गव्हरनर जॉन व्हाईट म्हणून ह
त्याने रोयानक बेटाच्या उत्तरेकडील भागांत वस्ती करण्याचे ठरवि
सन १५८७ चे जुलै महिन्याचे २३ तारखेस ' राले ' नगरचा
घालण्यांत येऊन वसाहतीचे काम झपाट्याने सुरू झाले.

मूळचे रहिवाशी व वसाहतवाले यांच्यामध्यें पुन्हां धुसफूस
झाली, व रोज चकमकी झडूं लागल्या. दोन्ही बाजूंची थोडी अधिक
हानि झाल्यानंतर त्यांच्यामध्यें तह झाला. सर वॉल्टर रालेला वाटलें
दोन्ही राष्ट्रांमध्ये प्रेमाचे संबंध असल्याखेरीज निभाव लागणार नाही.
इंडियन लोकांचा अधिपति ' मान्टिओ ' याच्याशीं संधान बाधले. मानि
आपल्या देशाचा राजा आहे अशी कबुली वसाहतवाल्यानी दिल
शिवाय त्याला इंग्लंडातला लॉर्ड बनविण्यात आले ! त्याला लॉर्ड रोया
असें म्हणण्यांत येऊं लागले. इंग्रजांनां वाटले कीं मान्टिओ आप
क्लृप्तीस फसले, पण त्यांचा मूर्खपणा त्यांच्या लवकरच अनुभवास अ

नवीन वसाहतींत हे वसाहतवाले सुखानें नांदत नसत; ते नेहमीं अ
असत. त्यांना वाटे की आपल्यास भुलथापा देऊन फसवून आणलें
आपल्या जवळ असलेली शिधासामुग्री संपत आली आहे. आतां हिवाळ
काय खाणार ? अशी त्यांनीं कुरकूर आरंभिली; व गव्हरनरला प
इंग्लंडला जाऊन खाण्याचे पदार्थ व इतर सामग्री आणण्यास त्यांनीं भ

पाडलें. जन्मभर इंग्लंडमधून शिधासामुग्री आणून येथें जगावयाचें या कल्पनेनें अद्यापि त्यांना सोडलें नव्हतें ! वास्तविक पाहातां यावेळीं त्यांनी कांही धान्य व भाजीपाला पेरला असता व थोडी मेहनत केली असती तर हिवाळयांत त्यांना शिधासामुग्रीसाठी अडून बसावें लागलें नसते. पण नाखूष व असंतुष्ट लोकांकडून श्रम कसे होणार ?

याच सुमारास एक महत्वाची गोष्ट घडून आली. अमेरिकेच्या किनाऱ्यावर पहिलीच इंग्लिश बालिका जन्मास आली. वसाहतवाल्यांनीं या प्रथम बालिकेचे मोठे कौतुक केलें. तिचें नांव व्हार्जीनिया डेअर असे ठेवण्यात आले. तिची जन्म तारीख १८ ऑगस्ट ही संस्मरणीय मानण्यांत येऊं लागली.

या वसाहतीकारितां सामग्री आणण्यासाठीं गव्हरनर व्हाईट हा इंग्लंडास परत गेला. मागे राहिलेल्या एकशेआठ लोकांचें पुढे काय झाले याचा मुळींच पत्ता लागला नाहीं. दुर्दैवी राले शहराची एवढीच काय ती दुःखमय आठवण शिल्लक राहिली आहे.

ही इंग्रज राष्ट्राची आणीबाणीची वेळ होती सुप्रसिद्ध व आजिंक्य समजल्या जाणाऱ्या स्पॅनिश आर्माडाची इंग्रज राष्ट्रावर स्वारी होण्याचा तो काल होता. या धामधुमींत राले वसाहतीच्या लोकांकडे दुर्लक्ष झाले असण्याचा संभव आहे. तरीपण सर वाल्टर रॅले याने दोन जहाजे भरून शिधासामग्री वसाहतवाल्यांकडे शक्य तितक्या त्वरेने पाठविण्याची खबरदारी घेतली होती. पण काय ! या जहाजांनी थेट अमेरिकेला न जातां वाटेतच वाटमारेपणा चालविला त्याचे प्रायाश्चित्तही त्यांना स्पॅनिश जहाजांकडून लवकरच मिळाले हीं दोन्ही जहाजें पकडली जाऊन बुडविण्यांत आली, व तिकडे अन्नाच्या तुटवड्यामुळें वसाहतवाल्यांचें पुढें काय झालें हे समजण्यास मार्गच राहिला नाही. इ. स. १५९० साली गव्हरनर व्हाईट वसाहतवाल्यांचे शोधार्थ पुन्हा अमेरिकेस आला, पण या कॉलनीच्या नाशाची दुःखद वार्ता सांगावयास देखील कोणी शिल्लक उरले नव्हतें.

सर वाल्टर रालेने आतां हा नाद सोडून दिला व आपल्या मिळालेल्या सवलती दुसऱ्या एका इंग्रज कंपनीस देऊं केल्या. इ. स. १६०२

सालीं पुन्हां वसाहत स्थापण्याचा इंग्रज लोकांनीं प्रयत्न केला. अमेरिकेचा शोध लागल्यास आतां जवळ जवळ शंभर वर्षे होऊन गेलीं होतीं. आतां-पर्यंत स्पॅनिश, फ्रेंच, इंग्रज वगैरे लोकांचीं जहाजें प्रथम कॅनेरी बेट, नंतर वेस्ट इंडिज, असा लांबचा फेरा करून जात व त्यामुळें २००० मैल अंतर जास्त तोडावें लागत लागत असे. पण बार्थोलोमो गॉनसॉल्ड हा यावेळीं सरळ मार्गानें थेट इच्छित ठिकाणीं गेला व त्यामुळें अवघ्या सात आठवड्यांत अमेरिकेस पोहोचला. ज्यांनीं समुद्रप्रवास केला असेल त्यांना चार पाच दिवसांतच किती कंटाळा येतो याचा अनुभव असेल; पण त्यावेळीं सात आठवड्यांचा प्रवास म्हणजे अगदी अपाय्याचा प्रवास सम-जला जात होता. आतांसारखीं सुरक्षित व मोठीं जहाजें त्यावेळी नव्हतीं, शिडें लावलेल्या जहाजांनीं केवळ वाऱ्याचे शक्तीनें जावें लागत असे. शिवाय वाटेंत चांचेलोक व वादळें यांचें भय असे. कित्येकवेळां जहाजावर देवी, कॉलऱ्यासारखे रोग उद्भवत. कधीं कधीं खलाशीलोक आपसात बंड करीत. यावरून त्यावेळच्या लोकांच्या काटकपणाची व धैर्याची कल्पना येईल. गॉन सॉल्डचे मनांत वसाहत करावयाची होती, ह्मणून त्याने बरोबर पुष्कळ लोकही आणले होते. वसाहतीकरतां सुखकर जागा शोध-ण्यांत त्यानें पुष्कळ दिवस घालविले, व शेवटीं एलिझाबेथ बेटांपैकीं एकावर त्यानें तळ दिला. लवकरच त्यानें तेथील इंडियन लोकांशीं व्यापार सुरू केला. थोडे दिवस ही वसाहत बरी थाटली होती, पण ज्यावेळीं गॉनसॉल्ड व्यापाराचे जिन्नस भरून आपल्या कंकॉर्ड जहाजांतून परत फिरूं लागला त्यावेळी या वसाहतवाल्यांचे धाबें दणाणलें. ते आपणांस परत स्वदेशी नेऊन सोडण्याकरितां गॉनसॉल्डची विनवणी करूं लागले, व निरुपाय होऊन गॉनसॉल्ड त्यांना परत स्वदेशी घेऊन आला.

त्यानंतर ' स्पीडवेल ' व ' डिसकव्हरर ' ही दोन जहाजे व्यापाराचे जिन्नस भरून सुखरूपपणे परत आली. यानंतर वसाहतो करून राहण्यापेक्षां अमेरिकेत व्यापारापुरतेंच जाणे बरे असा लोकमतप्रवाह वाहूं लागला.

याप्रमाणे वसाहत करून राहाण्याचे अर्धशतकभर जे प्रयत्न ब्रिटिश लोकांनी केले त्यावरून त्यांचे चारित्र्यावर बराच प्रकाश पडतो. कोणतीही

गोष्ट क्रमाक्रमानें व धीमेपणानें करण्याची इंग्रज लोकांची संवय प्रामुख्यानें ध्यानांत आल्याशिवाय रहात नाही. अनेकवार सफरी करून थोडाथोडा पण प्रत्येक खेपेस नवानवा अनुभव त्यांनीं मिळविला होता. कित्येक वेळां त्यांचा भ्याडपणा तर कित्येक वेळां फाजील सावधगणा त्यांना नडला खरा पण एकंदर मानानें त्यांची प्रगतीच होत होती. ब्रिटिश लोकांचे उपरि-निर्दिष्ट स्वभावामुळें त्यांचा प्रवेश अमेरिकेंत होण्यास बराच काळ लागला. पण स्पॅनिश लोकांचा प्रकार कांहीं अंशीं निराळा होता. धडाडी व निर्भयपणा हे दोन गूण त्यांच्यामध्ये प्रामुख्यानें होते. कित्येक वेळां त्यात आचरटपणा व आडमुठेपणा दिसून येई, पण इंग्रज लोकांचा भित्रेपणा त्यांच्या अंगीं नव्हता हें खास. त्यामुळेंच त्यांनीं एक शतक आघाडी मारून दक्षिण अमेरिका व्यापून टाकिली. दर्यावर्दीपणाचे बाबतींत अनादिकालापासून इंग्रजांचा लौकिक चालत आला होता. त्यांच्यांत आनु-वंशिक गुणामुळे व्हायकिंग्स लोकांचें धैर्य, सॅक्सन लोकांचा काटकपणा व नॉर्मन लोकांचें धोरण ही सर्व एकवटली होतीं असें दिसून येतें. एकदां नीटपणें व्हर्जिनिया व न्यू इंग्लंडमध्ये त्याचें पाऊल रोवलें गेल्यानंतर त्यांनीं जी विलक्षण चिकाटी व सावधगणा दाखविला तो आपल्यास क्रमा-क्रमानें दिसून येईलच.



# फ्रेंच लोकांचे प्रयत्न

## प्रकरण २ रें



मागील प्रकरणीं ब्रिटिश लोकांनीं अमेरिकेंत वसाहती करण्याचे कामी केलेल्या प्रयत्नांचे वर्णन केलेले आहे. फ्रेंच लोकांनी या बाबतीत केलेल्या प्रयत्नांचे वर्णन या प्रकरणी करण्याचे योजिलें आहे.

ज्या काली अमेरिकेंत वसति करण्याचे इतर राष्ट्रांचे प्रयत्न चालू होते त्या काळीं फ्रान्स देशाची परिस्थिति अशा नवीन कामास हात घालण्यास सर्वस्वी अनुकूल होती यांत शंका नाही। पहिल्याप्रथम फ्रान्स देशाने या कामी केव्हां आरंभ केला हे नक्की समजण्यास जरी मार्ग नाही तरी कोलंबसाचे प्रवासाचे पाठोपाठ नॉर्मंडी व बिटनी येथील जहाजे न्यू फाउंडलंडचे आखातात मच्छीमारीस व व्यापारास जात असल्याचे आढळून येते, इ. स. १५०६ साली एका फ्रेंचमनने केलेला सेंट लॉरेन्सच्या आखाताचा नकाशा उपलब्ध झालेला आहे. इ. स. १५०८ चे सुमारास एका फ्रेंच जहाजाने काही अमेरिकन–इंडियन लोकास पकडून आणून ते लोक बारावा लुई यांचे चरणी सादर केले. या लोकांचेकडे पाहून लुई राजा फार आश्चर्य चकित झाला पुढे पहिल्या फ्रानसिस् राजाचे कारकीर्दीत ह्मणजे इ. स. १५१८ साली पहिल्या प्रथम वसाहत करण्याचे प्रश्नास चालना मिळाली. पुढे पांच वर्षांनी वायव्य दिशेच्या बाजूने आशिया खंडाचा शोध लावण्याकरतां म्हणून एक सफर करण्याची व वाटेवरील मुलुखाचा शोध लावण्याची योजना मुक्रर झाली. त्या कामी गिओव्हानी वेराझानो नावाच्या इटालियन गृहस्थाची नेमणूक झाली.

गिओव्हानी आपल्या ‘ डॉफिन ’ नामक जहाजांतून ‘ दिप ’ बंदरातून निघाला, तो प्रथम ‘ मॅडिरा ’ बेटावर पोहोचला पण हवा अनुकूल नसल्यामुळे तेथेच त्याला कांहीं महिने अडकून पडावे लागले. पुढें सुमारे

पंचावन दिवसाचा खडतर प्रवास पुरा करून त्यानें अमेरिकन किनाऱ्यावरचे ' विल्मिंगटन् ' गांव गाठलें, तेथून तो हल्ली जेथे न्यूयॉर्क आहे तेथपर्यंत गेला, मध्ये मध्ये तो जहाज थांबवी व इंडियन लोकांशी व्यापार करी. इंडियन लोक नेकीचे व निरुपद्रवी आहेत असे त्याचे अनुभवास आले, पण याचे उमनें फ्रेंच लोकांनी एक इंडियन मूल व एक तरुणी यांना पळवून घेऊन फेडले. पुढें हे जहाज न्यू इंग्लंडचे बाजूस गेले, तेथील इंडियन लोक संशयी वृत्तीचे व तुसडे असल्याचें आढळून आले. ते लोक मणी किंवा दागिने खरेदी न करिता, चाकू, सुऱ्या, व तलवारी याचीच मागणी विशेष करीत व त्याचेबद्दल ' संफ्रारास ' नावाची सुगंधी मुळे देत असत या मुळयाचे सुवासाबद्दल व औषधी गुणाबद्दल युरोपात फार ख्याती होती. सरतेशेवटी गिओव्हानी न्यू फाउंडलंडपर्यंत जाऊन इ स १५२४ साली परत फ्रान्सला आला गिओव्हानीने आपल्या प्रवासाच्या वर्णनाचे पुस्तक लिहिले व ते पहिल्या फ्रान्सिस राजास अर्पण केले, राजा फार खूष झाला, व डॉफिन जहाज अमेरिकेच्या ज्या प्रदेशावरून फिरून आले त्या प्रदेशास ' न्यू फ्रान्स ' असे नाव देण्यास त्याने परवानगी दिली.

त्यावेळी फ्रान्स देशाशी राजकीय परिस्थिति किंचित् ओढाताणीची झाली होती. इंग्लंडचा आठवा हेनरी, फ्रान्सचा पहिला फ्रानसिस् व जर्मनी व स्पेनचा राजा पांचवा चार्लस् यांच्यामध्ये परस्पर द्वेषाचा अग्नि धुमसत होता. प्रत्येक जण दुसऱ्या दोघास पाण्यांत पाही. अशा परिस्थितीत फ्रान्सचे बरेच नुकसान झाले व त्यामुळे सुमारें दहा वर्षपर्यंत परदेशगमनाचे कार्यास हात घालतां आला नाही

इ. स. १५३४ साली कार्टिअर नावाच्या कप्तानाने न्यू फाउंडलंडकडे प्रयाण केलें. त्यावेळीं हवा व वारा अनुकूल असल्यामुळे अगदी थोड्याच दिवसांत तो अमेरिकेस पोहोचला. त्यानें न्यू फाउंडलंडचे सबंध बेटाभोंवती प्रवास केला, पण आशिया खंडाकडे जाण्याचा निश्चित मार्ग न सांपडल्यामुळे त्याला परत यावें लागलें. अजून या दिशेनें आशिया खंडाग जाण्याचा प्रवाशांचा नाद सुटला नव्हता.

इंग्लंडप्रमाणें फ्रान्स देशातील तरुणाचे मनांतही परमुलखी सफरी ण्याचें वारें या सुमारास खेळूं लागलें. शेकडों तरुण जमा होऊन त्यांनी ; जहाजांचा तांडा उभा केला व सर्वजण इ. स. १५३५ सालीं प्रवासास साधल्यास वस्ती करण्यास अमेरिकेस निघाले. वाटेंत वादळ झाल्यामुळें ांना अमेरिका गांठण्यास फार दिवस प्रवास करावा लागला. ते ऑग- च्या दहा तारखेस ज्या नदीतून पुढे जात होते तीस त्यानीं सेंट लॉरेन्स प नांव दिले. कारण ऑगस्टची दहा ही तारीख ह्मणजे सेंट लॉरेन्सच्या ाचा दिवस होता. दोन इंडियन लोकांचे मदतीने या टोळीनें पुष्कळ तपर्यंत प्रवास केला. त्याना एक टेकडी लागली. त्या टेकडीवर जाऊन ्तात तो एक सुंदर खेडे दृष्टीस पडले. त्याच्या आसपासचा देखावा नमनोहर होता. या दृश्यानें आनंदित होऊन त्या जागेस त्यांनी ' मॉट- ल् ' असे नाव दिले. हल्लींचें मॉटरियल बंदर ते हेंच होय, या प्रदेशास ा राज्याचा मुलुख असे संबोधून तसे जाहीर करण्यांत आलें. नंतर हे ाशीं परत येण्यास निघाले. दुर्दैवाने त्याच्यामध्यें स्कर्व्ही नावाचा रोग दवला, व त्याचेपैकीं पंचवीस लोक मृत्युमुखी पडले. परत येण्याचे इंडियन लोकाचे राजानें या प्रवाशांचा मोठा पाहुणचार केला; व स मेजवानी दिली अगदी निघण्याचे अगोदर फ्रेंच लोकांनी या यन राजास बोटीवर येण्याचे आमंत्रण दिलें, व तसा तो बोटीवर ाच त्याला कैद करून त्यानीं बोटी स्वदेशी हांकारल्या. स्वदेशीं परत ल्यावर कार्टियरला आपल्या प्रवासाचे उपयुक्ततेसंबंधीं लोकांचें ाधान करतां आलें नाहीं. त्याच्या निसर्गवर्णनाकडे कोणी लक्ष देईना. ने बरोबर सोनें, चांदी, वगैरे कांहीएक आणलें नाहीं, येवढें समजल्यावर क त्याची हेटाळणी करूं लागले. त्यांचें ह्मणणे ज्या देशांतून सोनें, चांदी गतां येत नाहीं तो देश कसला? पुढें पांच वर्षांपर्यंत या विषयांत णी लक्ष घातले नाहीं.

कार्टिअर नंतर फ्रान्सिस डीला रोके, ' लॉर्ड ऑफ रोबरव्हाल ' यानें ां अटलांटिक महासागराच्या पलीकडच्या साम्राज्यवाढीस हातभार ण्याचा प्रयत्न केला. त्यानें एक सफरी टोळी तयार करून सेन्ट

लॉरेन्सकडे जाण्याचें जाहीर केलें. साधारणतः मुख्य अडचण पडे ती ही की योग्य तसले लोक या धाडशी कृत्याकरितां पुढे येत नसत. त्यावेळी 'रोबरव्हाल' यांस फ्रेंच सरकारनें असें कबूल केलें की कैदखाने तुमच्या मदतीकरितां उघडे आहेत, परदेशीं जाण्यास जितके कैदी तुमच्याबरोबर येण्यास तयार होतील त्या सर्वांस आम्ही बिनशर्त सोडण्यास तयार आहोत. अशा रीतीनें माणसांचा प्रश्न सुटल्यासारखा वाटला खरा, पण भलतीच जबाबदारी अंगावर पडल्यासारखे झाले. इतक्या चोर, ठग, लबाड, बदमाष, खुनी वगैरे माणसांना ताब्यांत ठेवावयाचे कसे असें रोबरव्हाल यांस वाटल्यावांचून राहिले नाही.

अशा रीतीनें पार्टी तर तयार झाली, व या वसाहतवाल्यांत फ्रान्स-मधील समाजाचा तळचा गाळ आपोआप वाहून चालावयास लागला. रोबरव्हालनी कार्टिअरला चीफ पायलट व कॅप्टन जनरल करून आपल्या सफरीबरोबर घेतले होते, व त्याच्या हाताखालीं पाच गलबतें दिलीं होती. कार्टिअरचा प्रवास सुखकर रातीने पार पडून तो क्वीबेक येथे येऊन पोहोचला. तेथे त्याने चार्लेस बुग नांवाचा किल्ला उभा करण्यास सुरुवात केली. येथे या वसाहतवाल्यानीं सर्वच हिवाळा काढला. पुढे रोबरव्हाल व कार्टिअर याचे ठीक जमेना रोबरव्हाल कार्टिअरला फार वाईट रीतीने वागवूं लागला तें त्याला सहन न होऊन तो एके दिवशी एका गलबता-तून तेथून निसटला. तिकडे रोबरव्हाल व त्याचे गुन्हेगार साथीदार यांची गांठ पडली त्यांनी बंड आरंभिलें, त्यामुळें त्यापैकी कित्येक लोकास फाशीं देणे रोबरव्हाल यांस भाग पडले. तसेंच बऱ्याच गुन्हेगारास त्यानी फटके मारून ताळयावर आणलें. पुढील उन्हाळ्यांत हे सर्व लोक परत फिरले.

त्यानंतर दुसऱ्या वर्षी सर फ्रान्सिसने दुसरी सफर केली. यावेळी त्याला धार्मिक छळ झालेल्या लोकांचें सहाय्य मिळालें. कारण त्यावेळीं 'प्रॉटेस्टंट' ह्मणजे 'सुधारणावादी' खिस्ती लोकांचा फ्रान्सचे रोमन कॅथॉ-लिक राजानें व पाद्र्यांनीं छळ आरंभिला होता, ह्या वेळीं सर फ्रान्सिस फ्लारिडा व कॅरोलिना या भागांत उतरला. तेथें त्याचे प्रयत्नास कांहींसें यश

मिळालें. प्रॉटेस्टंट लोकांवर जरी फ्रान्सच्या राजाचा राग होता तरी त्याने त्यांचे परदेशगमनास हरकत केली नाही. आयती पीडा बाहेर जात आहे तेच ठीक आहे असे त्याला त्यावेळेस वाटले.

अकराव्या चार्लस राजाची आठवण ह्मणून नवीन प्रदेशाचे नांव या लोकांनी कॅरोलिना असे ठेवले, व पोर्ट रॉयल या ठिकाणी किल्ला बांधिला. येथे एक २६ माणसाची लष्करी तुकडी ठेऊन सर फ्रान्सिस परत स्वदेशी गेला, त्यावेळी फ्रान्समध्ये युद्ध सुरूं असल्यामुळे वसाहतीतील लोकास सामग्री पाठविण्याचे जमलें नाही. या लष्करी तुकडींतील लोकानी बंड केले, व आपल्यावरील अधिकाऱ्यास ठार मारलें. आतांपर्यंत वाट पाहून पाहून सर्व लोक थकून गेले होते. त्यांनी एक लहानशी नौका तयार केली व समुद्रमार्गे प्रवास सुरूं केला त्या लोकाची फार दुर्दशा झाली होती. समुद्रात वारा नेईल तिकडे ते वहात चालले होते सरतेशेवटी सुदैवाने एका इंग्लिश जहाजाची व त्याची गांठ पडून ते कसे बसे स्वदेशी येऊन पोहोचले.

अॅडमिरल कोलिनी याने केलेल्या प्रयत्नांत त्याला यश लाभलें नाही अगदीच नादान लोकांशी त्याची गाठ पडली त्याने नवीन सफर पोर्ट रॉयलपर्यंत केली, पण थोड्याच दिवसात तेथील वसाहत मोडून सेंट जॉन्स नदीमध्ये प्रवेश करून तेथे दुसरी वसाहत स्थापन केली, व एक किल्लाही बांधावयास सुरुवात केली थोड्याच दिवसांत त्याच्या हाताखालील लोक त्याचीच दोन जहाजे पळवून नेऊन चांचेगिरी करूं लागले. फ्रान्सला परत जाण्याचा त्यांचा इरादा नव्हताच. हे लोक पुढे पकडले गेले त्यांना स्वदेशी आणून फासावर लटकविण्यांत आलें. कोलिनीचे उरलेले लोक वसाहत मोडून पळून जाण्याचे बेतांत होते. तोंपर्यंत रीबो नांवाच्या गृहस्थाबरोबर सामुग्रीने भरलेलें जहाज आले व या पार्टीचा थोडे दिवस निभाव लागला. स्पॅनिश अधिकारी ' मेलेंडेझ ' यानें लगतच्या प्रान्तांत वसाहत केलेली होती, त्याला जेव्हां या फ्रेंच लोकांचा सुगावा लागला तेव्हां त्यानें या उरलेल्या लोकांवर स्वारी केली, व त्यांचा पाडाव केला, परकी लोकांनी केलेल्या स्पॅनिश प्रदेशांतील अतिक्रमणाबद्दल या सर्व लोकांस ठार मारण्यांत आलें.

धार्मिक छळास कंटाळून परदेशी गेलेल्या फ्रेंच लोकांवर स्पॅनिश लोकांनी केलेला जुलूम सहन न होऊन फ्रान्स देशांतील प्रॉटेस्टंट पंथांत गडबड माजली. डॉमिनिक डी गौरजिस यानें या खुनी कृत्याचा सूड घेण्याचे ठरविले. त्याने फ्लारिडा येथील स्पॅनिश वसाहतीवर हल्ला करण्याचें ठरवून तो त्या तयारीला लागला. त्यानें स्वतःच्या खर्चाने सर्व तयारी केली. फक्त तीन गलबते व निवडक पन्नास लोक बरोबर घेऊन तो फ्लारिडास पोहोचला, यावेळी कडक हिवाळा होता सेंट जॉन्स नदीतील तीनही स्पॅनिश किल्ल्यावर त्याने एका मागून एक हल्ले केले व सर्व स्पॅनिश शिपाई पकडून त्यांना कैद केले शेवटी फार दिवस येथे राहतां येणें शक्य नाही असे ध्यानी येतांच या सर्व शिपायांस गुन्हेगार ठरवून त्याने झाडांस टांगून ठार मारले व तेथेच एका फळीवर ' स्पॅनिश की राक्षस ? ' असे मोठ्या अक्षरांनी लिहून ठेविलें.

यानंतर इ. स. १५९८ साली, मार्किस डीला रोशे या फ्रेंच सरदारानें समुद्रापलीकडील राज्यस्थापनेसाठी प्रयत्न केला पुन्हां तुरुंगांतील लागतील तितके कैदी नेण्याची त्याला परवानगी मिळाली. या नूतन सुटका पावलेल्या गुन्हेगार मंडळीबरोबर मार्किस ' नोव्हास्कोशिया '-पर्यंत आला. येथे त्याने बरोबर आणलेल्या चाळीस लोकांस वसाहत करावयास लाविली व स्वदेशी परत आला थोड्याच दिवसात त्याला मृत्यूनें गाठले व मागे अमेरिकेंत राहिलेल्या लोकांची वास्तपुस्त करण्यास कोणी राहिला नाहीं. पुढे सात वर्षापर्यंत या टोळीने नवीन वसाहतींत दिवस काढले. पुढे एका जहाजाचे कप्तानास त्यांची दया येऊन त्यानें त्यांना फ्रान्समध्ये आणून सोडिले. झाली इतकी शिक्षा पुरे झाली असे समजून त्याना फिरून तुरुंगांत पाठविण्यांत आले नाही ही मेहेरबानीच म्हणावयाची.

एकंदरीत इ. स. १६०३ पर्यंत फ्रेंच राष्ट्रातर्फे अमेरिकेंत वसाहत होण्याचा योग आला नाही या सालीं फ्रेंच सरदार पिरी डू गास्ट उर्फ डी मॉंटस् याला फ्रेंच सरकारने फिलाडेलफियापासून तों मॉंट्रिआलपर्यंत सर्व मुलुख मांडलिक या नात्यानें बहाल केला होता व अमेरिकेंत जाऊन

कायम वसाहत करून राहाण्याचे व विशेषतः लोकरीचा व्यापार करण्याचे सर्व हक्कही त्याला देण्यांत आले होते. पुढील सालचे मार्च महिन्यांत त्यानें दोन मोठीं जहाजें बरोबर घेऊन अमेरिकेचा मार्ग धरिला. त्यानें नोव्हास्कोशियांत पोर्ट रॉयल येथें वस्ती केली, व लोकरीचा व्यापार आरंभिला, या व्यापारांत त्याला विशेष किफायत होऊं लागली.

यानंतर सॅम्युअल् चॅमूप्लेन यानें क्वॉबेक येथे वसाहत केली, इ. स. १६०८ सालीं परत स्वदेशी जाऊन नवीन स्थापिलेल्या वसाहतीची त्यानें बरीच जाहिरात फडकाविली. लाकरीचे व्यापाराचा जम नीट बसल्यामुळें त्याचे जाहिरातीस कोणी हरकत घेतली नाही. इ. स. १६१२ साली फ्रान्समध्ये प्रॉस्टेस्टंट धर्माच्या पक्षाची राजकारणांत सरशी झाल्या-कारणानें वसाहती वाढविण्याचे कामास बरे दिवस आले. त्यापूर्वी सॅम्युअल् चॅमूप्लेन याने बरोबर इंडियन समाजास ख्रिस्ती धर्माचा उपदेश करण्या-करतां ह्मणून कांही धर्मोपदेशकही घेतले होते. थोडे दिवस अमेरिकेत त्यांचा नीट जम बसला परंतु पुढे या पाद्री लाकांमध्यें व खुद्द चॅमूप्लेन याजमध्येच तंटा सुरूं झाला. या तंट्यात चॅमूप्लेनचा पराभव होऊन तो इंडियन लोकास जाऊन मिळाला व तेथेच त्याने हूरॉन इंडियन लोकात बरेच दिवस काढले. पुढें तीन वर्षांनीं तो वसाहतीत परत आला

इ. स. १६२४ साली सेंट लुई किल्ल्याचे बांधकाम पूर्ण झाले. या किल्ल्याचे आसपास सेंट लॉरन्स नदीचे टापूंत आतां कायम फ्रेंच अधिराज्य स्थापन झालें.

फ्रेंच लोकांप्रमाणेच ' डच ' लोकांनी सुद्धां अमेरिकेत वसाहती करण्याचे बरेच प्रयत्न केले. पहिली डच वसाहत न्यूयॉर्क नजीकचे मॅन्‌हॅटन् बेटावर स्थापिली गेली. हडसन आखाताचा व हडसन नदीचा शोधक सुप्रसिद्ध इंग्रज हडसन याला एका डच कंपनीने नोकरीस ठेविलें. यापूर्वी इंग्लिश जहाजांबरोबर हडसननें अमेरिकेची सफर केली होती, पण त्याचें इंग्लंडांत व्हावें तितकें चीज न झाल्यामुळें तो डच कंपनीकडे नोकरीस राहिला. या कंपनीचें नांव ' डच ईस्ट इंडिया कंपनी ' असे होतें.

हडसनला ' हाफमून ' नांवाचें जहाज कंपनीनें दिलें, व त्याला हिंदुस्थानला जाण्याचा थेट जलमार्ग शोधून काढण्याचें काम दिलें. इ. स. १६०९ चे एप्रिल महिन्यांत युरोपचे उत्तर दिशेनें त्याने आपलें जहाज हांकारलें. नॉर्वेचे टोंकावरून तो तसाच पुढे, लायलंड व नोव्हाझेम्लाकडे गेला. परंतु तरत्या बर्फाचे डोंगराचे अडथळ्यामुळे त्याला तेथून परतावें लागले. पूर्वेकडे जाण्याला उत्तरेकडचा मार्ग असावा तितका सुरक्षित व सुगम नाही असें आढळून आल्यावर तो पश्चिमेचे बाजूनें अमेरिकन किनाऱ्यास लागला. मध्येच एकादी खाडी किंवा दुसरा मार्ग सांपडून जर अमेरिकेच्या पॅसिफिक किनाऱ्यास लागतां आले तर आपलें काम सिद्धीस जाण्याचा काहीं संभव आहे असे त्याला आढळून आले.

जुलै महिन्यांत हडसन न्यू फाउंडलंडचे किनाऱ्यास पोहोंचला. तेथून तो केप कॉड येथें आला. तेथून किनाऱ्या किनाऱ्यानें डिलावेर बे मध्यें आला नंतर तो न्यूयॉकपर्यंत येऊन पोहोचला. तेथून तो ज्या नदींतून प्रवासास निघाला तिलाच पुढे हडसन नदी असे नाव पडलें. या नदींतून एक आठवडाभर तो पुढें उत्तरकडे जात होता या नदीचे दोन्हीं बाजूस घनदाट अरण्य होतें. तो मुलुख अत्यंत सुपीक व सुंदर दिसला. मधूनमधून मक्याचीं हिरवींगार शेते दृष्टीस पडत. तेथून तो आलबॅनी येथें पोहोचला त्यानंतर तो हालंडला परत निघाला. आपण केलेला प्रवास व लावलेला शोध आपल्या इंग्रज जातभाईच्या नजरेस यावा असें त्याला मनापासून वाटत होतें, येताना तो इंग्लंडच्या किनाऱ्यावर डार्टमथ येथें थांबला परका जहाज समजून त्याला इंग्लंडच्या किनाऱ्यावरून पुढें जाऊं देण्यांत आलें नाहीं, आपला रिपोर्ट त्याला पत्रद्वारेंच पाठवावा लागला. त्यानंतर इंग्रज व्यापाऱ्यांनीं त्याला ' डिस्कव्हरी ' नांवाचे दुसरें जहाज दिलें, व पुन्हां तो अमेरिकेला गेला यावेळीं फ्रोबिशर ज्या मार्गानें गेला होता तो मार्ग धरून तो हडसन बे पर्यंत गेला. तेथपर्यंत कोणतेंही जहाज आतापर्यंत गेलें नव्हतें. तेथून पुढें जातांना त्याला सर्व बाजूंनी अफाट समुद्र दिसूं लागला. तेव्हां त्याला वाटलें कीं आपण पॅसिफिक

महासागरांत आलों, व आतां आशिया खंडास जाण्यास फार वेळ लागणार नाहीं, पण थोडेच दिवसांत समुद्र आकुंचित होत आहे असे त्याला आढकून आलें, आपण एका आखातांत घुटमळत आहोंत असें त्याचे नजरेस येतांच त्याची निराशा झाली. आतांपर्यंत त्याची सर्व सामुग्री संपून गेली होती. त्यांतून त्याचे हातांखालील लोकांचा धीर सुटला व त्यांनीं बंड आरंभिले. हडसन, त्याचा मुलगा, व दुसरे सात असामी या सर्वांना खलाशांनी समुद्रात फेकून दिले. अशारीतीने या धाडशी खलाशाचा व भूगोलविशारदाचा शेवट झाला.



# वसाहतीचा काल

## प्रकरण ३ रें



इ. स. १६०० शे नंतर म्हणजे सतराव्या शतकाचे आरंभी अमेरिकेच्या पूर्व किनाऱ्याची जवळ जवळ वांटणीच होऊन चुकली होती, असे म्हणण्यास हरकत नाही. फ्रेंच लोकानी उत्तरेकडचा म्हणजे कॅनडाचा पूर्व किनारा व सेंट लॉरेन्सचें आखात व्यापिले होते. इंग्रज लोकांनी व्हर्जीनिया व मॅसेचुसेट स्थानेंही व्यापिलीं होती. डच लोकांनी हडसन नदीच्या मुखाचा प्रदेश व हल्ली जेथे न्यूयार्क आहे तो प्रदेश व्यापिला होता. स्पॅनिश लोकानी फ्लॉरिडा व मेक्सिको नजीकचा भाग व कॅरोलिना येथे वस्ती करून दक्षिणेकडचा भाग ताब्यांत घेतला होता. इतर देशांचे मानाने स्पेनने अधिक मोठा भाग व्यापिला होता. युरोपांतील इतर राष्ट्रांचे मानाने स्पेनची वसाहतीत व व्यापारात फारच अधिक प्रगति झालेली होती. याचे उघड उघड कारण हे आहे की, त्याचा पाय सर्वात आधी अमेरिकेंत रोविला गेला होता. तरीपण इंग्रज लोकांच्या वसाहती हळू हळू अधिक मजबूत पायावर कशा होत गेल्या हे पुढे दिसून येईल, सुदैवाने त्याना मिळालेला प्रांत त्यांच्या देशाच्या हवापाण्यापासून फार भिन्न नव्हता त्यामुळें थोड्या दिवसांतच त्यांना समाधान लाभले. दुसरें असे की ते ज्या प्रांतांत उतरले तेथून आंतपर्यंत प्रवेश करणे फार सुगम झाले

गेल्या सबंध शतकाचे अनुभवानें फक्त अमेरिकेंत वसाहती करून राहतां येण्याची शक्यताच फक्त सिद्ध झाली होती. परंतु एकंदरीत हे काम फार अवघडच होतें, व या कामीं अडचणीही पुष्कळ होत्या. पहिली गोष्ट ह्मणजे नवीन मुलुख युरोपपासून दोन महिन्यांच्या प्रवासाच्या अंतरावर होता, त्यामुळें प्रवासांत वेळ फार जाई व खर्चही प्रमाणाबाहेर होई, तसेंच नवीन ठिकाणीं सामुग्रीही अपरंपार न्यावी लागे. घरगुती

जनावरें वगैरे नव्या प्रदेशांत नव्हतीं, किंवा ताबडतोब सांपडलीं तरी नसावींत; त्यामुळे गाई, डुकरें, कुत्रीं वगैरे न्यावीं लागत. केवळ एका वर्षाचीच नव्हे तर एखादे वर्षी पीक न आलें तर उपाशीं मरण्याची पाळी येऊं नये म्हणून, दोन दोन वर्षे पुरेल येवढी सामुग्री न्यावी लागे. त्याचप्रमाणें नवीन देशात शेतीची लागवड करण्याची पुरी माहिती नसल्यामुळे, कित्येक वेळां पिकें अर्धवट स्थितीत नासून जात किंवा बिलकूल उगवतच नसत. पिकें बरोबर काढण्याची पद्धति उपलब्ध होईपर्यंत कांहीं काल असा जाणें हें अपरिहार्य होतें, त्याशिवाय ेत जमीन तयार करण्यास जंगल कापून टाकावें लागे व रानटी इंडियन लोकांच्या टोळ्यांपासून स्वसंरक्षण करण्यास सदैव तत्पर राहावे लागे. अशातऱ्हेनें अडचणींचे डोंगर मध्यें आडवे आले तरी त्यांतून सुद्धां त्या शूर वसाहतवाल्यांनी मार्ग काढेला ही केवढी अनुसरणीय गोष्ट हाय ?

या नवीन वसाहती वसविणे म्हणजे अर्थात् मोठ्या भांडवलाचा प्रश्न होऊन बसला होता. थोड्याशा खटपटीने एकाद्या राजाला खुष करून त्याच्यापासून अमेरिकेंतील वाटेल तेवढ्या प्रदेशावर ताबा मिळविणे त्यावेळीं सोपें होतें, पण बरेच लोक या वसाहतीत नेऊन त्याना जीवन सुखावह रीतीनें कंठण्याचा मार्ग उपलब्ध करून देणें सोपी गोष्ट नव्हती. प्रथम कोणी जाण्यासच तयार होत नसत वरें, झालच तर त्याच्यापासूनच त्यांनां अमेरिकेंत नेणाऱ्या माणसास धक्का पोहोचल्याची अनेक उदाहरणें घडलेलीं होतींच, तीं मागील प्रकरणांत नमूद केलेली आहेत. वसाहतींसाठीं लागणारें भांडवल मुख्यत्वेंकरून, जहाजे, हत्यारें, आउते, व जीवनास लागणारी इतर सामुग्री, या गोष्टीकरितां लागे. सफरी करण्याचा उद्देश व्यापार करण्याचा असो, खाणी खोदण्याचा असो, लोकर व मौल्यवान पदार्थ जमा करण्याचा असो किंवा वसाहती करण्याचा असो, प्रत्येक गोष्ट मोठ्या भांडवलाखेरीज होणें शक्य नव्हतें. साधारणतः थोडा बहुत पैसा असलेले भांडवलवाले स्वतः एकट्याच्या जबाबदारीवर हें काम अंगावर घेत नसत तर समाईक भांडवलाच्या कंपनीच्या पद्धतीचा अवलंब

करीत, त्यामुळें व्यक्तिशः जबाबदारी कमी होई, व लहान भांडवल-वाल्यांची सुद्धां सोय होई. अशा रीतीने तत्कालीन धंद्यांपैकीं वसाहती करणें हा एक मोठा धंदा होऊन बसला व त्यांत पुष्कळ भांडवलही गुंतून गेलें.

या बाबतींत स्पेन देशाची परिस्थिति मात्र अगदी निराळ्या प्रकारची होती. तेथें वसाहती उभारणे, त्यांची जोपासना करणें व त्याचे संरक्षण करणें ही सर्व कामे सरकारने हातीं घेतलीं होतीं. वैयक्तिक धाडसास व व्यापारास तेथे प्रोत्साहन मिळाले नाही. स्पेनमधून अमेरिकेस जाणारा सर्व माल सेव्हिल बंदरातूनच बाहेर गेला पाहिजे असा निर्बंध होता, त्याचप्रमाणे अमेरिकेच्या किनाऱ्यावरील व्हेरा क्रूझ किंवा पोर्टोबेलो येथेंच उतरला पाहिजे असाही निर्बंध होता. बहुतेक दरसाल जहाजाचे दोन ताफे पाठविण्यांत येत. एक व्हेरा क्रूझ येथें उतरे व दुसरा पोर्टोबेला येथे उतरे. या सर्व जहाजाची व्यवस्था करणे, त्यांचें नियंत्रण करणें, व त्यांच्यामध्ये घडलेल्या बेकायदेशीर कृत्याची चाकशी करणें, याकरितां सेव्हिल येथें सरकारी खातेंच उघडण्यात आले होते. प्रत्येक व्यापाऱ्यास एक खास परवाना मिळवावा लागे फक्त सेव्हिल येथील व्यापाऱ्यांशिवाय तो बहुतेक कोणास मिळत नसे. स्पेनमधील पूर्व व पश्चिमेकडील देशांशी व्यापार करणाऱ्या सर्व व्यापाऱ्यांना अशा तऱ्हेनें परवाना काढावा लागे; व पूर्ण सरकारी नियंत्रणाखाली व संरक्षणाखाली काम करावें लागे. लूसिआनामध्यें जी पहिली स्पॅनिश वसाहत झाली ती अशा तऱ्हेच्या नियंत्रणाखालीच झाली पण पुढें हळूहळू स्पॅनिश नियंत्रणाची मगरमिठी ढिली होत चालली.

इंग्लंड व फ्रान्समध्यें मुख्यत्वेंकरून समाईक भांडवलवाल्या मोठमोठ्या कंपन्यांनीच वसाहती थाटण्याचे काम हातीं घेतलें. निव्वळ व्यापारी धोरणानें सुद्धां ही गोष्ट अत्यंत इष्ट होती. कधीं मधीं व्यापारासाठीं जाऊन आठ पंधरा दिवसांचे अवधींत अन्तस्थ प्रदेशाची माहिती होणें शक्य नव्हतें. तसेंच तेथें कोणते व्यापारी जिन्नस पैदा होतात व ते परत इंग्लंड किंवा फ्रान्समध्यें नेऊन विकण्यास परवडेल किंवा नाहीं ही सर्व माहिती

मिळण्यास, ते जिन्नस पैदा करणें, सांठवून ठेवणें व गलबते येतांच त्यांत सुरक्षित भरून देणें येवढीं कामें करण्याकरितां तरी प्रत्येक देशास आपल्या जातभाईची अमेरिकेस कायम वस्ती करविणें क्रमप्राप्तच होतें वसाहती घडल्यानंतर त्यानी पिकविलेले धान्य, कापूस व इतर कच्चा माल याचा व्यापार युरोपशी करणें ही नंतरची पायरी होती.

समाईक भाडवलाची कंपनी उभी झाल्याबरोबर तिचे चालक प्रथम एक सनद मिळवीत, ही सनद म्हणजे ठरीव मुलखांत ठरीव तऱ्हेचा व्यापार करण्यासंबंधीं परवाना असे. तसेंच त्या परवान्याबरोबर कंपनीस कांहीं सवलती मिळत. युरोपातून वसाहतीत माल नेण्यास अशा कंपन्यांस निर्गत जकात माफ होई, व सरक्षणाचे बाबत सरकार हमी घेई उदाहरणार्थ, पहिल्या व्हर्जीनिया कंपनीस खालीलप्रमाणे सवलती होत्या. एका ठरीव मुलखात व्यापार करण्याचा या कंपनीला खास मक्ता मिळाला होता. स्वतःचे संरक्षणाची व लागेल तो हत्यारी बन्दोबस्त करण्याची तिला परवानगी होती. तसेच इंग्लंडमधून एका ठरीव संख्येपर्यंत प्रजाजनांस वसाहती करण्याकरितां नेण्याची मुभा होती. या सवलतीबद्दल उलट सरकारास काही मोबदलाही द्यावा लागे. सोने किंवा चांदी सापडल्यास त्याचा एक पंचमांश व तांबे सापडल्यास त्याचा एक पंधरांश भाग द्यावा लागे. कंपनी स्थापन होताच तिला प्रथम मजूर मिळविण्याचे, त्यांना हत्यारे, अवजारे व एकाद्या वर्षापुरती सामुग्री पुरविण्याचे हें मुख्य काम प्रथम करावे लागत असे.

इंग्लंडमध्यें वसाहती करण्याचे काम मोठमोठ्या कंपन्यांनी यशस्वी रीतीने करून दाखविल्यावर मग तेथे दुसरी पद्धति रूढ होऊ लागली. वैयक्तिक भांडवलवाल्यांस मग जोर चढला, व लागेल तितकें भांडवल घालण्यास जो तो तयार होऊं लागला. अशा श्रीमंत गृहस्थांस अमेरिकेत मोठमोठ्या जमिनीहीही मिळत. नंतर ते आपल्या जमिनी इतरांस खंडाने देऊन त्यावर खूप फायदा मिळवीत.

फ्रान्स देशांत वसाहतीचे प्रश्नास जोराची चालना मिळण्यास मुख्य कारण म्हणजे धार्मिक छळ हे होते. कारण तेथील रोमन कॅथॉलिक राजा व

पाद्री यांनीं नवमतवादी ह्मणजे प्रॉटेस्टंट लोकांचा छळ मांडला. त्याला कंटाळून त्यांनी कोठेतरी लांब परदेशीं जाऊन वसाहत करण्याचें ठरविले.

इ. स. १५६८ चे पूर्वीच फ्लॉरिडात या धर्माचे बाबत गांजलेल्या लोकांनीं आपल्या वसाहती स्थापिल्या व इंडियन लोकांशी व्यापारही सुरू केला.

व्हर्जीनिया व मॅसॅचुसेट्स् या प्रांताची वस्ती व वाढ कसकशी होत गेली हे आतां पाहूं. सतरावे शतकाचे उदयानंतर वसाहतींस अधिक अनुकूल स्थिति येऊं लागली जेम्स राजाने गादीवर येतांच अमेरिकेतील वसाहतीस सक्रिय मदत करण्यास सुरुवात केली. पहिल्या कंपनीचे नांव ‘ लंडन ’ कंपनी व दुसऱ्या कंपनीचे नांव ‘ प्लिमाऊथ ’ कंपनी, ३४° आणि ३८ रेखांशाच्या दरम्यानचा प्रदेश थेट अटलांटिक पासून पॅसिफिक महासागरापर्यंत लंडन कंपनीस मिळाला, व ४१° आणि ४५° रेखांशाच्या दरम्यानचा प्रदेश प्लिमाऊथ कंपनीस मिळाला. त्यामधील ३° रेखाशांच्या चिचोळ्या प्रदेशांत वावरण्याची दोघासही मुभा दिली होती. मात्र एका कंपनीने दुसऱ्या कंपनीचे हद्दीपासून शंभर मैलांचे आंत वसाहत करूं नये असा नियम घालून दिला होता. लंडन कंपनीची घटना करण्यामध्यें बार्थो लोमो गॉन्साल्ड हा प्रमुख होता. ह्याच्या पूर्वीच्या प्रवासाचें वर्णन मागील प्रकरणी आलेंच आहे त्याला इंग्लंडांतील बड्या लोकाचे मोठे सहाय्यही होतें. या नवीन कंपन्यानी इंग्लंडच्या राजाची पूर्ण सत्ता मानावयाची होती. त्याचप्रमाणे कंपनीच्या कारभाराचे मुख्य ऑफिस लंडनमध्यें ठेविले पाहिजे असा नियम होता. या कंपन्याचे प्रमुखांस इंग्लंडचे राजाचे संमतीशिवाय नेमतां येत नसे. तसेच कोणत्याही प्रमुख अधिकाऱ्यास कामावरून दूर करण्याची सत्ता पण राजाकडे ठेवण्यांत आली होती. नव्या मुलुखावर इंग्लंडचे राजाची पूर्ण राजसत्ता अबाधित चालावयाची होती. पहिल्या पांच वर्षामध्ये वसाहतींतील मालमत्तेची समाईक सत्ता सर्वांची राहावयाची होती. त्याचप्रमाणे प्रत्येक माणसाचा इंग्लिश रहिवाशी ह्मणून हक्क अबाधित रहावयाचा होता.

## प्लिमाऊथ कंपनीची दुर्दशाः—

इ. स. १६०६ चे ऑगस्ट महिन्यांत या कंपनीनें आपलें पहिलें जहाज अमेरिकेस पाठविले. ते एका स्पॅनिश लढाऊ गलबतानें काबीज केलें. त्यानंतर दुसरें जहाज पाठविण्यात आले, त्या जहाजानें एक हिंवाळा कसा-बसा काढला. पुढे उन्हाळयांत सुमारे शंभर उतारू घेऊन दुसरे एक जहाज अमेरिकेस आले. त्या लोकानीं केनेबेक नदीचे मुखाशी वसाहत स्थापून सेंट जॉर्ज नावाचा किल्ला बांधण्यासहा सुरुवात केली. काहीं कालपर्यंत त्याचें बरें चालले होते, पण लवकरच त्यातील अर्ध्या लोकानी इंग्लंडला पळ काढला पुढे अत्यंत कडक हिंवाळा सुरू झाला, त्यांत उरलेल्या लोकाचे फार हाल झाले, दुर्दैवाची गोष्ट हा की त्याच्या कोठाराला आग लागून सर्व सामुग्रा जळून गेली. काहीं उपासमारीने व बाकीचे थंडीने मृत्यू पावले.

त्या मानाने लंडन कंपनीस बरे दिवस आले असें ह्मणण्यास हरकत नाहीं. इ. स. १६०३ चे डिसेंबर महिन्यांचे नऊ तारखेस न्यू पोर्टहून तिचें पहिले जहाज निघाले, ते कनेरी बेटाला वळसा घालून सुमारें चार महिन्यांनीं अमेरिकेस पोहोचले. या जहाजाबरोबर एकशें पांच वसाहती-लोक होते. प्रथम अमेरिकेच्या किनाऱ्यावरील रोयानक बेटास हें जहाज लागलें, पण पुढे वादळ होऊन ते जेम्स नदीच्या मुखांत शिरलें. सुमारे पन्नास मैल आंत गेल्यानंतर, इंग्लंडची पहिली वसाहत जी ' जेम्स टाऊन ' तेथें ही मंडळी उतरली व त्यांनी ' जेम्स टाऊन ' बांधिलें.

सुप्रसिद्ध कॅबट याने या जागेचा शोध लावल्यानंतर तेथे खरोखरीची वसाहत होऊन राहाण्यास एकशें दहा वर्षे मोडलीं. त्या कालची अशांत परिस्थिति, भौतिक शास्त्रांची कोती माहिती व सर्वसाधारण अज्ञान ही ध्यानांत आणल्यास असे होणे अपरिहार्य होतें हें उघडच दिसून येतें.

जेम्स टाऊन मधील वसाहत भरभराटीस येऊं लागली, त्याचें श्रेय लंडन कंपनीचा प्रमुख कॅप्टन स्मिथ याजकडेच बहुतांशीं येतें. हा गृहस्थ कच्चा दिलाचा नव्हता. व्हर्जीनिया वसाहतीत असतांना त्याला जबर

बस होऊन इंग्लंडास जाणें भाग पडले, पण तेवढ्यानें त्याचा धीर चला नाहीं. तो फिरून इ. स. १६१४ सालीं अमेरिकेस आला व मेनचे शेण किनाऱ्यास त्यानें वस्ती केली. त्यानें इंडियन लोकांशीं केलेल्या पारांत त्याला चांगला फायदा होत असे, व त्यांतील बराचसा भाग पल्या खलाश्यास तो वाटून देत असल्यामुळें त्याचे हाताखालील लोक र संतुष्ट असत. कॅप्टन स्मिथनें केप कॉडचे आसपासचे बऱ्याच ठ्या प्रांताचा फार काळजीपूर्वक नकाशा तयार केला. हा नकाशा तयार ण्यात त्यानें असाधारण कौशल्य दाखविलें होतें. त्या नकाशाच्या थादर्शित्वाबद्दल अगदीं अर्वाचीन कारागीर सुद्धां आश्चर्य करितात. या नि प्रदेशास ' न्यू इंग्लंड ' असें अन्वर्थक नाव देण्यांत आले.

याच सुमारास इग्लंडमधील प्यूरिटन् धर्मपंथावर अत्यंत जुलूम ऊं लागला. त्या जुलूमास कंटाळून ते लोक हॉलंडमध्यें जाऊन राहिले. या शांतही त्यांचा बस्तान जम बसेना त्यामुळें त्यांनीं कोठेंतरी दूरदेशीं ाऊन राहाण्याचें ठरविलें. याबाबतींत मध्यस्थीकरितां व मिळाल्यास कांहीं दतीकरता त्यांनीं आपले दोन प्रतिनिधी इग्लंडमध्यें पाठविले त्यांनीं डन कंपनी व प्लिमाऊथ कंपनी या दोहोंशीं धोरण बांधले व त्यांचे दतीनें इंग्लंडचा राजा जेम्स यांची गाठ घेतली. राजानें या कामीं हीं एक मदत होण्यासारखी नाहीं असें सांगितलें तथापि शेवटीं असें बूल केलें कीं, हे लोक अमेरिकेस गेले तर आपण त्यांचे वाटेस जाणार हीं व त्यांस मुद्दाम त्रास देणार नाहीं ही मेहेरबानी सुद्धां कांहीं कमी व्हती. कारण त्यामुळें लंडन व प्लिमाउथ कंपन्या यांचा मार्ग बराच सुकर ाला. जितके अधिक लोक अमेरिकेंत जाऊन रहातील तितकें त्यांस ायद्याचें होतें.

हॉलंडमधील प्यूरिटन् लोकांच्या प्रतिनिधींस वाटाण्याच्या अक्षता ळाल्या तरी त्या योगानें ते निराश झाले नाहीत. जवळ असेल सल ती पुंजी एकत्र करून, व काय वाटेल ते हाल झाले तरी सहन करा-याच असें ठरवून दोन जहाजे अमेरिकेस जाण्यास ठरविलीं. एकाचें नांव स्पीडवेल ' व दुसऱ्याचें ' मेफ्लावर ' असें होतें. स्पीडवेल जहाजामधून

हॉलंडमधील प्यूरिटन् लोक इंग्लंडचे किनाऱ्यावर येऊन पोहोंचले. पुढे मेफ्लावर जहाजास बरोबर घेऊन दोन्हीही जहाजें अमेरिकेकडे निघालीं. थोड्याच अंतरावर स्पीडवेल जहाज नादुरुस्त झालें. त्यावेळीं त्यावरील कांहीं प्रवासी मेफ्लावर जहाजावर पाठविण्यांत आले, व बाकीचे परत इंग्लंडला आले. जुन्या इंग्लंडला रामराम ठोकून नव्या इंग्लंडला गेलेले मेफ्लावर जहाज वादळातून व वाईट हवेंतून धक्के खात खात त्रेसष्ट दिवस सतत प्रवास केल्यानंतर केप कॉड येथे पोहोंचले. तेथेंच जहाजावर सभा भरावेण्यात येऊन नवीन वसाहतीचे राजकीय व सामाजिक धोरण ठरविण्यात आले. या वसाहतवाल्यांनी इंग्लंडच्या राजाबद्दल राजनिष्ठा जाहीर केली. वसाहतींतील सर्व लोकास सारखा हक्क ठेवण्यात आला व शांततेनें, न्यायानें व गोडीगुलाबीने सर्वांनीं वागावयाचें असें धोरण जाहीर करण्यांत आलें. एका करारपत्रावर वरील धोरण लिहून त्यावर सर्व वसाहतवाल्यांनीं सह्या केल्या व जॉन कारव्हर यास आपला गव्हनर नेमलें. अजून वादळी हवा शमली नव्हती व रहाण्यास नीटशी जागा सापडली नव्हती. जॉन कारव्हरनें भू भागात लांबवर फेरफटका करून एक जागा शोधून काढली व येथें ता. ११ डिसेंबर १६२० सालीं "पिल्ग्रिम् फादर्स" न्यू इंग्लंडचे किनाऱ्यावरील प्लिमाऊथचे खडकावर उतरले.

किनाऱ्यावर पाहावें तों एका बाजूस वादळी समुद्र व दुसऱ्या बाजूस अफाट माळ जमीन. हिंवाळा असल्यामुळें सर्वत्र बर्फ पडलेलें होतें. वर वादळी आकाश व खालीं अत्यंत शीत जमीन. ना घर, ना दार, ना आच्छादन. अनिवार थंडी, भुकेनें मरण्याची भीति व निराशा यांचा कडेलोट झाला होता. निष्ठुर निसर्गाशीं झगडण्यांत ह्या बहाद्दरांनीं दाखविलेल्या धैर्यास इतिहासांत तोड मिळणार नाहीं. त्यांनीं झाडें तोडून मोठमोठ्या शेकोट्या केल्या, पर्ण कुटिका तयार केल्या व जवळ पासच्या प्रदेशांत अधिक सुखावह जागा शोधण्याचें काम चालू ठेवलें. इ. स. १६२१ चे जानेवारी महिन्याचे ९ तारखेस न्यू प्लिमाऊथ नगराचा पाया घालण्यांत आला, प्रत्येकानें स्वतःकरतां जागा आंखून त्यावर एक एक घर उभारण्यास



अन्नाच्या तुटवड्यामुळें प्लिमाऊथ वसाहतीची दुर्दशा.

पान ३९

सुरुवात केली पण दैवाला तेही पाहवेना, त्यांच्यामध्यें तापाची सांथ उद्भवली, अत्यंत पराक्रमी बाहूंचा तापाच्या कडाक्यापुढें टिकाव लागेना. ने ढिले पडल्यासारखे झाले, एकेवेळी तर फक्त सातच माणसें तापाच्या नडाक्यांतून सुटलीं होतीं, त्यांच्यावर या सर्व वसाहतीस आसरा व अन्न पुरविण्याचें काम पडे, जवळची शिधासामुग्री तर इतकी आटोक्यांत आली कीं उपासमारीचें भय व मृत्यु ही समोरच उभीं आहेत असा भास झाला. कित्येक दिवस पुरुष मंडळींनीं कडकडीत उपास करून जवळ शिल्लक उरलेली वाळलेलीं मक्याचीं कणसें बायका व तान्हीं मुलें यांस देऊन त्यांना जगविण्याचा प्रयत्न केला. अशातऱ्हेनें प्रत्यक्ष मृत्यूशीं झगडून त्यानां कांहीं दिवस कंठावे लागले. सुदैवाने लवकरच थंडी कमी झाली, त्यामुळें भक्ष्य शोधण्याचे काम किंचित् सुकर झाले. नंतर हवेंतील उष्णतेचें प्रमाण वाढतांच पेरावें तें झटकन उगवूं लागले. अशा दुर्निवार्य संकटांतून न्यू इंग्लंडचे इतिहासास सुरुवात झाली आहे.

न्यूइंग्लंड नंतर दुसरी महत्वाची वसाहत 'कॉनेक्टिकट' मधील होय. कॉनेक्टिकट मॅसचुसेट्सचे दक्षिणेस असलेल्या प्रांताचें नांव होतें. प्लिमाऊथ कंपनीचे हातून महत्वाची कामगिरी कांहीं झाली नाहीं, म्हणून तिच्यानंतर काऊन्सिल ऑफ प्लिमाऊथ या संस्थेनें तिची सूत्रे हाती घेतलीं. तिच्यांत लॉर्ड से ॲण्ड सील, लॉर्ड ब्रुक वगैरे भागीदार होते, त्यांनीं या कॉनेक्टिकटची सनद घेतली होती. कॉनेक्टिकट प्रांताचे पश्चिमेस मॅनहॅटन येथे डच लोकांची वसाहत होती. त्यांनीं प्लिमाऊथ काउन्सिलचे अगोदरच कॉनेक्टिकट येथे वसाहत स्थापिली होती; त्यांनीं हल्लीं हार्टफोर्ड शहर आहे तेथे वसाहत स्थापिली व तिचें नांव हाउस ऑफ गुडहोप असें ठेविलें. अशातऱ्हेने डच लोकांनी केलेलें अतिक्रमण न्यू प्लिमाऊथ येथील इंग्लिश वसाहतवाल्यांस खपलें नाहीं. त्यांनीं डच वसाहतीवर स्वारी केली. डच लोकांचा पाडाव केला व कॉनेक्टिकट नदीचे तोंडाशींच विंडसर नांवाचा किल्ला बांधिला, व पुन्हां कोणास कॉनेक्टिकटमध्यें शिरतां येऊं नये असा बंदोबस्त केला. एवढ्यावर संतुष्ट न होतां बॉस्टन येथील वसाहतवाल्यांनीं सुमारें साठ लोक या किल्ल्याचे नजीक वसाहत करून

राहण्यास पाववूनही दिल. अशा तऱ्हेनेच दुसऱ्या चार दोन वसाहती स्थापन झाल्यामुळे मॅसॅचुसेट्सला जोडूनच कॉनेक्टिकट प्रांत प्यूरिटन वसाहतवाल्यांच्या अंमलाखाली आला.

ऱ्होड आयलंडवर रॉबर्ट विल्यमस् नांवाच्या मिशनऱ्याने वसाहत केली होती या गृहस्थाचें नांव न्यू इंग्लंडचे इतिहासांत दीर्घ कालपर्यंत प्रामुख्यानें चमकत राहील एक अत्यंत यशस्वी वसाहत स्थापिल्यामुळेंच केवळ नव्हे तर इंडियन लोकांशी स्नेहभाव वृद्धिंगत करून अनेक आपत्ती व मनुष्यसंहार थांबविल्याबद्दल न्यू इंग्लंडच्या वसाहतीवर त्याचे अनंत उपकार झाले आहेत. या गृहस्थाची न्यायबुद्धि अत्यंत उच्च दर्जाची होती इंडियन असोत अथवा युरोपियन असोत त्यांना सारखाच न्याय मिळाला पाहिजे असें म्हणणारा हा मिशनरी होता त्यावेळचे कोत्या व संशयी बुद्धीचे माणसास त्याचेबद्दल असावा तितका आदर नव्हता ही गोष्ट अर्थात् वेगळीच. रॉबर्ट विल्यमसने प्रथम इंडियन लोकांतील जे दोन पक्ष एकमेकांशी भांडत होते त्याच्यामध्ये मलोखा घडवून आणिला त्यांतील एका इंडियन पक्षाचें नाव ' नारागॅनसेट्स ' व दुसऱ्याचें ' पिकॉड ' असें होतें या दोन पक्षांत एकमेकांशी तडजोड होऊन एकी नांदू लागल्यानंतर त्याने त्याचा इंग्रज वसाहतवाल्यांशी तह जुळवून आणला त्यामुळे बरीच शांतता नांदू लागली व वसाहतीचें काम झपाट्यानें वाढूं लागलें. नाही तर दररोज इंडियन लोकांशी झटापटी करीत बसावें लागलें असतें, व त्यावेळी तितकी तयारी नसल्यामुळें इंग्रज वसाहतवाल्यास कदाचित् नामोहरम होण्याची पाळी आली असता. अशा रीतीनें दोन इंडियन पक्षात घडून आणलेला तहच थोडे दिवसांनी इंग्रजाच्या बोकांडी बसणार असे दिसूं लागलें. हा एकत्र झालेला पक्ष थोड्याच दिवसात शिरजोर झाला व त्यांनें शांततेचा तह मोडून इंग्रज वसाहतवाल्याशीं मारामाऱ्या करण्यास सुरुवात केली. अजून तिसरा एक इंडियन लोकाचा पक्ष होता, त्या पक्षाचें नाव ' मोहीगानस ' असें होतें. त्याच्याशीं पहिल्या दोन इंडियन पक्षांनीं तह करून इंग्रज लोकांसच नव्हे तर सर्व युरोपियन लोकांस हांकून देण्याचा

मोठा कर कला. विल्यम राजर्सनें पिकॉड लोकांच्या कँपांत शिरून त्यांच्या खूप विनवण्या केल्या व त्यास इंग्रज लोकांच्या स्नेहाची मातब्बरी समजा-वून दिली व तिन्ही पक्षात फूट पाडून पिकॉड पक्षास वेगळें काढले. या रीतीने प्रथम पिकॉंडस् वेगळे पडल्यानंतर संधि साधून ब्रिटिश वसाहत-वाल्यानी त्यानां झोडपून काढून त्यांचा निःपात केला.

पिकॉड नावाच्या इंडियन टोळीचे निःपातास विल्यम राजर्स जरी अप्रत्यक्ष कारण घडला असला तरी पिकॉड लोकाना वेगळें काढण्यात त्याचा केवळ आत्मसंरक्षणापेक्षा दुसरा हेतु असेल असें संभवत नाहीं. त्याच्या नाशास ब्रिटिश वसाहतवाल्यास विल्यम राजर्सचे खास संमतीच जरूर होती. अशांतता मुळीच भाग नाही. तो फार निर्भीड व स्वातंत्र्य-प्रिय मनुष्य होता. त्याचीं धार्मिक व राजकीय मतें पूर्ण स्वातंत्र्यवादी व उदार होती. स्वतंत्रपणें विचार करण्यास व स्वतःचे मताप्रमाणें वागण्यास प्रत्येक व्यक्तीस पूर्ण मुभा असली पाहिजे. सरकारचें कर्तव्य, फक्त कर गोळा करणें, गुन्हेगारीसारख्या अपकृत्याचा बंदोबस्त करणे, गुन्हेगारांस शिक्षा करणे, व सर्व माणसाच्या समाईक हक्काचें संरक्षण करणे, इतकेच असावे. धार्मिक व सामाजिक बाबतींत कायद्यानें ढवळाढवळ करूं नये, असे त्याचे मत होतें.

आकुंचित विचाराच्या व धर्मवेड्या प्यूरिटन समाजांतील लोकांस त्याचीं मतें मान्य होण्यासारखीं नव्हतीं. जोंपर्यंत गतानुगतिक व भटशा-हीच्या जुलमाखाली प्युरिटन लोक होते तोंपर्यंत त्यानीं, ते स्वतः ज्या जुलमाप कंटाळून पळून आले त्या जुलमापेक्षाही अधिक जुलम करण्यास मागेंपुढे पाहिलें नाहीं. विल्यम राजर्सचे प्रागतिक मताबद्दल समा-जानें त्याचा छळ मांडला व त्याला मिॅसाच्युसेट्स कॉलनीतून हाकून दिले. त्याचीं मते राजद्रोही व समाजद्रोही आहेत असें ठरविण्यात येऊन भर हिवाळ्याच्या तोंडास त्याला बाहेर काढण्यात आलें. मिळतील ना कंदमुळें खाऊन व झाडाच्या ढोलींत निजून बिचाऱ्याला साडेतीन महिने बर्फमय प्रदेशात कंठावे लागले. नंतर इंडियन लोकांच्या एका टोळीच्या आश्रयास राहून ऱ्होड बेटावरील प्राव्हिडन्स येथे तो आला, त्याच्या मताचेच दुसरे

पाच इसमही त्याला येऊन मिळाले, व त्यांनीं ही छोटेखानी वसाहत स्थापिली. ही गोष्ट इ. स. १६३६ सालीं घडली.

आतांपर्यंत अनेक वसाहती निरनिराळ्या प्रांतांत वसूं लागल्या होत्या व दिवसेंदिवस सामाजिक आयुष्य अधिक सुखमय होत चाललें होतें. याच सुमारास निवळ प्रॉटेस्टंट अशा या वसाहतींत रोमन कॅथॉलिक लोकांचा भरणा होऊं लागला होता व त्यामुळे युरोपांतील धार्मिक तंटे या नव्या जगांतही उत्पन्न होण्याचा संभव दिसूं लागला.

सर जॉर्ज कारटर नांवाचा एक कॅथॉलिक धर्माचा सरदार होता. तो फार विद्वान व परोपकारी असून त्याला लॉर्ड बाल्टिमोर असा किताब होता. या गृहस्थाचें नांव युनायटेड स्टेट्सचे वसाहतीचे इतिहासांत फार प्रसिद्ध आहे. प्युरिटन लोकांप्रमाणें कॅथॉलिक लोकांवरही जसा इंग्लंडांत जुलुम होऊं लागला तसें जॉर्ज कारटरचे मनानें अमेरिकेंत जाऊन राहाण्याचें घतलें. न्यूफाउंडलंड येथें वसाहत करून राहाण्याचा त्याचा विचार होता. त्याप्रमाणें तो इ. स. १६२३ सालीं तेथें जाऊन पोहोंचला तेथील रुक्ष भूप्रदेश, कडक थंडी व निर्वाहाचे साधनाचा अभाव हीं पाहून तो तेथून निघून व्हर्जीनियाला आला. तेथील लोकांनीं या नवीन पाहुण्याचे स्वागत केलें, व तो जर एका करारनाम्यावर सही करील तर त्याला व त्याच्या बरोबर आलेल्या लोकांस आम्ही आमच्यांत सामील करून घेऊं असें वसाहतवाल्यांनीं कबूल केलें. सर जॉर्ज कारटर कॅथॉलिक धर्माचा असल्यामुळें वसाहतीचा धर्म पाळण्याचें त्याच्यानें कबूल करवेना. व्हर्जीनियांतील असेंब्लीनें मदत नाकारल्यामुळें त्यानें पहिल्या चार्लस राजाकडे मदत मागितली.

लंडन कंपनी यावेळीं मोडकळीस आल्यानें तिला दिलेले सर्व हक्क इंग्लंडच्या राजानें काढून घेतले होते. चार्लस् राजास कारटरचें म्हणणें पटलें, व त्यानें त्याला व्हर्जीनियाचे उत्तरेस असलेल्या पोटोमॅक नदीचे कांठचा प्रदेश बहाल केला. व्हर्जीनियांतील मूर्ख लोकांनीं केवळ धर्म-वेडामुळें व्हर्जीनिया प्रांत गमावला. कार्टरला पुष्कळच मोठ्या मुलुखावर

सत्ता मिळाली. इतकेंच नव्हे तर त्याच्या सनदेइतकी खूप सवलती असलेली सनदही आजपर्यंत कोणास मिळाली नसेल. आपल्या ताब्यांत मिळालेल्या सर्व मुलखाचा ख्रिस्ती धर्मानुयायांस फायदा मिळावा मग त्यांचा पंथ कोणताही असो, असे त्याचें धोरण होते. सर्व वसाहतीवर इंग्रजी कायद्यानुसार नियंत्रण चालावयाचें होतें. फ्री ट्रेडप्रमाणें स्वतंत्र व्यापार पद्धतीनें व्यापार चालावयाचा होता व भलते सलते कर लादावयाचे नाहात असे ठरले होते. वसाहतीस लागू करण्याचे विशिष्ट कायदे करण्याचा अधिकार वसाहती प्रजेस होता.

सर जॉर्ज कारटरचे मृत्यूनंतर वसाहतींचे सर्व अधिकार त्याचे भावाकडे देण्यात आले. त्याचें नांव सेसिल असें होतें. त्याच्याकडेच लॉर्ड बाल्टिमोर हा पदवी आली. यानंतर आणखी सुमारें दोनशेसाठ कॅथॉलिक लोक वसाहत करण्यास व्हर्जीनियामध्यें उतरले. त्यांनीं आपल्याबरोबर दुसऱ्या जार्ज बादशहाकडून व्हर्जीनेयाचे गव्हरनरला पत्र आणलें होतें. त्यामुळें गव्हरनरला या लोकांची सोय लावणे भाग हातें पण त्यामुळे व्हर्जीनियातील प्यूरिटन रहिवाश्यांचे पित्त खवळलें. कारण या नवीन कॉलनीमुळे ‘ चासापिके ’ नांवाच्या इंडियन लोकाबरोबर चालू असलेल्या लोकरीचे फायदेशीर व्यापारांत विघ्न येणार होते ज्या धर्मछळाम कंटाळून प्यूरिटन लोकांनी युरोप सोडले, तशाच प्रकारचा धार्मिक छळ त्यानीं प्रॉटेस्टंट लोकाचा केला व मनुष्यस्वभावाचे विकृत चित्र जगाचे नजरेस आणून दिले.

न्यू इंग्लंडमधील कांही वसाहतवाल्यानी इ. स. १६५० नंतर कॅरोलिनामध्ये जाऊन वस्ती केली, व इंडियन लोकांशीं व्यापार सुरू केला.

डच लोकाची न्यू ॲमस्टरडॅम येथील वसाहत व तिचे लगतचे प्रदेशावरील ताबा इंग्लंडच्या राजानें केव्हांहि मान्य केला नाहीं. डच लोकांची सत्ता फारशी जोरांत नसल्यामुळें न्यू ॲमस्टरडॅमची वसाहत व तिच्या लगतचा प्रांत दुसऱ्या चार्लेस राजानें आपला भाऊ ड्यूक ऑफ यार्क याला देऊन टाकिला. ड्यूक ऑफ यार्कनें आपल्यातर्फे तो मुलुख

लॉर्ड बर्कले व सर जार्ज कार्टरेट याना बहाल केला. आपसांतील लढाईमध्यें वरील दोन गृहस्थांनीं दुसऱ्या चार्लस राजास फार मदत केल्यामुळें हा परकीय प्रांत त्याना बक्षीस मिळाला होता. या गृहस्थांनीं जर्मेमध्यें वसाहती स्थापिल्या. इंग्लंडच्या राजानें दिलेल्या सनदांत कित्येक वेळां फार घोंटाळा उडे. एकच मुलुख कित्येक वेळा दोन गृहस्थास बक्षीस दिला जात असे. याचें उदाहरण ह्मणजे नवीन नेदरलंडचे प्रांतावर इंग्लंडचे राजानें निकोलस याला गव्हर्नर नेमिलें होतें, पुढें थोड्या दिवसांनीं सर जार्ज कार्टरेट हाही त्याच प्रांताचा गव्हरनर बनून आला, अर्थात् या गोष्टीस पहिल्या गव्हरनरनें हरकत घेतली.

वसाहतीचे कालाला 'विल्यम पेन' या सद्गृहस्थाच्या नांवानें मोठी शोभा आणली आहे. 'पेन्सिल्व्हॅनिया' ची वसाहत त्याच नावानें स्थापिली गेली. या कॉलनीचें अद्भुत व शांततामय जीवनचरित्र वाचून नेत्रांत आनंदाश्रु आल्यावाचून राहात नाहीत, व पेनच्या अलोट नीतिधैर्याची तारीफ केल्यावांचून राहवत नाहीं. अडीचशें वर्षांपूर्वी स्वसंरक्षण हाच जेथें कायदा मानला जात होता अशा नवीन जगांत विश्वबंधुत्वाची महति गाणाराच केवळ नव्हे तर तें सुमारें पाऊणशतक व्यवहार्य करून दाखविणारा महात्मा हयात होता हे कोणास तरी खरें वाटेल काय? त्यावेळीं युरोपांत कुठल्याही दोन देशांत पूर्ण सख्य नव्हतें. त्या वेळची ही कथा वाचीत असतांना आपण एखादी कादंबरीच वाचीत आहों की काय असा भास झाल्यावांचून राहात नाहीं.

विल्यमपेन हा इंग्लंडांतील 'क्केकर' नावाच्या ख्रिस्तपंथीयांचा पुढारी होता. या पंथातील लोक धार्मिक शिस्त फार कडक रीतानें पाळीत, व परोपकाराची त्यांनां विशेष महति वाटे. पण या लोकाना इंग्लंडमध्यें फार छळ होऊं लागला. क्केकर लोकांनीं सोसायटी ऑफ फ्रेंड्स् ह्मणजे 'मित्र मंडळ' नांवाची संस्था चालविली होती. तिच्याहा सदस्यांचा इतका छळ होऊं लागला कीं त्याला सीमाच राहिली नाहीं. कैद, हद्दपारी, व मालमत्तेची जप्ती, या तीन प्रकारच्या शिक्षा त्यांच्या नशिबीं नित्यच येऊं लागल्या. त्यावेळच्या चिन्हांवरून राजाचे मेहेरबानांनें सुद्धां हा छळ



पेन्सिल्व्हेनिया वसाहतीचा उत्पादक विल्यम पेन्.

पान ४०.

कर्मा होईल असें मानण्यास जागा नव्हती. त्या काळीं धार्मिक छळास कंटाळलेल्या लोकांत अमेरिकेत जाऊन वसाहती करण्याचा परिपाठच पडत चालला होता. आपणही अमेरिकेस जाऊन केवळ क्वेकर लोकांकरितांच नव्हे तर युरोपातील सर्व दलित लोकांस स्वतंत्र करण्यासाठीं म्हणून एक मोठी वसाहत स्थापावी असें त्याला वाटूं लागलें. परिस्थिति फारशी अनुकूल नव्हती तरी मुद्दां मनाचा मोठा हिय्या करून विल्यम पेननें इंग्लंडचा राजा दुसरा चार्लस याची गांठ घेतली व आपल्या लोकावर होत असलेला जुलूम यथोचित वर्णन करून ज्या उदात्त हेतूनें प्रेरित होऊन त्यानें हें काम हातीं घतलें होतें त्याची त्याला नीट समजून पटवून दिली. त्याचा परिणाम असा झाला कीं यत्किंचितही संभव नसता त्याच्या हातांत डेलावेरच्या आसपासच्या पुष्कळ मोठ्या मुलखाची सनद पडली. डेलावेरच्या प्रांतातील फक्त तीन परगणेच काय ते ड्यूक ऑफ यॉर्कचे मालकीचे राहिले होते.

विल्यम पेननें आपण विश्वबंधुत्वाचे तत्वावर रंग, जाति, धर्मभेद, यापासून मुक्त असा समाज स्थापन करून स्वतंत्र वसाहत करणार आहोंत, असें जाहीर केलें. इंडियन लोकांसंबंधीं सुद्धां त्याला असे वाटत होतें कीं न्याय व प्रेम याचे जोरावर त्याच्याशीं सलोखा राखून त्यानां आपलेसें करून घेणें जड जाणार नाहीं. ज्या ज्या लोकास धर्म किंवा सामाजिक मतें यासंबंधीं छळ सोसावा लागे अशा सर्व लोकांस या विश्वबंधुत्वाचे वसाहतींत येऊन राहण्यास मुभा ठेविलेली होती. विल्यम पेनच्या उदार धोरणाचा परिणामही अगदीं तात्काल दिसून येऊं लागला. अगदीं थोड्या दिवसात तीन जहाजें भरून क्वेकर लोक नव्या वसाहतींत येऊन दाखल झाले. या लोकांबरोबरच विल्यम मार्कहॅम नावाचा गृहस्थ आला. त्याला डेप्युटी गव्हरनर करण्यात आलें. सर्व लोकांशीं शांततनें व गोडीगुलाबीनें वागण्याचें विल्यम पेनचे धोरण अबाधित चालू होतें. त्याला बहाल मिळालेल्या हद्दीत स्वीडिश लोकांनीं वसाहती स्थापिल्या होत्या व ते सुखासमाधानानें रहात होते. त्यांना विल्यम पेनने लिहिलें कीं ज्या भागांत तुम्हीं रहात आहां तेथें तुम्हास सुखाने राहातां येईल, त्याचप्रमाणें

तुम्हांस आपले कायदे करून त्याप्रमाणें चालण्याची पूर्ण मुभा आहे. आमचेकडून तुम्हांस कांहीं एक उपसर्ग होणार नाही. त्यानें आपल्या डेप्युटीस सांगितलें की इंडियन लोकांशी अत्यंत सलोख्यानें वागून युरोपियन वसाहतवाल्यांकडून अथवा दुसऱ्या कोणाकडून त्यांनां कोणत्याही प्रकारचा त्रास न होईल असें वर्तन ठेवा, ते या देशाचे मालक आहेत ही गोष्ट विसरूं नका. इंडियन लोकांचे प्रमुख चीफस्ना त्यानें जातीनें पत्रें लिहिलीं, त्यांत उभय पक्षांमध्ये सलोखा व प्रेम नांदावे अशी इच्छा प्रकट केली होती, व बंधुत्वाचे नातें पाळण्याबद्दल विनंतीही केली होती.

नंतर त्यानें एक राज्यघटना तयार केली. समता व स्वातंत्र्य या तत्वाचा शक्य तितका पुरस्कार या घटनेत करण्यांत आला होता त्याच-प्रमाणे वसाहतवाल्यांपासून मिळेल तितका पैसा वसूल करण्याचें जें धोरण इतर प्रांतांतून चालू होतें त्यास त्यानें अजिबात फांटा दिला वसाहतीत निघेल तितकें उत्पन्न वसाहतींतच खर्च व्हावें असें त्याचें मत होतें. आतांपर्यंत इतकें औदार्य व प्रजेवरील इतका दृढ विश्वास कोणत्याही राज्यकर्त्यानें दाखविला नसेल. थोड्याच दिवसांनी डिलावेरचे उरलेले तीन परगणे, विल्यमपेनच्या कर्तबगारीवर व प्रेमळ-पणावर खूष होऊन ड्यूक ऑफ यॉर्कनें नवीन वसाहतीस देऊन टाकले. अशा तऱ्हेनें डिलावेरचें आखात व नदी यांचा उत्तरेकडचा बराच भाग या नूतन वसाहतीचे मालकीचा झाला, विल्यम पेन स्वतः इ. स. १८८२ सालीं अमेरिकेंत आला. तेथें त्याच्या अनुयायांनीं त्याचें फार मोठें स्वागत केलें, त्याला भेटावयास या नूतन वसाहतींतील सर्व लोक आले असतील यांत नवल नाहीं, पण परप्रांतीय स्वीडिश, डच व इंग्रज लोकांमधील उदार-मतवाल्यांनींही त्याचें योग्य स्वागत केलें. सर्व वसाहतींत आनंदास पारावार राहिला नाही. त्यानें जमलेल्या समुदायापुढें समता व विश्वबंधुत्व या विषया-वर भाषण केलें व सर्वांस नीतीनें व नेकीनें वागण्याचा उपदेश केला व नंतर चेस्टर नदींतून त्यानें अन्तःप्रदेशांत प्रवेश केला व फिलाडेल-फिया हें शहर बसविण्यासाठीं योग्य जागा शोधून काढिली. पुढें तसेंच

न्यूयॉर्क, न्यूजर्से व लॉग आयलंड वगैरे ठिकाणी असलेल्या क्वेकर लोकांस भेटून व त्यांस धीर देऊन तो आपल्या वसाहतींत परत येऊन दाखल झाला

त्याच्या आज्ञेप्रमाणें मार्कहॅमनें इंडियन लोकांशी प्रेमाचे नाते जुळविण्याची खटपट फार नेकीनें पार पाडली. त्या योगानें या दोन लोकांमध्यें सौख्यवृद्धि होणें अपरिहार्यच होतें. युरोपियन लोकांस जर कांहीं जमीन वगैरेची जरूर पडली तर ते योग्य किंमत देऊन विकत घेत. पूर्वीच्या कॉलनीप्रमाणें त्यांनां हुसकून देऊन, त्यांचीं घरेंदारें व पिकें जाळून, त्यांनां देशोधडीला लावून, नाहीं तर ठार मारून घेत नसत. डिलावेर नदीचे कांठी सर्व इंडियन लोकांचे प्रमुखांचें संमेलन भरविण्यांत आलें. या संमेलनाचे प्रसंगीं पेन आपल्या कांहीं सोबत्यांसह शस्त्रविरहित व क्वेकर लोकांचा साधा पांढरा पोशाख घालून आला होता. एका वृक्षाचे खाली उभे राहून त्यानें भाषणास सुरुवात केली. ते स्वतःही निशःस्त्र होते व आपल्या या उदारधि बंधूचें भाषण, आपले पद्धतीप्रमाणें एका अर्ध वर्तुलाकार रांगेत बसून चित्त लावून ऐकत होते. पेन म्हणाला.—' मित्रहो, परस्पर विश्वासाच्या प्रशस्त भूमीवर आपण उभे आहोंत. आपण सर्व एकाचे तऱ्हेच्या हाडामासाचे बनलेले आहोंत. आपण बंधू बंधूप्रमाणें राहिले पाहिजे, व एकमेकांचा गैरलाभ घेतां कामा नये. जर काहीं मतभेदाचा प्रश्न निघालाच तर पंचायतामार्फत निकाल लावून घ्यावा. आपल्यामध्ये प्रेम व खुल्या दिलानें राहण्याची प्रवृत्तीच आपण कायम ठेविली पाहिजे '

सर्व इंडियन प्रमुखांनीं उत्तर दिलें; जोपर्यंत नद्या वाहात आहेत व सूर्य भूभाग प्रकाशीत आहे, तोंपर्यंत विल्यमपेनच्या प्रजाजनांशी आम्ही शांततेनेंच वागूं.

हा करार तोंडीच ठेवण्यांत आला होता. परस्परांचा विश्वास इतका अढळ होता कीं तो कागदावर उतरण्याची जरुरीच भासली नाहीं. तो करार सर्वांनी अक्षरशः अंमलांत आणला. मारामारी किंवा दगलबाजी कोणत्याही कारणानें उद्भवली नाहीं. एकवचनी इंडियन लोक व उदारमतवादी युरोपियन लोक यांची जोड खरोखरीच प्रशंसनीय बनली. सुमारें पाऊणशें

वर्षें, जोपर्यंत हा प्रांत सोसायटी ऑफ फ्रेंडसचे अंमलाखाली होता तों-पर्यंत पेनसिल्व्हेनियामध्ये रणशिंगाचा आवाज कधींही ऐकूं आला नाहीं ही मैत्री अगदीं शेवटपर्यंत टिकली इतर प्रांतातील धामधूम, गैरविश्वास, खून, लढाया वगैरे कोणीकडे व हें रामराज्य कोणीकडे ? क्वेकर लोकांचा शुभ्र कोट व विशिष्ट टोपी ही तोफा व दारुगोळयांचीं कोठारें यापेक्षा सुद्धा अधिक परिणामकारक ठरलीं. खरोखरीच ही गोष्ट इतकी अद्भुत घडली की, तिच्या विश्वसनीयपणाबद्दल इतिहासाचे वाचक घोटाळयात पडल्यासारखे होतात, पण ती अक्षरशः खरी आहे फिलाडेल्फिया या शहराला अजून सुद्धा लोक क्वेकर सिटी या नावाने संबोधितात.

अशा पूर्ण अशांततेचे कालांत आपल्या प्रांतापुरती निर्भेळ शांतता लाभल्यामुळें, त्याचा पेनसिल्व्हेनियाचे इतिहासावर फार इष्ट परिणाम घडून आला व सुबत्ता व प्रगति झपाट्याने वाढूं लागली यांत नवल तें कसलें ?

ही वसाहत इतक्या झपाट्यानें वाढूं लागली की सर्वसाधारण व्यवस्थेसाठीं कायदेमंडळ नेमणें भाग पडलें. इ. स. १६८२ चे डिसेंबर महिन्यांत पहिलें कायदेमंडळ बोलाविण्यात आलें त्यावेळीं विल्यम पेननें मोठें कळकळीचें भाषण केलें. त्याच वेळीं नवीन वसाहतीसाठीं राजधानी म्हणून एक मोठें सुंदर शहर वसविण्यात आलें इ. स. १६८३ मध्यें या नगराचा पाया खोदण्यास सुरुवात झाली, व जंगल वगैरे तोडून जागा साफ करण्यांत येऊं लागली. ' फिलाडेल्फिया ' याचा अर्थ ' बंधुप्रेमाचें नगर ' असा आहे.

अमेरिकेच्या दुसऱ्या कोणत्याही शहराची फिलाडेल्फिया नगरा-इतकी झपाट्याने वाढ झाली नसेल. जादूगारानें आपल्या पोतडीतून एखादा पदार्थ झटकन काढून दाखवावा त्याप्रमाणें हें शहर भूतलावर अगदीं अल्पकालांत चमकूं लागलें. इ. स. १६८३साली जेथें फक्त तीनच घरें होतीं. तेथें दोन वर्षांत सहाशें घरें दिसूं लागलीं. शाळागृहें सुरू करण्यांत आलीं, छापखानें अस्तित्वांत आले. पुढच्या एकाच वर्षांत या शहराची वस्ती



जॅार्जिया वसाहतीचा संस्थापक जेम्स ओगलथॉर्प.

पान ४५.

त्यावेळच्या न्यूयॉर्क शहरापेक्षांही अधिक वाढली. ज्या उच्च नीतितत्वावर या शहराची उभारणी झाली होती, त्या तत्वाचा त्याचे वाढीवर परिणाम होणें ही निसर्गसिद्धच गोष्ट होती स्वातंत्र्य, परस्परविश्वास, सहकारी तत्वाची जपणूक, शातता, जीवित व मालमत्ता याची सुरक्षितता इतक्या सर्वांची जोड जमल्यावर भरभराट होण्यास उशीर कां लागावा?

युनायटेड स्टेटसमध्यें मूळच्या झालेल्या तेरा वसाहतींतील बहुतेकांची हकिकत मागे आलीच आहे शेवटची वसाहत जी ‘ जॉर्जिया ’ तिची हकीकत सुद्धां अत्यंत रम्य व चित्तवेधक आहे. जार्जिया या नांवावरूनच ही वसाहत इंग्लंडचा राजा जॉर्ज याचे नांवानें वसली असली पाहिजे हें कोणाचेहि ध्यानांत येईल. त्यावेळी दुसरा जॉर्ज हा राज्य करीत होता पेनसिल्व्हेनियाप्रमाणें जॉर्जिया ही वसाहत सुद्धां विश्वबंधुत्व व परोपकार या तत्वावरच वसली होती. तिचा जनक जेम्स ओगलथार्प हा परोपकारी गृहस्थ होता. इंग्लंडात गरीबी व उपासमार यांनी पीडिलेले जे अनेक लोक होते त्याची कांही तरी सोय लावावी या उच्च हेतूनें प्रेरित होऊन त्यानें त्यांच्यासाठी अमेरिकेंत ‘ स्वतंत्र वसाहत ’ स्थापावी असे ठरविलें व तो त्या उद्योगास लागला. इंग्लंडांतील कायद्याप्रमाणें त्यावेळीं कर्जबाजारी लोकांस तुरुंगांत डाबून ठेवीत व कर्ज फिटेपर्यंत त्याची सुटका होत नसे. तुरुंगांत डांबून ठेविलेल्या माणसानें, उद्योगधंदा न करितां आल्यामुळें कर्ज कोणत्या रीतीनें फडावे याचा कोणीच विचार करीत नसत. दुसरें असें की कुटुंबांतील मिळवता पुरुष तुरुंगांत गेल्यामुळे बायाबापड्यांची व लहान मुलांची उपासमार व दैना होई. मुख्यत्वेकरून तुरुंगात गेलेल्या लोकांत मजूर लोकांचाच भरणा असावयाचा. हजारो मजूर अशा रीतीनें तुरुंगांत खितपत पडले होते. या अमानुष वर्तनाचा व गरीब लोकांच्या उपासमारीचा फार गवगवा झाला व शेवटी हा प्रश्न पार्लमेंटपर्यंत गेला. पार्लमेंटनें जेम्स ओगल थार्प यास या प्रकरणाची चौकशी करण्याकरितां नेमिलें. जेम्स ओगल थार्पच्या हृदयद्रावक रिपोर्टामुळें लवकरच तुरुंगांची दारें खुलीं झाला व या कर्जबाजारी लोकांनां सोडण्यांत आलें. तुरुंगात

फुकट जेवावयास तरी घालीत, तेंही आतां मिळेनासें झालें व या सुटकेमुळें त्यांची स्थिति सुधारण्याचें चिन्ह दिसेना. त्या गरीब लोकांना राहाण्यासाठीं व त्यांच्या पोटाची कांहीं तरी तरतूद करण्यासाठीं दयाळू ओगल थार्पचें हृदय द्रवत होतें, त्यांनीं दुसऱ्या जॉर्ज राजाचें या गोष्टीकडे लक्ष वेधून या लोकाची सोय लावण्यासाठीं एक नवीन वसाहत करण्याची परवानगी मिळविली. इ. स. १७३२ साली सरकारी सनदेनें त्यांना सॅव्हाना व अल्टामाहा या नद्यांमधील प्रांत मिळाला. या प्रांतास जॉर्जिया हें नांव देण्यांत आलें. जेम्स ओगलथार्पचें चारित्र इतकें शुद्ध व उदात्त होतें कीं त्याच्यावर विश्वास बसण्यास व नवीन वसाहत वसण्यास बिलकूल वेळ लागला नाहीं. तो उत्तम विद्वान असून पार्लमेंटचा मेंबरही होता. त्याचा स्वभाव परोपकारी, उदार व स्नेहमय होता. तसाच तो अत्यंत शूर व समयसूचकही होता. सॅव्हाना येथें स्थापावयाच्या वसाहतींत त्यानें स्वतः पुढाकार घेतला. प्रथम त्यानें एकशेंवीस लोकांची वसाहत तयार केली. तो. इ. स. १७३३ चे जानेवारी महिन्यांत चार्लस्टन् येथें येऊन पोहोंचला, व हल्लीं सॅव्हाना शहर आहे तेथें त्यानें वसाहत केली. रुंद रुंद रस्ते व अनेक क्रीडोद्यानें यानीं युक्त असें एक सुंदर शहर तेथें लवकरच थाटलें. लवकरच या शहरांत मोरेव्हियन पंथाचे लोक येऊन राहिले. त्यानंतर मेथॉडिझम्चा पुरस्कर्ता जॉन वेल्सली तेथें येऊन राहिला. त्याचे मनांत इंडियन लोकांस ख्रिस्ती धर्माचीं उच्च तत्वें शिकवावयाचीं होतीं धर्मशास्त्रांतील कर्ममार्गाचा पारलौकिक भाग शक्य तितका सोडून देऊन तत्वाचेंच अवलंबन अधिक व्हावें असें त्याचें मत होतें. जॉन वेल्सलीचा भाऊ जार्ज व्हिटफील्ड याची या कामीं फार मदत झाली. अमेरिकन लोकांमध्यें स्वातंत्र्याचे लढाईनंतर इव्हॅन्जेलिझम्चा जो झपाट्यानें प्रसार झाला त्या तत्वाचे मूळ पुरस्कर्ते हे दोघेच होत.



# वसाहतींतील परिस्थिति व आयुष्यक्रम.

## प्रकरण ४ थें



इंडियन लोक व वसाहतवाले याच्यामध्यें विचारविनिमय सुरू होण्यास बराच काल लागला ते एकमेकांपासून फार दूर रहात असत व दोघांचे आचार-विचारातही विलक्षण फरक होता. संबंध येई, तो व्यापारापुरता. युरोपीय वसाहतवाल्यांप्रमाणें इंडियन लोकांनी सुद्धां आपण होऊन समेट व सहकारित्वाचा प्रयत्न केल्याचे पुष्कळ दाखले सांपडतात. 'वापानो आग' नावाच्या टोळींतील सामोसेट नावाच्या इंडियन माणसाने प्लिमाऊथ येथे येऊन नेथील वसाहतवाल्यांशीं समेट केला होता. त्याला मोडकें तोडकें इंग्रजी येत असे, कारण त्याने पूर्वी युरोपियन लोकाबरोबर कित्येक सफरी केल्या होत्या व मार्गदर्शकाचे कामही केलें होते. पूर्वी इंडियन लोकांची संख्या पुष्कळ होती पण मध्यंतरीं सांथीचे रोगाने त्यांचे बहुतेक लोक कसे मृत्युमुखीं पडले याचें वर्णन तो आपल्या मोडक्या तोडक्या इंग्रजी भाषेत करी. त्यानंतर इ. स. १६१४ चे सुमारास 'स्क्वांटो' नावाचा इंडियन इंग्रजी भाषा बोलण्यास शिकला. तह व करारनामे करण्याचे कामीं या लोकाचा फार उपयोग होई. जसजसा सहवास अधिक होऊं लागला तसतसे ते एकमेकाची भाषा समजूं व बोलूं लागले.

लोक मतानुवर्ती राज्यपद्धतीचा अवलंब करण्याचें तत्व अगदीं प्रथमपासूनच अंमलांत आले असावे असें दिसतें. राजपक्षीय लोकांपासून अशा पद्धतीस कधीं कधीं अडथळा येत असे पण तिकडे कोणी फारसें लक्ष देत नसत. इ. स. १६३४ सालीं प्यूरिटन लोकांचे वसाहतीत प्रजामतानुवर्ती राज्यपद्धति अंमलांत आली होती, त्यावर्षी इलेक्शनचे दिवशीं

एक सुप्रसिद्ध पाद्री मिस्टर कॉटन यानें लांबलचक भाषण करून प्रजानुवर्ती राज्यपद्धति अराजक कशी ठरते हें सिद्ध करून दिलें. सर्व लोक शांतपणे भाषण ऐकत होते. पण भाषण संपताच त्यांनी इलेक्शनचें काम यथासांग पार पाडलेंच, व इकडे ते शास्त्रीबुवा हात चोळीत स्वस्थ बसले ! त्याच वेळीं 'बॅलट' म्हणजे मतें घेण्याकरितां पेटींत चिठ्या टाकण्याची पद्धति अमलांत आली. त्यापूर्वी उघड तोंडी मतें घेऊन इलेक्शनचें म्हणजे निवडणुकीचें काम चाले. तरी अजून एक गोष्ट राहून गेली होती, ती म्हणजे मतदार होण्यास प्रत्येक मनुष्य प्रॉटेस्टंट चर्चचा सदस्य असावाच लागे. स्त्रियास मतें देण्याचा अधिकार देण्यात आला नव्हता.

चमत्काराची गोष्ट अशी की ज्या मतस्वातंत्र्याकरिता आणि धर्मस्वातंत्र्याकरितां प्यूरिटन लोकांनीं मायदेश सुद्धा सोडला, त्यांना पुढें त्याच तत्वांची कदर राहिली नाही, इतर लोकावर धार्मिक व सामाजिक जुलुम ते खुशाल करूं लागले. अगदीं प्रथमपासून सुद्धां लोकात धार्मिक कुरबुरी चालूंच होत्या. धार्मिक विषयालाच अधिक महत्व मिळून, अगदीं महत्वाचे विषय जे अन्नपाणी, घरेंदारें, पीकपाणी, त्याजकडे कित्येक वेळा दुर्लक्ष होई, पाद्री लोकांनीं सोडलेल्या पुराणावर कोणी टीका केला किंवा स्वतंत्र मत प्रतिपादन केलें की त्याला लोक हैराण करून सोडीत. अशाच एका प्रसंगी रॉजर विल्यम यांस कॉलनींतून हाकून देण्यांत आलें होतें. लोक बोलतांना 'रॉजर विल्यमपेक्षाही नीच' अशा अर्थाचे शब्द कोणाविषयीं तिरस्काराने बोलतांना वापरीत.

प्युरिटन लोकांचें 'धार्मिक स्वातंत्र्या'चा अर्थ म्हणजे सर्वांनी त्याचेच मताप्रमाणे वागावें असा होता. जे लोक त्यांचे मताप्रमाणे वागत नसत त्यांचा छळ होई. ॲनि हचिनसन् नांवाची एक बाई कॉलनीमध्यें नुक्तीच दाखल झाली होती. एकेप्रसंगीं धार्मिक वादविवादांत बोलण्याची तिनें इच्छा दर्शविली. त्यावेळीं स्त्रिया सार्वजनिक कार्यांत भाग घेऊं लागल्या नव्हत्या. ॲनीचें म्हणणें प्युरिटन पाद्यास पटेना व त्यानें तिला सभेत बोलण्याची मनाई केली, पण तिनें शेवटपर्यंत आपला हेका सोडला नाहीं. तिला



वसाहतवाल्यांकरितां वधूंची आयात.

पान ४९.

या गोष्टीचा फार राग आला. ती ह्मणाली, " पुरुषवर्ग फार आप्पलपोटा आहे, बायबलसारख्या ग्रंथाचा स्त्रियांनां कां फायदा मिळूं नये ? " पुढें तिला व तिचे मैत्रणींनां वसाहतींतून हांकलून देण्यांत आलें. त्यांचे चरितार्थाची तरी कांहीं सोय आहे की नाहीं हेंही वसाहतवाल्यांनीं पाहिले नाहीं. बिचाऱ्या रानोमाळ भटकत एका इंडियन कँपात गेल्या. रॉजर विल्यम् त्याच इंडियन कँपात छपून राहिलेला त्यांनां आढळला. इंडियन लोकांचे चीफनें उदारपणानें ऱ्होड आयलंड नावाचे सुंदर बेट त्यांनां बक्षीस दिलें व तेथें त्यांनी स्वतंत्र स्त्रीराज्य स्थापिले.

कोत्या धार्मिक समजुतीनें जरी प्यूरिटन लोक असले मासलेवाईक प्रकार करीत, तरी एकंदरींत त्यांचे हेतू उच्च असत. त्यांनीं इ. स. १६३८ सालीं पुष्कळ देणग्या मिळवून ' हारवर्ड ' कॉलेज स्थापन केलें. ही पहिली अमेरिकन युनिव्हर्सिटी होय.

इ. स. १६३८ सालीं, स्टीफन डाय यानें प्रिंटिंग प्रेस सुरू केला. अमेरिकेंत छापिलेले पहिले पुस्तक म्हणजे एक पंचांग होतें, त्यांत न्यू इंग्लंडांतील वेळेप्रमाणे तारखा, मुहूर्त वगैरे छापिली होतीं. दुसरें पुस्तक हिब्रू बायबलातील गीतांचें इंग्रजी भाषांतर हे होय. हे जवळ जवळ तीनशें पानांचें पुस्तक होते, व त्याची छपाई अत्यंत ओबड धोबड होती. हळूं-हळूं युरोपातील सर्व सुधारणा नव्या देशांत येऊं लागल्या, वसाहतींची संख्या व लोकसंख्या ही वाढूं लागली, सर्वत्र सुबत्ता होऊं लागली, व निर्वाहोपयोगी वस्तूंची संख्या वाढूं लागली, सर्व तऱ्हेचे लहानमोठे धंदे सुरू होऊं लागले.

जीवनकलहाचा प्रश्न सुटूं लागला, व वसाहती वसतिक्षम होऊं लागल्या. घरें बांधिली जाऊं लागली, पण अद्यापि एक उणीव राहिली होती. गृह स्वामिनी नसल्यामुळे वसाहतवाल्यांस जीवन रुक्ष वाटत होतें. पण ही उणीव सुप्रसिद्ध लंडन कंपनीनें फार दिवस भासूं दिली नाहीं. तिनें इ. स. १६२० सालीं, नव्वद तरुण स्त्रियांस व दुसऱ्या वर्षी आणखी साठ विवाहेच्छू तरुणींस आपले गलबतावर थारा दिला, व नूतन वसाह-

तींतील सद्गृहस्थांस कौटुंबिक आयुष्याचा लाभ मिळवून देण्याचें पुण्य पदरी बांधून घेतलें. लंडन कंपनी हे एक व्यापारी खातें होतें. त्याला इतक्या तरुणींस फुकट आणणें कसे शक्य असेल? आणि या सौभाग्याकांक्षिणी तर निव्वळ कफल्लक होत्या. लंडन कंपनीने वसाहतवाल्यांकडून प्रत्येकीं सुमारे दोन हजार रुपये अगर तितक्या किंमतीचा तंबाखू वगैरे माल स्वीकारून त्याचे मोबदला एक वधू घेऊन जाण्याची परवानगी दिली वसाहतवाल्यांची फार दिवसाची नड भागली. या तरुण स्त्रियांस बिन-खर्चाने अनुरूप वरप्राप्ति झाली, व कंपनीचे भाड्याचे पैसे वसूल झाले. सर्व पक्षांना हा सौदा फायदेशीर झाल्यामुळे हा माल खपण्यास फार वेळ लागला नाही, हे सांगणे नकोच! या पुढील सालात लंडन कंपनीस हा एक नवीन धंदाच सापडल्यासारखे झाले, व वसाहतवाल्यास योग्य प्रमाणात स्त्रियाचा पुरवठा होऊं लागला.

## निग्रो लोकांची आयातः—

इ. स. १६२० साली आणखी एक महत्वाची गोष्ट वसाहतीत घडली. ती ह्मणजे त्या साली निग्रो लोकाचा अमेरिकेत प्रथम प्रवेश झाला ही होय. या गोष्टीस पुढे अमेरिकेच्या इतिहासात किती महत्व प्राप्त झाले हे दिसून येईलच. त्यावर्षी एका डच जहाजाने सुमारे वीस नीग्रो आफ्रिकेतून पकडून आणले होते. त्याचा जाहीर लिलाव केला व काहीं सुखवस्तू अमेरिकन लोकांनी ते गुलाम ह्मणून खरेदी केले. आपण काय करीत आहों हें त्या सद्गृहस्थाचे तेव्हा लक्षात आलें नाही व बहुजन समाजाचेंही तिकडे विशेष लक्ष गेले नाहीं. पुढे जवळजवळ पन्नास वर्षेपर्यंतही हा प्रश्न कोणाचे नजरेत प्रामुख्याने आला नाही.

इ. स. १६२९ सालीं पहिले जहाज अमेरिकेत बांधण्यात आले ते सुमारे ४०० टन माल एकावेळी नेता येईल येवढें मोठें होते. अमेरिकेत येणाऱ्या जहाजांची ये जा तर इतकी वाढूं लागली की इ. स. १६४० सालीं मॅसॅचुसेटचे आखातांत दोनशे नव्वद जहाजे आली होती.

न्यू इंग्लंडमधील सर्व वसाहतींची म्हणून एक स्वतंत्र नियंत्रण सभा असावी ही जाणीव इ. स. १६३९ पासून उत्पन्न होऊं लागली. त्यासालीं

सर्व वसाहतींतील निवडक प्रतिनिधींची एक सर्वसाधारण सभा झाली. पुढें इ. स. १६४३ साली मॅसॅचुसेट्स वसाहतींतील प्रतिनिधीही या सभेंत दाखल झाले, सर्वच वसाहती इंग्रज राजसत्तेखाली असल्यामुळे सभापतीस फक्त मत प्रदर्शनाचे हक्क होते. नियंत्रण सत्ता नव्हती. प्रत्येक वसाहतीस स्वतःकरिता कायदे करण्याचा हक्क असल्यामुळे या महासभेंत सर्वांना साधक बाधक अशाच विषयांचा केवळ उहापोह करण्यांत येई.

इ. स. १६४० साली इंग्लंडमध्यें राजसत्तेची उलथापालथ होऊन पहिल्या चार्लस राजास फासावर लटकाविण्यात आले, त्यामुळे वसाहतीनहीं राजकीय मतभेद सुरू झाले. व्हर्जीनियातील लोकांचा कल प्रथमपासून राजपक्षाकडे होता. त्यावेळचा गव्हरनर सर विल्यम बर्कले हाही राजपक्षीय होता पहिल्या चार्लसनंतर व्हर्जीनियातील लोकांनी दुसऱ्या चार्लस राजाची द्वाही फिरविली, पण हे कृत्य, इग्लंडांत डिक्टटर असलेल्या ऑलिव्हर क्रॉमवेलला आवडले नाहीं. त्यानें एक लढाऊ गलबत व्हर्जीनियास पाठविले. व्हर्जीनियातील लोकांनी क्रॉमवेलची सत्ता पूर्णपणें स्थापित झाल्याचे पाहिले त्यावेळी तह करून व त्याच्याशी मित्वाचे नात्याने राहण्याचे कबूल करून ते मोकळे झाले. पुढें क्रॉमवेलची सत्ता लटपटून दुसरा चार्लस राजा गादीवर आला. त्याला सर्व ब्रिटिश मुलुख आपली व आपल्या भोवतालच्या हांजी हांजी करणाऱ्या लोकांची खाजगी मालमत्ताच आहे असे वाटे. आपल्या प्रभावळींतील वाटेल त्या माणसास अमेरिकेतील मोठमोठ्या वसाहती देण्याचे त्याने सुरू केले वास्तविक त्या पूर्वीच दुसऱ्या कोणास तरी देऊन टाकिलेल्या असत, व पंचवीस पंचवीस-तीस तीस वर्षाच्या जुन्या वसाहतवाल्यानां सुद्धां आपण कोणाची तरी खाजगी मालमत्ता आहोत असे आढळून येई. एके वेळी दुसऱ्या चार्लसनें संबंध व्हर्जीनिया प्रांतच दोन लॉर्डाना बहाल केला. अशा तऱ्हेच्या नित्य कटकटी उत्पन्न होत, पण त्यांतूनही वसाहतीची प्रगतीच होत चालली. मॅसॅचुसेटसमधील लोक पहिल्यापासूनच राजसत्तेविरुद्ध असल्यामुळें क्रॉमवेल डिक्टेटर होतांच त्यांनां आनंद झाला. खुद्द ऑलिव्हर क्रॉमवेलचीही मॅसॅचुसेटसवर मेहेरबानीच होती.

इ. स. १६५६ चे जूनमध्यें क्वेकर लोक बॉस्टनचे किनाऱ्यास लागले. त्यांच्यामध्ये ॲन ऑस्टिन व मेरी फिशर अशा दोन स्त्रिया होत्या, एका-एकीं या दोन स्त्रिया चेटक्या आहेत अशी बातमी पसरली. झालें ! सर्व लोक हवालदिल होऊन गेले. त्या दोन्हीं स्त्रिया खरोखरीच चेटक्या आहेत कीं काय हे पाहाण्याकरितां त्यांनां उघडे करण्यांत आले, त्यांचें सर्व सामान तपासून त्यांच्या जवळचीं पुस्तके जाळण्यात आलीं, व त्यांनां तुरुंगांत ठेवण्यांत आले व नंतर त्यांनां हद्दपार करण्यांत आले. आणखी बऱ्याच क्वेकर पंथाचे लोकांस चोप देऊन हांकलून देण्यांत आलें. जसजसा क्वेकर लोकांविरुद्ध कायद्याचा कडक अंमल होऊं लागला तसतसा त्यांनांही जोर चढला व त्यांची संख्या वाढूंच लागली. पुढें तर युनायटेड कॉलनीज व मॅसचुसेट्समध्ये क्वेकर पंथाचा मनुष्य आढळला की त्याला फांशीच देऊन टाकीत. इ. स. १६५९ सालीं चौघा क्वेकर लोकांस फांशी देण्यांत आले. त्यामध्ये एक बाई होती पण तिच्यावरही दया करण्यांत आली नाही. इतकी या वसाहतीत धर्मवेड व असाहिष्णुता ही बळावली होती.

अमेरिकेत जसजशा वसाहती होऊं लागल्या तसतसा इंग्लंडच्या व्यापारांत इष्ट फरक घडून येऊं लागला, व त्यामुळें अधिक वसाहती करण्यास इंग्रज लोकांस जोर आला. स्पॅनिश लोकांनीं केलेल्या वसाहती-पासून स्पेननें अतोनात संपत्ति कमाविली व त्यामुळें इंग्रजांस त्याची स्पर्धा वाटूं लागली होती, एका इंग्रज व्यापाऱ्यानें स्पेनला कसें नामोहरम करतां येईल ( How spain may be abased ) या विषयावर एक चोपडे प्रसिद्ध केले, त्यात वेस्ट इंडीजवर हल्ला करून स्पॅनिश लोकांस हांकलून द्यावें व अमेरिकन किनाऱ्यावर जहाजें बांधण्याचे कारखाने काढून तेथे थोडी फौज ठेवावी, असें प्रतिपादन केले होतें. स्पेननें अमेरिकेंतून आणलेल्या सोन्याचा इंग्रजी बाजारावर परिणाम होऊं लागला त्यामुळें एकंदर पदार्थांच्या किमती चढूं लागल्या व व्यापारी व कारखान-दार लोकांस चांगला फायदा मिळून त्यांनां आपापले धंदे करण्यास उत्तेजन मिळालें. देशांत भांडवलाची वाढ होऊं लागली होती व भांडवलवाले

केवळ स्वदेशांतच नव्हे तर इतरत्रही भांडवल गुंतवून व्यापार करण्यास व नफा मिळविण्यास सिद्ध झाले होते. पूर्वी व्याजबट्टयाचा धंदा करणे कायद्याविरुद्ध समजलें जात होते पण आता रकमा कर्जाऊ देऊन व्याज घेणे न्याय्य ठरलें होतें. युरोपमधील धार्मिक छळास व राजकीय परिस्थितीस कंटाळलेले व लढाया वगैरेंपासून उद्भवणाऱ्या आपत्ती टाळण्यास इच्छिणारे पुष्कळ लोक इंग्लंडात येऊन राहूं लागले. या लोकांनीं पूर्वी इंग्लंडांत चालू नसलेले अनेक धंदे सुरू केले. तलम कापड, कागद, कांचकाम, व चिनी मातीचे काम असलीं कामे युरोपांतून आश्रयाकरितां इंग्लंडमध्यें आलेल्या लोकानीं इंग्लंडात सुरू केलीं हे लक्षांत ठेवण्यासारखे आहे. इंग्लंडांत कारखाने वाढूं लागले तसतशा दोन नवीन गोष्टी करणे प्राप्त झाले एकतर तयार झालेल्या मालास गिऱ्हाईक शोधणे, व दुसरे कारखानदारास निरनिराळया तऱ्हेचा कच्चा माल पुरविणे. या दोन्हीही गोष्टींनी पुन्हां व्यापार वाढतच गेला, व इंग्लंडचे जहाजवाल्यास अधिक काम मिळूं लागले. त्यावेळच्या पुष्कळ इंग्रज लोकांनी लिहिलेल्या व्यापाराविषयींच्या ग्रंथाचे सार असें आहे की 'कांही थोड्या कालातच अमेरिकन इंडियन लोक ब्रिटिश मालाचे मोठे गिऱ्हाईक बनेल, त्यांतच वसाहतीकरिताही गेलेल्या लोकांच्या गिऱ्हाईकांची मोठी भर पडेल, व्यापार वाढेल तसतशी जहाजवाल्यांची व खलाशी लोकांची संख्या वाढेल, त्याच्यात कर्तबगारी व कौशल्य यांची वृद्धि होईल व त्यामुळें मोठें लढाऊ आरमार ठेवण्यास उत्तम संधि प्राप्त होईल. इंग्लंडातील कारखानदारानां कच्चा माल पुरविण्याचे काम वसाहतवाल्यांचे कडून उत्तम प्रकारें करवून घेण्यांत येईल. इंग्लंडांतील बेकार लोकसंख्या वाढत चालली आहे, त्यांना परदेशी पाठवून त्याच्या पोटापाण्याची तरतूद परभारे होईल. मच्छीमारीचा धंदा वाढेल व या सर्व उलाढालींवर किंचित् जरी कर ठेवले तरी सरकारी खात्यांतील शिल्लक वाढेल. व्यापारांत पुरेपूर फायदा होण्यासाठी इंडियन लोकांस ख्रिस्ती बनविल्यास व त्यांच्यांत युरोपियन धर्तीच्या रहाणीचा फैलाव केल्यास मोठा उपयोग होणार आहे असेंही त्यावेळी लिहिलेल्या पुस्तकांत प्रतिपादिलें होते.

पहिल्याप्रथम ज्या वसाहती स्थापन झाल्या त्यांना आलेल्या अड-चणींचें वर्णन मागें आलेच आहे. त्याशिवाय एक आर्थिक अडचण उद्भवली होती. सर्वच वसाहतवाल्यांकडून वसाहत कंपनीचे मालक काम घेत व त्यांनी कमाविलेली संपत्ति एका समाईक कोठारांत ठेवीत. तिचा सर्वत्रांस सारखा उपयोग होत असे, व कांही शिल्लक उरल्यास कंपनीवाले घेत. थोडे दिवस ही व्यवस्था ठीक चालली, पण नंतर जे चांगल चांगले कामकरी होते त्यांना आढळून आले की आपण कितीही काम केले तरी आपणास मिळकत ठरीवच, मग काम तरी जास्त कां करा ? म्हणून त्यांच्यांत चुकारूपणा व कामाची हेळसांड हे दुर्गुण शिरूं लागले पुढे जे जे चांगले व पुष्कळ काम करीत त्याना तीन एकर जमिनीचा तुकडा स्वतःचे फायद्याकरितां लागवड करण्यास बक्षिस देण्यांत येऊं लागला. इ. स. १६०६ ते १६२५ चे दरम्यान ६००० लोक व्हर्जीनियात गेले.

जेम्स टाऊनचे वसाहतीनंतर प्लिमाऊथ, सालेम, बॉस्टन, वगैरे वसाहती झाल्या. तेथेही भांडवलाची अडचण भासूं लागली होती ती लंडन येथील व्यापाऱ्यांनी दूर केली. वसाहतीत जाणाऱ्या प्रत्येक माण-सास एक शेअर मोफत देत, त्याची किंमत दहा पौंड समजण्यांत येई वसाहतीत सात वर्षे समाईक मालकीचे तत्वावर काम केल्यानंतर प्रत्येक मजुरास स्वतंत्र होतां येई, व इतक्या मुदतीत सर्व शेअरवर जो समाईक खात्यांत फायदा राहिला असेल त्यापैकी दहा पौंडांवरचा फायदा त्याचे पदरी एकदम पडे व तेवढ्यांत स्वतंत्रपणे शेती व धंदा करण्यास तो मोकळा होइ. सात वर्षांत दुसऱ्याचे खर्चाने मिळाविलेला अनुभव या मुक्त मजुरास फार उपयोगी पडे. ही योजना तरुण मंडळीस पसंत पडेना, तरुण मंडळी स्वभावतःच जास्त काम करीत व म्हाताऱ्याकोताऱ्यास इतके काम होत नसे. सरते शेवटी जेम्स टाऊनच्या सर्व राहिवाशांनीं कंपनीचें कर्ज सुमारें १८०० पौंड समाईक भांडवलांतून एकदम देऊन टाकिलें व सर्वच लोक मुदत बंदींतून स्वतंत्र झाले. ही गोष्ट इ. स. १६२७ सालीं घडली.

इंग्लिश वसाहतींची एकंदर लोकसंख्या इ. स. १६४० सालीं सुमारें पंचवीस हजार होती, व त्यापैकीं जवळ जवळ पंधरा हजार लोक एकट्या व्हर्जीनियांत होत. इ. स १७०० पर्यंत ही लोकसंख्या सुमारें दोन लक्ष बासष्ट हजार इतकी झाली होती. इ. स. १७६० सालीं ती सुमारें पंधरा लक्ष, व १७९० सालीं जवळ जवळ चाळीस लक्ष झाली.

अगदी पहिल्यापासूनच इंग्रज व इतर वसाहतवाले यांच्यांत निकट संबंध येत गेला, व त्याच्यात एकी व बेटीव्यवहार वाढत जाऊन त्या सर्वांचें एक स्वतंत्र राष्ट्रच बनत चालले. त्यांच्यात न मिसळूं शकणारे म्हणजे फक्त निग्रो लोकच काय ते वेगळे राहिले. निग्रो लोकाची संख्या प्रथम फार वाढली नाही; इ. स. १७१५ सालापर्यंत ती फक्त ५८००० इतकीच होती. पण पुढे मजुरांचा जसजसा तुटवडा पडूं लागला व तादूळ व कापूस यासारखी पिकें काढण्यास युरोपीयापेक्षां निग्रोच अधिक लायक व स्वस्त आहेत असे आढळून आले तसतसे अधिक निग्रो लोक अमेरिकेत आणण्यात येऊं लागले त्यांची नैसर्गिक प्रजावृद्धीही होत होती. तिचा परिणाम असा झाला की, इ. स. १७५४ साला या लोकाची संख्या दोन लक्ष साठ हजार होती ती १७८० साली पांच लक्ष साठ हजार झाली.

लोकसंख्येच्या वाढीच्या प्रमाणावरून वसाहतीच्या प्रगतीचा अंदाज वाचकांस येईलच. यांत्रिक साधनाचा त्यावेळी अभाव असल्यामुळे व निर्वाहाचे जिनसांकरितां मुख्यत्वें निसर्गावरच अवलंबून राहावे लागल्यामुळे सांपत्तिक वाढ विशिष्ट प्रमाणाबाहेर झाली नाही

वसाहतीत पहिल्याप्रथम शेती, लाकडांचा व्यापार व मच्छीमारी हे धंदे सुरूं झाले. नैसर्गिक परिस्थित्यनुरूप व त्या वेळच्या या धंद्यासंबंधींच्या ज्ञानानुरूप प्रत्येक वसाहतीची कमीअधिक प्रगति होत गेली. इंग्रज लोकांस वसाहतींतील शेतकी हा अगदीं नवीन विषय होता. तंबाखू, मका, तांदूळ व नीळ या जिनसा पिकविण्यासंबंधीं त्यांना माहिती असणें संभवनीय नव्हतें. दुसऱ्या कित्येक पिकांसंबंधीं सुद्धां अशीच स्थिति होती

पण यदाकदाचित् एकादें पीक काढण्याचें कौशल्य हाती आलें तर त्याला नवीन बाजार मिळण्याची खात्री असल्यामुळें, निरनिराळे प्रयोग करून पाहाण्यास त्यांना धीर आला होता. इंग्लंडला नवेनवे व्यापाराचे जिन्नस मिळाल्यास पाहिजे होते, त्यामुळें वसाहतवाल्यांस प्रयोग करून पाहाण्यास इंग्रज व्यापाऱ्यांकडून उत्तेजन मिळे. व्हर्जीनियातील लोकांनीं प्रथम रेशीम व द्राक्षें पिकविण्याची खटपट करून पाहिली, पण त्यात त्याना पूर्ण अपयश आलें. त्यांनीं तुतीच्या झाडांची लागवड केली रेशीम तयार करण्यासंबंधी इतर भाषेतील पुस्तकें जमवून त्यांचीं भाषांतरें करविलीं. फ्रेंच व इटालियन तज्ञ नेमून पाहिले. पण सर्व व्यर्थ. तंबाखू पिकविण्यांत लवकरच यश येऊं लागल्यामुळे व तंबाखूस किंमतही चांगली मिळत असल्यामुळे पुढें या विषयाकडे कोणी ढुंकूनही पाहीना. पण व्हर्जीनियाचे सरकारने याविषयीं सारखी खटपट सुरूं ठेविलीच होती. जॉर्जिया व इतर वसाहतीनीही रेशीम पिकविण्याची खटपट करून पाहिली पण कोणासही यश आले नाही

न्यू इंग्लंडमधील लोकांची तादूळ, नीळ, व ताग पिकविण्याची खटपट चालू होती. गाई व बैल याचे ऐवजी म्हशी व रेडे वाढविण्याचीही खटपट करून पाहाण्यात आली, तसेच दक्षिण भागांत दालचिनी व ऑलिव्ह फळें यांची लागवड करून पाहाण्यात आली. वरील बहुतेक खटपटीत बरेच भांडवल व्यर्थ गेले, कदाचित् अधिक खटपटाने त्यांत यश आलें नसतेंच असें ह्मणतां येत नाहीं, पण दुसरी अधिक सुकर अशीं पिकें काढता येऊं लागल्यामुळें व त्यांत फायदाही जबर पडूं लागल्यामुळें हे प्रयोग जवळ जवळ फुकटच गेले.

या नवीन जगांत आपलें बस्तान नीट बसवण्याकरितां युरोपियन लोकानीं जी अविश्रांत खटपट चालविली होती तीत त्यांना इंडियन लोकांपासून फार मदत झाली. मका पिकविण्याच्या सर्व पद्धती ते इंडियन लोकांपासून शिकले. मक्यास प्रथम युरोपचे बाजारांत किंमत येत नसे हें खरें पण निर्वाहाचें साधन ह्मणून त्याचा फार उपयोग झाला व पुढें जसजसें पश्चिमेकडील मुलखाचें आक्रमण होऊं लागले तसतसें मका हेंच

निर्वाहाचें प्राथमिक साधन बनत चाललें. विशेषतः ज्यावेळीं इतर पिकें अतिवृष्टि, अनावृष्टि, किंवा झंजावात यांनीं, अगर तीं पिकें काढण्याची नक्की पद्धति माहीत नसल्यामुळे, नासून जात त्यावेळी मका हेंच जलद व हमखास उगवणारें धान्य मनुष्य व जनावरे या दोहोंनांही निर्वाहाचें साधन होऊन राही. प्लिमाऊथ येथील शेतकरी एका इंडियन मित्रापासून मका कसा पिकवावा हे शिकले. या इंडियनाचे नांव स्क्वॅन्टो असें होते.

झाडे पाडण्याचें व जंगल तोडून शेतीची जागा निर्माण करण्याचे शास्त्रही इंडियन लोकांपासूनच वसाहतवाल्यांस शिकावें लागले. हें काम अत्यंत किचकट व अंगमेहेनतीचे होते व ते वसाहतवाल्यांस बिलकुल आवडत नसे. ते झाडे तोडून टाकीत असत इंडियन लोकांची पद्धत सोपी होती ते झाडांच्या बुंध्याभोंवती विस्तव पेटवून किंवा मर्मस्थानीं घाव घालून तीं मारून टाकीत. मग मोठा वारा सुटतांच तीं कोसळून पडत. मग उपयोगी भाग तेवढा कापून काढून त्याचे तक्ते किंवा बहाले पाडीत व बाकी जागचे जागी जाळून टाकीत, त्यामुळे पुष्कळ मेहनत वांचे. पडलेल्या राखेपासून जमिनी सुपीक होत. जंगल पुष्कळ असल्यामुळे त्या पद्धतीनें आर्थिक नुकसान त्यावेळी तरी होत नसे. सुमारे २०० शें वर्षेपर्यंत वसाहतवाल्यानी या पद्धतीचा अवलंब केला.

न्यू इंग्लंडमधाल जमीन एकंदरींत सुपीक अशी नव्हतीच. कांहीं कांही ठिकाणीं मका हेंच एकंदरींत निर्वाहाचें व व्यापाराचे साधन होऊन बसलें होतें. नाण्याप्रमाणेंही मक्याचा उपयोग करीत. इ. स. १६४१ सालीं एक बुशेल मक्याची किंमत चार शिलिंग ठरविण्यात आली होती. मॅसॅचुसेटसमध्यें गहूं पिकविण्याचा प्रयत्न चालू होता. पण पीक नक्की हातीं येईलच अशी खात्री नसे. त्यामुळें मका हेच निर्वाहाचें मुख्य साधन झालें होतें.

बहुतेक वसाहतींतून सपाटून उंच असे गवत उगवत असे. त्याचा जनावरांचे निर्वाहाचे कामीं उपयोग होई. हिवाळयांत बर्फ पडलें म्हणजे जनावरांचे हाल होत, त्यामुळें हिंवाळयांकरितां गवत अगोदर कापून

त्याच्या गंज्या रचून ठेवीत. बटाट्यांची लागवड होऊं लागली नव्हती तों-पर्यंत मुळे, गाजरें, कांदे, वाटाणे, भोपळे व इतर फळभाज्यांची लागवड करीत असत. सफरचंदांचीं झाडें पुष्कळ होतीं सफरचंदांचा खाण्याकडे व सायडर नामक मद्य तयार करण्याच कामी उपयोग होत असे. उन्हाळ्यांत सायडर थंड करून पीत, हिवाळ्यांत ती गरम करून त्यांत कांहीं पदार्थ घालून वापरीत, कोणाचा दफनविधि झाला ह्मणजे त्याप्रसंगी सायडर दारूचा खप विशेष होई, अठराव्या शतकाचे आरंभापर्यंत बटाट्याची लागवड मोठ्या प्रमाणात होत नव्हती. आयर्लंडातून प्रेसबिटेरियन धर्म-पंथाचे लोक अमेरिकेंत आले, त्यानी बटाट्याची लागवड करण्यास सुरुवात केली. बटाट्याचे संबंधी बऱ्याच भ्रामक समजुती प्रथम होत्या. दररोज खाण्यास ते हितावह नाहींत, तसेच नित्य बटाटे खाणारा मनुष्य सात वर्षा-पेक्षा अधिक जगणे शक्य नाही अशा समजूत होती.

प्रावरणाचीं मुख्य वस्त्रे लोकर, ताग व अंबाडी यापासून बनवीत, कापूस वेस्ट इंडीजपासून थोड्या प्रमाणात येई. ताग, इंग्लंड व स्वीडन-मधून येई. अंबाडीपासून दोर करून ते जहाजें व मचवे याचे शिडासाठी वापरीत हातरुमाल, चादरी वगैरे तागाच्या असत पण त्याना ' काप-साचीं वस्त्रें असेंच ह्मणत. दुभतीं जनावरें, शेळया, व मेंढ्या याची जोपा-सना व वाढ प्रथमपासूनच चालू होती नतर लोक घोडेही बाळगूं लागले.

मध्यप्रांतांतील वसाहतीत हवा चांगली व जमीनही अधिक सुपाक होती. गहूं, इतर धान्ये व भाजीपाला पुष्कळ पिके. अठराव्या शतकाचे मध्यापर्यंत फिलाडेलफिया शहरांत बाहेरगावांहून सुमारें दहा ते पंधरा हजार गाड्या माल येई त्याचप्रमाणें डिलावेर व श्वेल् किल नद्यांतून पुष्कळ माल बाहेरगांवीं जाई हडसन व मोहॉक खोऱ्यातून न्यूयॉर्कमध्यें धान्य व इतर माल पुष्कळ येत असे. त्यांतील बराच न्यूयॉर्कमध्यें खर्च होऊन बाकीचा परदेशी रवाना होई. व्हर्जीनिया व मेरीलॅंड येथे इतर सर्व जातींचीं पिकें होत असत तरी तंबाखू पिकवण्यावर तेथील लोकांचा विशेष जोर असे. दक्षिण कॅरोलिना येथें तांदूळ व कापूस अधिक प्रमाणावर पिकत असे, पण त्यावेळीं लोकांस त्याचें तितकेसें महत्व वाटत नसे कारण

तो साफ करण्याची व त्याचा कपडा बनविण्याची कला त्यांस अवगत नव्हती, व म्हणूनच व्यापारी दृष्टीने अद्याप कापसाचे महत्व वाढलें नव्हतें. व्हर्जीनियांत तंबाखू पिकाविण्यास कोणत्याही अडचणी आल्या नाहीत. एकतर इंडियन लोक पूर्वीपासून तंबाखू पिकवीत असल्यामुळें त्यावर कसलेही प्रयोग करावे लागले नाहीत व दुसरे पिकलेल्या तंबाखूस गिऱ्हाईक ताबडतोब मिळे. कोलंबसाचे वेळेपासूनच तंबाखूचा प्रसार युरोपमध्ये किंबहुना सर्व जगभर झाला होता, सर फ्रॅन्सिस ड्रेकने तंबाखू ओढण्याचे साहित्य पूर्वींच इंग्लंडमध्यें आणलें होतें. जेम्स राजाला तंबाखूचा फार तिटकारा असे त्याने तंबाखू ओढणाऱ्यास जबर शिक्षा ठेविली होती, तंबाखू ओढणाऱ्याम वाळीत टाकणे किंबहुना देहांतशासन सुद्धां करणे एका काळीं गैर मानले जात नसे. ही दुष्ट चाल नेत्रांस कंटाळवाणी, बुद्धीस मांद्य आणणारी व फुफ्फुसाम अत्यंत अपायकारक आहे असे तो म्हणे. तसेच तंबाखूपासून निघणारा काळा धूर नरकांतील गंधकाच्या धुराचेच भावंड आहे असे तो प्रतिपादन करी, इतका त्याला तंबाखूचा तिटकारा असे. तरीपण लोक राजरोस तंबाखूचा उपयोग करूं लागले व त्याचा खप वाढतच चालला, व व्हर्जीनिया व मेरीलॅंड या वसाहती त्यावर फार सधन बनूं लागल्या.

व्हर्जीनियाचा तंबाखूचा व्यापार अगदीं भक्कम पायावर उभारला गेला होता. तेथील हवा व जमीन दोन्हीहि तंबाखूचे पिकास फार योग्य व हितावह होती तंबाखू पेरण्यास हवी तेवढी विस्तीर्ण जमीन मिळत होती. तसेच ज्याप्रमाणे मोठमोठ्या कंपन्या गुलाम वगैरे बाळगून ती पिकवीत त्याचप्रमाणें व तितक्याच सुगमतेनें मजुरीतून मुक्त झालेल्या माणसाला सुद्धा अगदीं थोड्या साधनानी ती लहान प्रमाणावर पिकविता येई.

तंबाखूचें वजन किंमतीचे मानाने कमी असल्यानें ती परदेशीं पाठविणें चांगल्या रीतीने परवडत असे. ज्या गलबतांतून तंबाखू समुद्रपार नेत असत ती गलबतें नदीतून तंबाखूच्या लागवडीच्या जागेच्या अगदीं जवळ येऊं शकत त्यामुळें वाहतुकीचा पुष्कळ खर्च वांचत असे. जसजसा

तंबाखूचा खप अधिक होऊं लागला तसतशी वसाहतवाल्यांना सुस्थिति येत चालली.

अगदीं पहिल्याप्रथम ज्यावेळीं वसाहतवाले नुकतेच आले होते व अन्नसामुग्रीवांचून उपाशीं मरत होते त्यावेळी सुद्धां त्यांचे नजरेस तंबाखूचे पिकाची व त्यापासून होणाऱ्या नफ्याची कल्पना आली होती. किंबहुना या बळकट आशेवरच त्यांनी दिवस काढले होते व त्याचा धीर टिकून राहिला होता. याच आशेवर या वसाहतींत मजूर व व्यापारी यांची अधिक गर्दी झाली मजुरीकरिता कितीही माणसे आलीं तरी पुरी पडेनात म्हणून निग्रो गुलामाची आयात करावी लागत असे तंबाखूचे व्यापारांत व शेतींत फायदा पडूं लागल्यामुळें इतर शेतीचे जिनसाकडे लोक दुर्लक्ष करूं लागले. तीच स्थिति लहान लहान धंद्याचीही झाली, व त्यामुळें व्हर्जीनियांत परदेशी तयार मालाचा खप एकसारखा वाढतच चालला. तथील लोकांचे राहाणीतही या तंबाखूचे व्यापारानें फरक पडूं लागला. एकएकट्या माणसासही ती पिकविता येई, त्यामुळे व्यक्तिस्वातंत्र्य अधिक वाढले व लोकांत आत्मविश्वास अधिक प्रगट होऊं लागला. सुखाची राहाणी असल्यामुळे स्वातंत्र्यप्रेमही वृद्धिंगत होऊं लागलें मोठमोठ्या मळेवाल्यांच्या इस्टेटीमुळें त्याच्यात पुढाऱ्यांचेंही प्रस्थ वाढत चाललें. लोक आदरसत्कारांत अत्यंत उदार होऊं लागले, आवश्यक गोष्टींकडे वसाहत-वाल्यांचे पूर्ण दुर्लक्ष होऊं लागलें, वसाहतीकडून निरनिराळ्या प्रकारचा कच्चा माल येऊन इंग्लंडातील कारखाने उत्तम चालावेत हा ब्रिटिश सरकारचा हेतु नीट तडीस जाईना, कारण याकरितां बऱ्याच सधन इंग्रजांनीं आपला पैसा वसाहती स्थापिण्याकरितां खर्च केला होता, व इंग्लंडच्या सरकारनेंही शक्य ती मदत त्याकामीं केली होती. त्याचप्रमाणे तंबाखू बेसुमार पिकूं लागल्यामुळें जीवनास अवश्य असे पदार्थ देखील पिकविण्याकडे वसाहत-वाले दुर्लक्ष करूं लागले मग नवीन पिकांवर प्रयोग करून पाहाण्याचे दूरच राहिल. इ स. १६८८ सालीं शंभर जहाजें भरून तंबाखू इंग्लंडला रवाना झाली, व अजून पन्नास जहाजें भरतील इतकी शिल्लक होती. या गोष्टीवरूनच या एकंदर पिकाची कल्पना येईल.

व्हर्जीनियामध्ये कधींकधी थोडा तांदूळ पिकत असे, व एकेवेळी नीळ पिकविण्याची मोठी लाट तथें उसळली होती, परंतु फारसा उपयोग झाला नाहीं. सरतेशेवटीं हीं दोन्हीं पिकें कॅरोलिना वसाहतींत उत्तम येऊं लागलीं. माडागास्कर जातीच्या तांदुळाचें बीं थॉमस स्मिथ नांवाच्या गृहस्थानें लाविलें. दलदलीच्या जागेंत त्यापासून उत्तम तांदूळ पिकूं लागला. निग्रो लोकांशिवाय सारा दिवस चिखलांत काम करण्यास युरोपियन मजूर तयार होत नसत. शिवाय दलदल असल्यामुळें थंडी–तापाचाही उपद्रव होऊं लागे. त्यामुळे कॅरोलिनांत शेती करण्यास निग्रो मजुरांची अधिक आवश्यकता होती. इ. स. १७५४ सालीं एक लक्ष पिपें तांदूळ कॅरोलिनातून परदेशीं गेला.

हळूं हळूं पिकांत सुधारणा होत गेल्या, वसाहतवाले प्रागतिक नव्हते असे नाहीं, पण खुद्द इंग्लंडमध्येंच शेतीचा ठिकाणा नसल्यामुळें त्यांना सुधारणा करण्यांत कांहींच मदत होऊं शकली नाहीं. वसाहतीमध्यें जे निरनिराळे पिकें काढण्याचे प्रयोग सुरू होते त्यावरून वसाहतवाले कोणतीही सुधारणा करण्यास किती उत्सुक होते हें दिसून येते. शेतकीच्या अवजारामध्यें अद्यापि व्हावी तशी सुधारणा झालेली नव्हती. नुसत्या कोळप्यानें नाहीं तर कुदळीने कसे काम भागे याचें आजकालच्या शेतकऱ्यांस आश्चर्य वाटेल. पण त्यावेळीं एक तर जमिनी सुपीक व न कसलेल्या होत्या, त्यामुळे प्रथम कांहीं दिवस भागलें. नांगर लांकडीच असत व तेही सर्व ठिकाणीं होतेच असें नाही. इ. स. १७३७ सालीं सबंध मॅसेचुसेटसमध्ये अवघे सदतीस नांगर होते असा दाखला सांपडतो.

पेरणीप्रमाणें कापणीच्याही पद्धती तितक्याच अडाणीपणाच्या होत्या. गहूं खुरप्यानें कापीत व घोडे किंवा बैल यांचेकडून तुडवून मळणी करीत. त्याचप्रमाणें शेतावरील माल नेण्याबाबतही कांहीं सुधारणा झाली नव्हती. माल नेण्यास बैलगाड्या असत. बहुतेक चाकांच्या जोड्या इंग्लंडांतून येत. लोखंडी धांवा असलेली चाकजोडी फार मौल्यवान समजली जाई. तसेंच ती पिढ्यानपिढ्या प्रत्येक कुटुंबांत फार महत्वाची वस्तु गणली जात

असे. वसाहतींतून मोठमोठे रस्ते तयार होईपर्यंत गाड्यांचाही व्हावा तसा उपयोग होत नसे. जेथें जलमार्ग असे तेथे बोटींतून व मचव्यांतून माल इष्ट स्थळीं नेण्यात येई. खतें वगैरे फारशीं वापरीतच नमत. जेथे नद्या वगैरे असत तेथील पिकास कधीं कधीं मासळीचें खत घालीत. वसाहतीचे काळात जनावरांची जितकी जोपासाना व्हावी तितकी होत नसे.

जमीन हवी तेवढी असल्यामुळें एके ठिकाणी पीक येईनासे झाले तर दुसरे ठिकाणी पेरीत, शिवाय पुढे धान्यही इतके पिकूं लागले की खाण्यास व व्यापारास पुरून उरलेले धान्य जनावरास घालीत शेतकरी एकमेका-पासून फार लाब लाब अंतरावर राहात, त्यामुळे त्याच्यामध्ये दळणवळण व विचारविनियम कमी होत असे. प्रवास करण्याची व इतर प्रातातील अगर देशांतील स्थिति अवलोकन करून आपल्यामध्ये सुधारणा घडवून आणण्याची संधीही क्वचितच शेतकऱ्यास मिळे परंपरा व गतानुगतिकत्व तसेच भ्रामक व वेडगळ समजुतीने ही कित्येक वेळ सुधारणेच्या आड येत. अमुक दिवशीं अगर अमुक तारे आकाशात दिसूं लागले म्हणज ठरीव शेतीच्या क्रिया करावयाच्या असेल मूळ देशांतील मुहूर्त व आडाखे या नवीन देशांत उपयोगास येईनासे झाले, व नवीन शोध लावण्यास असावी तितकी बुद्धिमत्ता व उदारमतवादित्व त्याच्यामध्ये येण्यास बराच काल लागला.

## जमिनीची व्यवस्था

पहिल्याप्रथम मुदतबंदीचे समाईक कोठारांतून धान्य व नित्योपयोगी जिन्नस मिळत, पण लवकरच ही स्थिति बंद होऊन मालकी हक्काच्या अगर भाडेपट्याच्या जमिनीची पद्धत अमलांत आली. त्यामुळे जमिनी पिकविणाराच्या पदरांत आपण केलेल्या मेहेनतीचे फळ पडूं लागले. त्यामुळे जमिनीची मशागतही नीट होऊं लागली. कांहीं जमिनी मालकांच्या असत व ते लांब भाडेपट्याने देत, त्याही जवळ जवळ मालकी हक्काइतक्याच सवलतीनें मिळत. मालकी हक्क थोडेसें भाडें वसूल करण्यापुरताच असे.

# मुदतबंदीचे मजूर.

युरोपांतील ज्या मजुरास नवीन देशात जाऊन वसाहत करावीशी वाटे, पण गलबताचे भाड्यासाठी व नवीन देशांत खर्चासाठी पैसा नसे, असे मजूर मुदतबंदीचे मजूर म्हणून अमेरिकेस जात. वसाहतवाल्यां-पासून फक्त अन्न वस्त्र घेऊन ते ठरीव वर्षे त्यांचें काम करीत व त्यानंतर मुक्त होत नंतर स्वतंत्र जमिनीची लागवड करून उदर निर्वाह करीत. कित्येक वेळीं मजूर बंदीतून मुक्त होताच ठरीव एकर जमीन लागवडीस देण्याचा करार वसाहतवालेच मजुराशी करीत मुदतबंदीचे मजुरांत 'उमेद-वार मजूर ' म्हणूनही काही तरुण मंडळीस काम मिळे उमेदवार व मजूर यात तत्वत विशेष फरक नसे पण तरुण उमेदवारांस धंदे शिक्षणाच्या काहीं सवलती मिळत. मुदतबंदीचे मजूर स्वतःच्या मुलास बरोबर नेत त्यावेळीं मुलाच्याही मजुरीचा करार वसाहवाल्यांशी करीत, कित्येक वेळ युरोपांतील म्युनिसिपालिट्याही गांवांतील उनाड व बेकार मुलास मुदतबंदीचे मजुराचे करारावर अमेरिकेत पाठवून देत अशा तऱ्हेने युरोपांतून येणाऱ्या मजुरां-मुळे वसाहतीस लागणाऱ्या मजुराचा प्रश्न नीट रीतीने सुटला होता. तंबाखूच्या व्यापाराचे वाढीमुळे दिवसेदिवस अधिक मजूर लागूं लागले. त्यामुळे मुदतबंदीचे मजुरास करार पुरा होतांच पन्नास एकर जमीन लागवडीस देण्याचा ठराव करून देऊन मजूर आणावे लागत. व्हर्जीनिया वगैरे वसाहतीतील सामाजिक परिस्थिति नवीन येणाऱ्या मजुरांस सुखावह असे. युरोपांतील वाढते दारिद्र्य, इंग्लंडांतील मोठमोठ्या शहरांतील बेकार वस्ती, धार्मिक व राजकीय छळ, व तुरुंगातील विशिष्ट कैद्यांना परदेशांत जाण्याची ठेविलेली सवलत या सर्व गोष्टींनी, मुदतबंदीने मजूर पुरविण्याच्या धंद्याला ऊर्जितावस्था आली होती. इंग्लंडप्रमाणे स्कॉटलंड, आयर्लंड व वेल्समध्यें, तसेंच युरोपच्या इतर भागातही या व्यापाराची भरभराट होत चालली. अशारीतीनें थोडा काल गेल्यानंतर वसाहतीना मजूर पुरविणें हा एक मोठा किफायतीचाच धंदा होऊन बसला. लंडन व ब्रिस्टोल हीं या व्यापाराचीं मुख्य ठिकाणें बनली. व्यापाऱ्यांनां, जहाजांचे मालकांना व पुष्कळ अडत्यांना हा धंदा राजरोस व कायदेशीर रीतीनें चालवितां येऊं लागला.

वसाहतींतील मोठमोठे मळेवाले प्रथम मुदत बंदीचे मजूर मागवीत असत, पण पुढें जहाजवाले व व्यापारी स्वतःचेच जबाबदारीवर मजुरांशीं करार करीत, कारण अमेरिकेंत नेल्यावर मजुरांना निश्चित मागणी होतीच हें त्यांनां माहीत होते. मग हळू हळू बेकायदेशीर प्रकारही अंमलांत येऊं लागले. कित्येक वेळां उनाड मुलांस फूस लावून पकडून नेण्यांत येऊं लागलें. इ. स. १६७० सालीं फूस लावून व पकडून नेलेल्या मजुरांची संख्या दहा हजार होती. इ स. १६७१ साली एकाच व्यापाऱ्यानें आपण दरसाल पाचशेपेक्षां अधिक लोकांना फसवून अमेरिकेंत नेले असल्याचे कबूल केलें होते. त्याचा हा क्रम दहा वर्षे चालला होता.

मुदत बंदीचें करारपत्र 'कान्ट्रॅक्ट'च्या स्वरूपाचे असे. एकवीस वर्षा-पेक्षां कमी वयाचे तरुणास अधिक वर्षे मुदत बंदी असे. एकोणीस वर्षांचे मुलांस पांच वर्षे व एकोणीसपेक्षां कमी वय असल्यास वयास चोवीस वर्षे पूर्ण होईपर्यंत नोकरी करण्याचा करार करून द्यावा लागत असे. गुन्हेगार मजुरास सातपासून चौदा वर्षे मजुरीचा करार करून देणें भाग पडे. मागणी जसजशी वाढूं लागली व प्रवासाच्या सोई अधिक होऊं लागल्या तसतशीं मुदत बंदीची वर्षे कमी होऊं लागलीं. थोडे दिवसानंतर मुदत बंदीच्या मजुराच्या कायद्याचे पुस्तकच बाहेर पडले. त्यांत धनी व नोकर यांचे परस्पर संबंध स्पष्टपणें नमूद केलेले होते. कामाचे तास ठरवून देण्यांत आले होते. तसेच, अन्न, वस्त्र राहण्याची जागा व औषधपाणी ही नीट पुरविण्याविषयी सर्व तरतूद या कायद्यानें केली होती, व मुदतबंदीच्या मजुराचे स्वतंत्र व्यक्ति या नात्यानें सर्व हक्क मान्य केले होते.

नवीन जगात मुदतबंदीच्या मजुरांना काम खूपच करावें लागे, व ते पुष्कळ वेळां आतिशय श्रमाचेंही असे. कित्येक मजुरांना फार खाष्ट धनी भेटत, तर कित्येकांना उदार व मायाळू धनी मिळत, पण सर्वांचें भावी सुखाकडे लक्ष असे. कांहीं मजूर उत्तम कारागीर निपजत. कित्येक अत्यंत सुशिक्षित व संभावित लोकही मायदेशास कंटाळून मजूर म्हणून आलेले असत. स्त्रीमजूरही पुष्कळ येत असत. बरेच वेळ स्त्रीमजुरांशीं मालक लग्ने

लावीत. अशा रीतीनें झालेल्या संततींशीं मुदतबंदी मजूरही मुक्त होतांच लग्नें लावीत. पूर्वी मजूर असला तरी मुक्त होतांच संभावित गृहस्थ म्हणून राहण्याची कोणासही आठकाठी नसे, व समाजही त्याच्याकडे मजूर या दृष्टीनें पाहात नसे. एकंदरींत मुदतबंदीचे मजुरापासून सर्वांचा फायदाच होई. जहाजवाले पैसा कमावीत, वसाहतवाले पैसा कमावीत व मजूरही थोडी वर्षे काम करून सुखी व स्वतंत्र होत. हा मुदतबंदीच्या मजुरांचा पुरवठा स्वातंत्र्याची लढाई होईपर्यंत चालू होता. पुढें मात्र या व्यवहारास कायद्यानें बंदी झाली.

निग्रो गुलाम व्हर्जीनियांत पहिल्यानें इ. स. १६१९ सालीं आले, हें मागें सांगितलें आहे. स्पॅनिश वसाहतींत निग्रो गुलामगिरी त्याचेही पूर्वीपासून चालत आली होती. इ. स. १६५० नंतर इंग्रज व्यापाऱ्याचें लक्ष निग्रो गुलामांचेकडे लागलें. सुमारें वीस वर्षांत या व्यापारात त्यांची प्रगति झाली. इ. स. १६९३ सालीं त्यांना निग्रो गुलामाचा व्यापार करण्याची परवानगी राजरोस मिळाली. इ. स. १७१३ सालीं, इंग्लंड व स्पेन याचेमध्ये तह झाला, त्या तहान्वयें इंग्रज लोकास निग्रो गुलामांचा व्यापार करण्याची सनद तीस वर्षे करारानें मिळाली. दरवर्षी गुलामांची ठरीव संख्या अमेरिकेंत पाठविण्यात येऊं लागली, व या व्यापारापासून जो नफा होई तो इंग्लंड व स्पेन सारखा विभागून घेत. इ. स. १६७० सालीं व्हर्जीनियांत युरोपियन व निग्रो नोकराची संख्या तिहीस एक या प्रमाणात होती, तीच व्यस्त प्रमाणांत झाली. इ. स १६९८ पासून १७०७ पर्यंत दरसाल पंचवीस हजार निग्रो गुलाम अमेरिकेंत येत इ. स. १७९० साली झालेल्या खानेसुमारींत निग्रो गुलामांची संख्या ( ६९७००० ) सहा लक्ष सत्त्याण्णव हजार होती- दक्षिण भागांत युरोपियन मजुरांपेक्षां निग्रो मजूर अधिक पसंत करीत. युरोपियन मजूर पाच सात वर्षे मजुरी करून मुक्त, होई व स्वतंत्र धंदा करूं लागे तसें निग्रो मजुरांचें नव्हतें. ते जन्माचेच गुलाम झालेले असत. युरोपियन मजूर, आपले काम शिकतो न शिकतो तोपर्यंत त्याचीं पांचवर्षे पुरीं होत, व तो मोकळा होई. तसे निग्रोचें नसल्यामुळें कांहीं कामें निग्रोस शिकविणें व त्यांचेकडून तीं करवून घेणें अधिक परवडे.

निग्रो गुलामांचे पासून झालेली प्रजा त्याचे मालकाचीच मालमत्ता ठरे. त्यांना खायला कमी दर्जाचें अन्न देण्यांत येई. अत्यंत स्वस्त व जुने-पाने कपडे त्यांना चालत व त्यांच्या राहण्याच्या जागाही घाणेरड्या व स्वस्त इमारतींत असत. त्यामुळें निग्रो गुलामांची मजुरी अत्यंत स्वस्त पडे.

तांदुळाचे शेतांतील काम करण्यास, निग्रोंशिवाय दुसरे कोणी तयारच होत नसत. मनुष्य प्राण्याचे कसलेही हक्क बिचाऱ्या निग्रो गुला-मांस नसत. मालकाच्या गुराढोरांप्रमाणें त्यांस वागविण्यांत येई. गुलामांस चांगलें खावयास घातल्यास त्यांचेकडून जास्त काम करवून घेता येईल या एकाच आशेनें मालकानें त्याना बरें वागविलें तर नशीब! बाकी त्याच्या-बद्दल कोणास कसलीच कदर नसे. या परिस्थितीमुळेंच गुलामगिरीची इतकी झपाट्यानें वाढ झाली, कीं अमेरिकेंत आतां तो मोठा प्रश्न होऊन बसला आहे.

गुलामगिरीच्या व्यापारास पुढे अनेक कारणाने विरोध होऊं लागला, कित्येक ठिकाणी गुलामांची संख्या इतकी वाढली कीं गुलामांनीं बिथरून जर दंगा केला, तर त्याच्यापासून भीति उत्पन्न होण्याचा संभव होता. कित्येक ठिकाणी त्यावेळा असलेल्या गुलामांचाच भाव खूप वाढावा, ह्मणून गुलामांची आयातच कमी करण्याचे प्रयत्न होऊं लागले. हळूं हळूं गुलामाचे आयातीवर कर बसविण्यांत येऊं लागला व कित्येक संस्थानांत पूर्ण बंदी करण्याचे धोरण अमलांत येऊं लागले.

इ. स. १७६० मध्यें कॅरोलिना वसाहतीने गुलामांची आयात पूर्ण बंद करण्याचें धोरण अमलांत आणिलें. पण इंग्लंडांत प्रीव्ही कौन्सिलने या धोरणास नापसंती दर्शवून ते फेटाळून लाविलें. इ. स, १७१० सालीं व्हर्जानियानें दर एक गुलामाचे मागें पांच पौंड कर ठेविला पण, त्याही धोरणास पार्लमेंटची संमति मिळाली नाहीं. इंग्रज लोकांनीं निग्रो गुला-मांच्या व्यापारासंबंधीं अमेरिकेंतलि लोकांच्या मताविरुद्ध धोरण स्वीकार-ल्यामुळे, अमेरिकन लोकांचें मन त्यांच्याविषयीं बिथरलें. स्वातंत्र्याच्या मूळ जाहीरनाम्यांत जेफरसननें इंग्रज राज्यकर्त्यांची पूर्ण हजेरी घेतली

आहे. न्यू इंग्लंड व मध्यवर्ति वसाहतीमध्यें निग्रो गुलामगिरीचा प्रसार मोठ्या प्रमाणावर कधीं झालाच नाहीं. स्वातंत्र्याची लढाई झाल्यानंतर पुष्कळ अमेरिकन लोकांचे मनानें गुलामगिरी ही अन्याय्य गोष्ट आहे व तिच्या योगानें स्वातंत्र्यास बाध येतो, असें घेतले. दक्षिणेंत इतके गुलाम झाले होते कीं जर गुलामांनीं बंड केलें तर त्यांचेपुढे युरोपियन वसाहतवाल्यांचा टिकाव लागणार नाही अशी भीति वाटूं लागली होती. इ. स. १७८९ सालपर्यंत बऱ्याच संस्थानानीं हळूं हळूं निग्रोंची सुटका करण्यास प्रारंभ केला होता. दक्षिणेंतील संस्थानांनी मात्र हें धोरण लवकर स्वीकारिलें नाही.

वसाहतींच्या वेळच्या मोठ्या धंद्यांत लांकडाचा व्यापार हा एक मोठा व्यापार होता. नद्यांचे कांठचीं मोठमोठीं अरण्यें तोडून नदींतूनच ती समुद्रात नेऊन तेथून परदेशांत पाठविणें त्यावेळीं फार सोपें होतें. शिवाय घरकामास व इमारती बाधण्यासही लाकूड पुष्कळ लागे. त्याचा देशांतले देशात फार झपाट्याने खप होई. वसाहती व व्यापार वाढूं लागला तसतसा लांकडांचा खपही अधिक होत चालला. त्यामुळें लांकडांच्या व्यापाराचीं पुष्कळ केंद्रें बनलीं. हवे तितके लाकूड मिळत असल्यामुळें घरें बाधून मोठमोठी शहरे वसविणे फार सोपी गोष्ट होती. हडसन नदीतून ऑलबनी व न्यू यॉर्क येथे येणारें लांकूड न्यू यार्क शहराचे खर्चापुरतें ठऊन बाकी युरोपमध्ये पाठवीत. डिलावेर व श्वेलकील नद्यांमधून आलेलें लांकूड फिलाडेलफिया येथे येई, व तेथून पुढें युरोपला पाठविण्यांत येई. सस्किहाना नदीतून येणारें लांकूड बाल्टिमोरमधून पुढें निर्गत करण्यांत येई. नॉर्थ कॅरोलिना व जॉर्जिया येथील लाकूड मिसिसिपी नदीच्या निरनिराळ्या मुखांतून आणून ते वेस्टइंडीजमध्ये रवाना करीत.

न्यू इंग्लंडचा लांकडांचा व्यापार फार झपाट्यानें वाढला, त्याचे कारण तेथें दुसरा कसला व्यापार जोरांत नव्हता, त्याचप्रमाणें तेथें मोठमोठे धबधबे असल्यानें त्यांचेपासून शक्ति उत्पन्न करून, लांकूड कापण्याचे काम करून घेतां येई.

दुसरा कांहीं धनोत्पादक धंदा हातीं सांपडेपर्यंत प्रथम आलेल्या वसाहतवाल्यांना लांकडाचे धंद्यानें चांगला हात दिला. खुद्द इंग्लंडमध्येंही लांकूड फार महाग होत चाललें होतें. त्याचप्रमाणें इंग्लंडांत जोंपर्यंत दगडी कोळसा कोणी वापरूं लागलें नव्हतें तोंपर्यंत जळाऊ लांकडाचे व्यापाराची सुद्धां खूपच चलती होती. जहाजे बांधण्याचे धंद्यांतही उत्तम लांकूड पुष्कळ लागे, व त्याला किंमतही चांगली येई.

मासेमारीचा धंदाही त्या काळीं उत्तम प्रमाणांत चालू होता, व प्रथम वसाहतवाल्यांस या धंद्यानें तात्कालिक मदत बरीच झाली असल्यास नवल नाहीं.

मच्छीमारीचा व्यापार मुख्यतः न्यू इंग्लंडमध्येंच विशेष वाढला. लाकडांच्या धंद्यापेक्षांही या धंद्यांत पैदास उत्तम होई. बहुतेक वसाहतींत मासळी पुरविण्याचें काम चाले, पण सर्वांपेक्षा न्यू इंग्लंडचाच व्यापार मोठ्या प्रमाणावर होता. न्यू इंग्लंडमध्येंच जहाजें बांधलीं जात असल्याने व तेथील किनाऱ्यास मासळी पुष्कळ मिळत असल्यामुळे बाहेरदेशीं मासळी पाठविण्याचें काम फारच सुलभ झालें होतें. न्यू इंग्लंडमध्यें वसाहत होण्याचे पूर्वीपासून सुद्धां या किनाऱ्यावरून मासळी नेऊन युरोपांत विक्री करण्याचे काम इंग्रज जहाजवाले करीत असत इतकेंच नव्हे तर न्यू इंग्लंडमध्ये वसाहत करण्याचें मुख्य कारण, तेथे मासळी पुष्कळ मिळे हेंच होय. कॉड व देव मासे हच तेथें मुख्यतः विशेष मिळत. नद्यांतून मिळणारे मासेही पकडून आणीत. न्यू इंग्लंडनें मच्छीमारीचे धंद्यास विशेष सवलती ठेविल्या होत्या व या धंद्याची वाढ होण्यासाठी अनुकूल कायदेही केले होते. कॉड माशांच्या तीन प्रती लावीत. उत्तमप्रतीचे मासे इंग्लंडांत पाठवीत, मध्यम दर्जाचे वसाहतींत विकीत व कनिष्ठ प्रकारचे मासे निग्रो गुलामांचें खाद्य म्हणून विकीत, ते मुख्यतः दक्षिण भागांत व वेस्ट इंडीज-मध्यें खपत. मच्छीमारीचे धंद्यांत खलाशी लोकांस भागीदारीनें दाखल करीत व एकंदर मिळकतीचा ठरीव प्रमाणांत हिस्सा त्यांना मिळे. त्यामुळें पुष्कळ खलाशी फार श्रीमंत होऊन स्वतंत्र धंदा करूं लागले व कांहींनीं

स्वतःचीं जहाजें खरेदी केलीं. यावरून या धंद्याचे चलतीचें प्रमाण ध्यानांत येईल.

देव माशांचे शिकारीचें नाटुकेट हें केंद्र होतें. पण पुढें हा धंदा इतर ठिकाणींही पसरत चालला. प्रथम मेलेले देवमासे किनाऱ्यास लागत, त्यावरूनच काम सुरू झालें, नंतर किनाऱ्यालगतच्या प्रदेशांत देवमासे मारूं लागले, व नंतर किनाऱ्यापासून लांबलांबच्या सफरी मच्छीमार बोटी करूं लागल्या. देवमाशापासून चरबी निघे तिचा मेणबत्या करण्याचें कामीं उपयोग करीत. त्याचप्रमाणें वंगणाचीं तेलें तयार करीत. अंबरग्रीस नांवाचे सुवासिक द्रव्य देवमाशाचे पोटांतून काढीत, व हाडकांचा उपयोग कलाकाशल्याच पदार्थ करण्यांत करीत. न्यू इंग्लंडच्या इतिहासांत मच्छीमारीपासून झालेल्या नफ्याचा औद्योगिक सुधारणा करण्याचे कामी फार उपयोग झालेला आहे. तेथें मासळीचा, व्यापारांतच केवळ नव्हे, तर नाण्याप्रमाणे देवघेवीच्या कामीं, मोठा उपयोग करण्यांत येई.

वसाहतीचे कालीं लोखंड, तांबें व शिसें, या तीन धातूंचाच काय तो व्यापार असे. त्यात लोखंडाची प्रामुख्यानें गणना करितां येईल. लोखंडाची अशोधित धातु नदीनाल्यांतील गाळागसून काढीत किंवा त्याचे खडक असत त्यांतून फोडून काढीत. त्यावळीं लोखंड गाळण्याच्या भट्या फारशा सुधारलेल्या नव्हत्या. ओतकाम करीत तें भट्टीतून एकदमच साच्यांत लोखंड ओतून करीत. हल्लीप्रमाणे लोखंडाचे गठ्ठे प्रथम ओतून नंतर पुन्हा वितळवीत नसत. लांकडी कोळशाचाच प्रथम लोखंड गाळण्याचे कामीं उपयोग करीत. अशोधित लोखंड शुद्ध करण्याचे कामीं भट्टींत चुन्याचा उपयोग करीत. अगदीं मोठमोठ्या भट्ट्यातून आठवड्यांतून दहा वीस टना-पेक्षां अधिक लोखंड निघत नसे.

तांबेंही काहीं थोड्याशा प्रमाणांत काढीत. हडसन नदीचे आसमं-तांतल्या प्रदेशांत व न्यू जर्सेमध्यें तांब्याच्या खाणी होत्या. इ. स. १७२१ सालीं १३८६ टन तांबें युरोपांत रवाना झालें. दक्षिण मिसोरी प्रांतांत शिशाच्या खाणी होत्या, त्याचा शिकारी लोकांत गोळ्या वगैरे करण्याचे कामीं खप होत असे, व थोडेसें शिसें युरोपांत पाठविण्यांत येई.

## वसाहतींतील परिस्थिति व आयुष्यक्रम

वसाहतींच्या एकंदर व्यापाराविषयीं विचार करितां असें दिसून येईल कीं ज्या प्रांतांत ज्या व्यापाराचीं साधनें अत्यंत विपुल असत, तिकडे तेथल्या लोकांचें विशेष लक्ष असे. म्हणूनच न्यू इंग्लंडमध्यें मच्छीमारी व लांकडांचा व्यापार; मधल्या वसाहतींत धान्य व जनावरें; व्हर्जीनिया व मेरीलंडमध्यें तंबाखू; दक्षिण कॅरोलिनामध्यें तांदूळ व नीळ; जॉर्जिया व उत्तर कॅरोलिनामध्यें जहाजें बांधण्याचा व इमारती लांकूड; व लुशिआनामध्यें नीळ, साखर, व तंबाखू यांचाच व्यापार व पुरवठा लवकर चालू झाला व तेथील ते स्थाईक धंदे बनले.



# इंडियन लोकांशीं युद्ध

## प्रकरण ५ वें



ऑलिव्हर क्रॉमवेलचे कारकीर्दीनंतर इंग्लडांत दुसरा चार्लस गादीवर आला. त्यामुळें वसाहतींतही आतां नवीन राजकारणास सुरुवात झाली. पूर्वी राजाचे विरुद्ध असलेल्या पक्षाचे लोकांची आतां धडगत नव्हती. ज्या जहाजानें दुसरा चार्लस गादीवर बसल्याची बातमी आणली त्याच जहाजावर दोन उतारू होते व त्यांनींच पहिल्या चार्लस राजास देहान्त शिक्षा ठोठाविली होती. मॅसॅचुसेटचे गव्हरनरनें त्यांना कोणत्याही प्रकारें त्रास दिला नाहीं. पण राजपक्षाचे बाजूचे लोकांनीं त्यांचा पिच्छा पुरविला. बॉस्टनच्या लोकांनी या दोन राजघातक्यांनां मोठ्या शिकस्तीनें बचावलें, व त्यांना पळून जाण्यास मदत केली. ते न्यूहेवन येथें जाऊन छपून बसले. त्यांना पकडून देणाऱ्या माणसांस मोठें बक्षीस लावण्यांत आलें होतें, पण वसाहतींतील रहिवाशी तर राहोच पण इंडियन लोक सुद्धां हें बक्षीस मिळविण्यास पुढे येईनात.

पुढे ज्यावेळीं इंडियन लोकांचा फिलिप नांवाचा राजा सर्वच वसाहतवाल्यांच्यावर उठला, त्यावेळीं विल्यम गॉफे हा छापलेल्या जागेंतून बाहेर आला व मोठ्या धैर्यानें लढून वसाहतवाल्याची त्यानें बाजू राखली. पुढें या दोघांचें नांव मात्र ऐकूं आलें नाहीं.

दुसऱ्या चार्लस् राजानें निरनिराळ्या वसाहतींत जे तंटे होत, त्यांचा निवाडा करण्यासाठीं म्हणून चार न्यायाधीशांचें एक रॉयल कमिशन पाठविलें. अशा तऱ्हेनें पाठविलेल्या न्यायाधशिांचे अधिकार एकवेळ वसाहतवाले मानूं लागले म्हणजे सर्वच वसाहतींवरील आपला अधिकार निर्वेधपणे प्रस्थापित होईल असा त्यांचा डाव होता. पण वसाहतवाले कांहीं इतके

मोळसर नसल्यानें त्यांच्या ध्यानांत हा डाव फार त्वकर आला. इ. स. १६६४ च्या जुलै महिन्यांत हें कमिशन अमेरिकेच्या किनाऱ्यावर उतरलें. त्याचें अमेरिकेनें असें स्वागत केलें कीं आपण केव्हां इंग्लंड गांठतों असें त्यास होऊन गेलें. हें कमिशन हात हालवीत परत आलेलें पाहून चार्लस राजा फार चिडून गेला.

## फिलिपची लढाई

अमेरिकेच्या मुलुखात युरोपीय वसाहतवाल्यांनीं जसजसें अतिक्रमण आरंभिलें तसतशी इंडियन लोकांची पिछेहाट होत चालली. युरोपीय लोकांचीं शस्त्रास्त्रे चांगलीं असल्यामुळें इंडियन लोकाचे त्यांचेपुढे कांही चालेना. त्याचा दिवसेंदिवस नाश होऊ लागला. इंडियन लोकांचा राजा फिलिप यानें वसाहतवाल्यांशीं लढाई सुरू केली. इंग्रजांच्या शस्त्रास्त्रापुढें आपला फारसा टिकाव लागणार नाहीं हे फिलिपला माहीत नव्हतें असे नाहीं त्यानें यापूर्वीच लढाई पुकारली असती पण तो धारणी असल्यामुळे बरेच दिवस इंडियन लोकांत एकी करून लढाईची तयारी करीत होता. सौसामान नावाच्या इंडियन मनुष्यास काही अपराधामुळे वसाहतवाल्यानीं ठार मारिलें, त्यामुळें लढाईला एकदम तोंड लागले. इंडियन लोकांनी आपलीं बायकामुले सर्व नॅरागानसेट येथें पाठविलीं, व हल्लीं ब्रिस्टोल शहर आहे त्याजागी तळ दिला.

तारीख ४ जून १६७५ रोजी सर्व वसाहतवाल्यानी उपवास व प्रार्थना करून त्वकरच सुरू होणाऱ्या लढाईपासून संरक्षण व्हावें म्हणून परमेश्वराची करुणा भाकिली. सुमारें तीनच दिवसांनीं प्राथना करून लोक चर्चमधून बाहेर पडतात, तोंच इंडियन लोकांनीं त्याजवर निकराचा हल्ला केला. त्यानंतर त्यांनीं वसाहतवाल्यांच्या झोपड्या व कोठारें यांस आगी लावून दिल्या धान्याचीं उभीं शेतें व गांवे जाळण्याचा धडा अर्थात् वसाहतवाल्यांनींच इंडियन लोकांस घालून दिला होता. सर्व वसाहतची वसाहत इंडियन लोकांनीं पेटवून दिली, फक्त कॅपटन हचिनसन् व त्याचे सोबती जेथें लपून बसेले होते तेथें मात्र इंडियन लोकांस जातां येईना, कारण त्यांनीं सारखा गोळीबार सुरू ठेविला होता. या घनघोर युद्धांत इंडि-

यन लोकांचीही प्राणहानि विलक्षण झाली. तीन दिवस अहोरात्र इंडियन लोकांनीं हल्ला सुरू ठेविला होता. बाणाचे टोकांस तेलकट चिंध्या बांधून त्या पेटवीत व बाण नेमके रहात्या घरावर सोडीत. घरेंच पेटूं लागल्यामुळे वसाहतवाले हवालदिल झाले पण इतक्यांत असा जोराचा पाऊस आला कीं सर्व दिशांस पाणीच पाणी होऊन गेलें व घरें आपोआप विझलीं. थोड्याच वेळांत कॅप्टन विलार्ड मोठी फौज घेऊन आला, व त्यानें इंडियन लोकांचा पूर्ण पराभव केला. सुमारें ८० इंडियन जागचेजागींच मेलेले आढळले, जखमी किती झाले त्यांचा पत्ताच नाहीं. फिलिपनें ही लढाई पुढें जवळ जवळ वर्षभर चालू ठेविली होती.

दुसऱ्या चार्लस् राजानें वसाहतींत पाठवलेलें न्यायाधीशांचें कमिशन परत आल्यामुळें त्याची फार निराशा झाली पण पुढ त्याचे हातून वसाहत-वाल्यांचे नियंत्रणाबद्दल काही विशेष तजवीज होऊ शकली नाहीं. चार्लस्-नंतर दुसरा जेम्स इंग्लंडचे गादीवर आला. त्यानें सर्व कॉलनींवर म्हणून एक स्वतंत्र गव्हरनर जनरलची नेमणूक केली. जोसेफ डडले गव्हरनर जनरल होऊन वसाहतींत येताच त्यानें सर्व वसाहतींची जी साधारण सभा होती ती मोडून टाकिली, व त्यामुळें वसाहतींतील वातावरण प्रक्षुब्ध होत चाललें.

त्यानंतर सर एडमंड अॅंडोज हा गव्हरनर जनरल झाला. त्यानेंही वसाहतींतील कायद्यांची पिच्छेहाट करून ब्रिटिश अंमल चालू करण्याचा प्रयत्न केला. दुसऱ्या जेम्सला ज्यावेळीं आपली गादी सोडावी लागली, त्यावेळीं अमेरिकन वसाहतींनींही अंड्रोजला हांकून दिलें. पुढें एक महि-न्याचे आंतच सर्व वसाहतींनीं आपली सत्ता प्रस्थापित केली, इतकेंच नव्हे तर अंड्रोज व त्याचे सहकारी याना पकडून तुरुंगांत घातलें.

सतरावे शतकाचे अखेरीस युरोपांत इंग्लंड, फ्रान्स, व हॉलंडचे दरम्यान ज्या लढाया झाल्या त्यांचें प्रतिबिंब अमेरिकन वसाहतींतही पडूं लागलें. नोव्हास्कोशिया येथील फ्रेंच वसाहतींत तंटा माजला. सुमारें आठ वर्षेपर्यंत त्यांच्यामध्यें लढाई चालू राहिली. पुढें ज्यावेळीं इंग्लंड व फ्रान्स यांचा तह झाला त्या वेळीं अमेरिकन वसाहतींतही तह झाला.

फ्रेंच लोक नेहमीं इंडियन लोकांना इंग्रज वसाहतवाल्यांविरुद्ध चिथावणी देत, त्यांना हत्यारें, व दारूगोळा पुरवीत, त्यामुळें इंग्रज वसाहतवाल्यांना जीव नकोसा झाला होता. इंडियन लोकांची संख्या जास्त होती. तसेंच चोरून छापे घालणें व सुधारलेल्या हत्यारांचा उपयोग करणें या गोष्टीही त्यांना अवगत झाल्या होत्या. त्यामुळें वसाहतवाल्यांना नेहमी लढाईस सज्ज अशा स्थितींत राहावें लागे, व व्यापार व शेती यांस त्यामुळें मोठा व्यत्यय येत असे. जीवित सुरक्षित राखण्यासाठीं घरांभोवतीं जाड कुंपण घालावें लागे. शाळा–प्रार्थनामंदिरें यांभोवतीं मोठमोठ्या भिंती बांधून तटबंदी करावी लागे, नेहमीं बरोबर हत्यार घेतल्याशिवाय बाहेर जाणें धोक्याचें होतें. आणि इतकें करूनही प्राणहानि टाळता येत नसे, दररोज थोडातरी रक्तपात होईच.

त्या दिवसांतील आयुष्यक्रम किती कठीण होता, हें मिसेस डास्टिन नांवाच्या बाईच्या हाकिकतीवरून कळून येण्यासारखे आहे. इ. स. १६९७ साली इंडियन लोकानी मॅसाचुसेट्समधील हावरहिल गांवावर हल्ला केला, तेथील वीस लोकांस ठार मारिलें व सुमारें वीस बायकामुलांस पळवून नेलें. त्यावेळीं या गावातील डास्टिन नावाचा एक शेतकरी शेतात कांहीं काम करीत होता त्यानें जेव्हा गावाकडील बाजूस गडबड ऐकिली, त्यावळीं त्याला इंडियन लोकांचा हल्ला आल्याची शंका आली तो ताबडतोब आपल्या घोड्यावर बसला व हातात बंदुक घेऊन स्वतःच्या बायकामुलांच्या रक्षणार्थ एकदम घराकडे धावला. त्याला सात मुलें होतीं. पराक्रमाची शिकस्त करून त्यानें आपल्या सहा मुलांस पळून जाण्यासाठीं वाट मोकळी करून दिली व तो रस्त्याचे नाक्यास रक्षणार्थ उभा राहिला. घरीं त्याची बायको आजारी होती व एक तान्हें मूल होतें इंडियन लोकांनीं त्याचे घरांत शिरून तें तान्हें मूल भिंतीवर आपटून मारिलें, व मिसेस डास्टिन व इतर कांहीं बायकामुलें यांस कैद करून नेलें. मिसेस डास्टिन जरा आजारी होती तरी अत्यंत धाडशी व शूर होती. थोडें अंतर कापल्यानंतर त्या कैद्यांच्या चार पांच लहान टोळ्या बनविण्यांत आल्या व त्यांस निरनिराळया ठिकाणीं नेण्यांत आलें. एका टोळींत मिसेस डास्टिन,



वसाहतींतील धर्मभोळेपणा – चेटक्यांची चौकशी.

पान ७१.

एक दाई, व एक चौदा वर्षांचा मुलगा होता. मिसेस डास्टिनला वाटलें कीं थोड्या वेळांत आपल्याला ठार मारण्यांत येईल. ज्या इंडियन लोकांनी या टोळीस चालत आणलें त्यांना वाटलें कीं हीं माणसें खूप थकलीं आहेत, तेव्हां फारशी हालचाल किंवा दंगाधोपा करणार नाहींत. म्हणून ते निर्धास्तपणें निजून राहिले. मिसेस डास्टिननें दाईस उठविलें व दोघींनींही इंडियन लोकांच्याच कुऱ्हाडी हातात घेऊन निजलेल्या इंडियनांस ठार मारले व त्या परत वसाहतीत आल्या.

इ. स. १७०४ सालीं फ्रेंच व इंडियन या दोहोंनीं मिळून मॅसॅचुसेटसमधील 'डीरिंग' गांवी तसलाच प्रकार पुन्हां केला. त्यांनीं अचानक डीरिंगवर छापा घालून सत्तेचाळीस पुरुष ठार केले व गांवास आग लावून दिली. सुमारें दीडशें बायकामुलांस त्यांनीं कैद करून बर्फातून चालत नेलें, रस्त्यांत थकून जसजसे हे लोक पडूं लागले तसतशी त्यांची, शिरें कुऱ्हाडीनें तोडण्यांत आलीं.

त्यावेळीं धर्मवेडाचा जोर कसा विलक्षण होता याचें एक उदाहरण येथे सांगण्यास हरकत नाहीं न्यू इंग्लंडमधील सालेम नावाचे गांवीं दोन पाद्र्यांमध्यें वितुष्ट आलें. सॅम्युअल पॅरिस नांवाच्या पाद्र्यानें जॉर्ज बरोज नांवाच्या दुसऱ्या पाद्र्यावर तो भुताटकीचे व चेटूकबाजीचे प्रयोग करतो व तें ख्रिस्ती धर्माचे तत्वाविरुद्ध आहे, असा आरोप आणिला. बरोज व त्याचे सुमारें दोनशे अनुयायी या सर्वांवरच सॅम्युअल पॅरिसनें वसाहतीचे डेप्युटी गव्हर्नरसमोर फिर्याद मांडिली. पॅरिसचा स्नेही कॉटन मॅथर हा-ही एक प्रख्यात पाद्री होता, त्यानें पॅरिसला फार मदत केली. बरोज व त्याचे स्नेही या सर्वांस अटकेंत ठेवण्यांत आलें व खटला चालू झाला. या खटल्यांत वीस स्त्रीपुरुषांस देहान्तशिक्षा झाली व ती ताबडतोब अंमलांतही आणली गेली; सुमारें पन्नास लोकांकडून कबुली जबाब घेण्यांत आले व दुसरे दीडशें लोक संशयावरून तुरुंगांत होते व मरणाची वाट पाहात होते.

पहिले वीस लोक ठार मारण्यांत आल्यावर लोकांमध्यें विचारांची लाट उठली असें दिसतें. त्यानीं भुताटकी वगैरे थोतांड आह व त्यापासून कांहींही वाईट होण्याचा संभव नाहीं असें जाहीर केलें व या दुष्ट प्रकाराबद्दल फार गवगवा करून तुरुंगात असलेल्या सर्व दुर्दैवी प्राण्याची सुटका केली. सर्वसाधारणसभेचें अधिवेशन भरविण्यांत आलें, व गव्हर्नरनें भरविलेलें कोर्टच मोडून टाकण्यांत आलें. अशारीतीनें अखेर धार्मिक बंडावर सदसद्विवेक बुद्धीचाच विजय झाला.

इ. स. १७०३ सालीं स्पेनच्या गादीचे वारसाचा तंटा सुरू झाला, व इंग्लंड व फ्रान्स याचेमध्यें युद्ध जुंपलें. त्याचा परिणाम तात्काल वसाहतींतही झाला. कॅनडातील जेसुइट लोकांनीं फ्रेंच लोकांस इंग्रजांविरुद्ध चिथावून दिले फ्रेंच लोकांनीं इंडियन लोकांचे मदतीनें इंग्रज वसाहतींवर हल्ले सुरू केले. इ. स १७०३ व १७०४ या दोन वर्षांत सर्व वसाहतींत धुमाकूळ माजून राहिला होता.

इ. स १७०७ सालीं मॅसचुसेट्समधील इंग्रज लोकांनीं हल्ला करून फ्रेंच लोकांचें पोर्ट रॉयल हें ठाणें काबीज करण्याचा घाट घातला. त्यांचें एक हजार खलाशी सैन्य तयार होतें. फ्रेंच लोकांचा कमांडर बॅरन् कॉस्टिन् यानें अप्रतिम कौशल्यानें हा इंग्रजाचा हल्ला परतवून त्याचा पराभव केला. मॅसचुसेट्सचें या लढ्यात फार मोठें नुकसान झालें व मोठें कर्ज डोक्यावर बसलें, परंतु त्याने लढाई चालूच ठेविली.

इ.स. १७१० सालीं मॅसॅचुसेट्सनें पुन्हा तयारी करून छत्तीस लढाऊ जहाजें बरोबर घेऊन, पोर्ट रॉयलला वेढा घातला. फ्रेंच लोकांची अन्नसामुग्री संपुष्टांत आली व शेवटीं कंटाळून सुमारें अकरा दिवसांनीं ते शरण आले. अशा रीतीनें पोर्ट रॉयल व त्याबरोबर सर्व नोव्हेस्कोशिया ब्रिटिश अंमलाखालीं आला. पोर्ट रॉयलचें नांव बदलून त्यावेळच्या ॲन राणीचें नांव त्या किल्ल्याला ठेवण्यांत आलें व त्याला ॲनोपॉलिस म्हणूं लागले.

शिक्षणाचे बाबतींत न्यू इंग्लंडनें अगदीं प्रथमपासूनच पुढाकार घेतला होता. त्यानें शिक्षण मोफत ठेविलें होतें व मोठ्या शहरांपासून तों



बेन्जामिन फ्रांकलिन्.

पान ७७.

लहान खेड्यांपर्यंत शालागृहें स्थापन केलीं होतीं. त्याचा शिक्षणाचे कामी फार उपयोग झाला. प्रत्येक गांवानें शिक्षणाच्या कांहीं विशेष सोई करावयाचा निश्चय केला हाता. स्वातंत्र्याचें युद्ध झालें, त्यानंतरच्या खानेसुमारीवरून असें दिसून आलें कीं, सबंध न्यू इंग्लंडमध्यें लिहितां—वाचतां न येणारा असा एकही मनुष्य नव्हता. प्युरिटन लोकांच्या धार्मिक समजुतीसंबंधीं वाटेल तें म्हणा पण शिक्षणाच्या बाबतींत त्यांनीं जो विलक्षण पुढाकार घेतला त्यास इतिहासात दुसरी तोड मिळावयाची नाहीं. त्यावेळच्या लोकसंख्येकडे व शिक्षणांतील साधेपणाकडे पाहिलें म्हणजे आताच्याप्रमाणें तो प्रश्न मोठा बिकट होता असे वाटत नाहीं, तरीपण अठरावे शतकाचे मध्यांत न्यू इंग्लंडचे लोकांनीं जो कार्यक्रम पार पाडला त्याचें आश्चर्य वाटल्यावांचून राहात नाहीं.

मध्यभागांतील वसाहतींत शिक्षण इतकें सार्वत्रिक स्वरूपाचें नव्हते पेनसिल्व्हॅनियानें एकंदरीत बरीच मजल मारिली होती. येथेंच बेंजामिन फ्रँकलिनचें शिक्षण झाले, येथेंच त्यानें अध्यापकाचे काम केलें, व केवळ अमेरिकेतच नव्हे तर समुद्रापलीकडील देशांत सुद्धा त्याच्या शैक्षणिक धोरणाची प्रशंसा झाली. पोटोमॅक नदीचे दाक्षिणेस शिक्षणाचा प्रसार बेताचाच होता. विशेषतः श्रीमंत लोकाचे मुलांसच शिक्षण मिळे. हळूंहळूं युरोपांतील धर्तीवर तेथें नवीन शाळा निघू लागल्या. दक्षिणेंत शिक्षण प्रसार विशेष नव्हता. तेथें खाजगी शाळाच विशेष प्रचारांत हात्या. स्कॉटलंडमध्यें निराश होऊन नव्या जगांत आलेले, तसेंच फ्रेंच व आयरिश देशभक्त यांनी नवीन नवीन शाळा काढल्या व तेथेच नवीन देशांतील धडधाकट मुलांस शिक्षण व स्वातंत्र्य या दोहोंचे पाठ नित्यशः मिळूं लागले.

दाक्षिणेकडील प्रांतांत व्हर्जीनियानें शिक्षणाचे कामीं मोठी आघाडी मारिली होती. तेथे मोठमोठे विद्वान लोक पैदा झाले. युरोपांतून आलेले पंडित तेथें शिक्षण देत असत. कांही खाजगी शाळा असत, कांहीं घरींच शिक्षण घेत, तर कांहीं सरकारी कॉलेजांतही जात. शिक्षणासाठीं बहुधा कोणी युरोपमध्यें जात नसत.

जेम्स व बेंजामिन् फ्रँक्लिन् या दोन्हीं बंधूंनीं इ. स. १७२१ मध्यें न्यू इंग्लंड कूरॅंट नावाचे छाटेखानी वर्तमानपत्र काढिलें. त्यांत मुख्यतः युरोपांतील जातिभेद विसरून सर्व अमेरिकन वसाहतवाल्यांनीं बंधुत्वाचे नात्यानें वागावें असा उपदेश असे. इ. स. १७४० मध्यें व्हर्जीनियांत एक, न्यू यॉर्कमध्यें एक, व कॅरोलिनामध्यें एक येवढींच काय तीं वर्तमानपत्रें होतीं. हीं वर्तमानपत्रे नीट न चालण्याचें मुख्य कारण, म्हणजे त्यावेळीं फार मोठालीं शहरें नव्हतीं तसेंच लांब अंतरावर बातमी पसरविण्यास लागणारीं दळणवळणाचीं साधनेंहीं नव्हतीं. बॉस्टन व फिलाडेल्फिया येथे त्यावेळीं अवघी अठरा हजार वस्ती होती. त्यावेळीं पुस्तकांचा प्रसार विशेष नव्हता, व जीं कांहीं पुस्तकें होतीं तीं साधारण प्रतीचींच होती. शिक्षणाचे कामीं खास उपयोग होईल अशीं फारच थोडीं असत.

धर्मासंबंधीं कांहीं पुस्तकें होतीं. त्यांत जुन्या मताचेंच चर्वित चर्वण केलेलें असे, व प्रत्येक पानावर जवळ जवळ तसलाच मजकूर वाचावयास मिळे. प्रागतिक मतांचीं पुस्तकें क्वचितच आढळत. असें असून सुद्धां त्याकाळीं व त्याच प्रांतात थॉमस जेफरसन, फ्रँकलिन, लिव्हिंगस्टोन, ॲडाम्स व हॅमिल्टनसारखे रथी, महारथी, अतिरथी जन्मास आले हें एक आश्चर्यच नव्हे काय? स्वतंत्र वातावरण व प्रसृत कर्तव्यक्षेत्र यांचा नवीन सुशिक्षितांवर इष्ट तो परिणाम घडून आलेला दिसत असे येवढी गोष्ट खरी.

दळणवळणाचीं साधनेंही या काळीं पुरेशीं नव्हतीं. त्यामुळें मोठीच कुचंबणा होई. वसाहतींत झपाट्याचें दळणवळण नसल्यानें त्या एकमेकांपासून जवळ जवळ असून सुद्धां इकडील बातमी तिकडे जात नसे. प्रत्येक वसाहतींत इतर वसाहतींबद्दल पराकाष्ठेचें अज्ञान असलेलें आढळून येई. अद्यापि पोस्ट व त्यासाठीं लागणारीं रस्ते वगैरे साधनें सुरू व्हावयाचीं होतीं. समुद्र किनाऱ्यावर असलेल्या शहरांत दळणवळण कांहीं अंशीं बरें होतें. किनाऱ्यावरून जाणाऱ्या लहान लहान बोटी पत्रें पोहोंचवीत, व जरूरीचे व्यवहार चालू राखीत. समुद्र व नद्यांचे पासून लांब असलेल्या अंतःप्रांतात दळणवळणाची अडचण फार असे. पुरेशा दळणवळणाचे अभावीं, प्रत्येक वसाहतींत एकलकोंडेपणा प्राम्रुख्यानें दिसून येई.

जुलमानें पत्करलेला हा एकांतवास एका दृष्टीनें फार उपयुक्त ठरला. 'एकांत' हें शिक्षण मिळविण्याचें मोठें साधन होय ही म्हण अक्षरशः खरी ठरली.

वसाहतवाल्यांमध्यें एकलकोंड्या राहणीनें एक प्रकारचा स्वावलंबीपणा, मजबुती व काम करण्याची तडफ अनुभवास येऊं लागली, व त्यांचा स्वातंत्र्याविषयींचा अभिमानही विशेष जागृत होऊं लागला. इ. स. १७६६ सालीं न्यू यॉर्कहून फिलाडेलफिया येथें तांग्यानें टपाल जाण्यास पुरे दोन दिवस लागत. त्यावेळीं ही प्रगतीची कमाल आहे असें लोकांस वाटत असे.

न्यू इंग्लडमध्यें जहाजें बांधण्याचा धंदा चांगला नांवारूपास येऊं लागला. इ. स. १७३८ मध्यें बॉस्टन येथील गोदींत एक्केचाळीस जहाजें बांधिली गेलीं. तेंथील लोक या कामी आता बरेच तरबेज झाले होते, आणि हें सर्व इंग्लंडातील सरकार औद्योगिक बाबतींत पराकाष्ठेचें असहिष्णु असताना सुद्धा घडून आले, त्यावरून न्यू इंग्लंडचे लोकांची उत्कृष्ट कार्यतत्परता दिसून येते.

लवकरच न्यू इंग्लडमध्ये कारखाने व इतर व्यापारधंदे सुरू झालेले दिसूं लागले, पण प्रत्येक बाबतींत ब्रिटिश बोर्ड ऑफ ट्रेड कांहीं तरी कारण काढून, कोणत्याही धंद्याचें बस्तान नीट बसूं देत नसे. न्यू इंग्लंडमध्ये एकादी लहान महान कंपनी स्थापन झाला, किंवा एकादा धंदा निघूं लागला, कीं हे बोर्ड मध्यें आडवें येई व कोणत्याना कोणत्या सबबीवर त्याला यश येऊं देत नसे. जर यदाकदाचित् स्वातंत्र्याचे लढाईपूर्वी एकादा धंदा अमेरिकेत अस्तित्वांत आला असला, तर तो ब्रिटिश विरोधास न जुमानतां किंवा बोर्ड ऑफ ट्रेडच्या क्षुद्र वृत्तीस भीक न घालतांच जगून राहिला असला पाहिजे असा सर्वसाधारण सिद्धांत काढण्यास कसलीच हरकत नाहीं.

जसजशी एक एक नवीन पिढी उत्पन्न होऊं लागली, तसतसा प्रत्येक वसाहतींतील निरनिराळया देशांतून आलेल्या वसाहतवाल्यांमधील विश्वास वाढत चालला व शांतता अधिकाधिक प्रमाणांत नांदूं लागली.

# फ्रेंच लोकांची लढाई

## प्रकरण ६ वें



अमेरिकेंत वसाहती स्थापण्याची इंग्रज व फ्रेंच लोकांची स्पर्धा एकसारखी चालू होती इंग्रज लोक किनाऱ्याच्या मार्गानें वसाहती स्थापीत होते, तर फ्रान्स अंतःप्रातांतील आपल्या वसाहतींची वाढ करीत होते इंग्लंडच्या वसाहती जरी किनाऱ्या-किनाऱ्यानें हात होत्या तरी इंग्रज राज्यकर्त्यांचें ह्मणणें पडले कीं, ज्याअर्थी इंग्रज खलाशी कॅबट याने प्रथम या मुलखाचा शोध लाविला त्याअर्थी हा सर्व प्रदेश आमचा आहे. कॅबटनें फार तर किनाऱ्यालगतचा पन्नास ते शंभर मैलांचा प्रदेश धुडाळला असेल पण अटलांटिक महासागरापासून चार हजार मैल दूर असलेल्या पॅसिफिक महासागारापर्यंतच्या सर्व मुलखावर आपला हक्क सागण्यास तें पुरेसें कारण आहे असे इंग्रज राज्यकर्त्यांस वाटत असे. उलटपक्षी फ्रान्सनें अंतर्मुलखांत ( अंतःप्रांतात ) प्रत्यक्ष वसाहती सुद्धां स्थापिल्या होत्या. त्यांची पहिली वसाहत मॉन्ट्रिआल येथे झाली. समुद्रापासून सेंटलॉरेन्सचे मुखांतून आत सुमारें पांचशे मैल प्रवास करून त्यांनीं ही वसाहत स्थापिली होती. सतराव्या शतकाच्या उत्तरार्धांत त्यांनीं पश्चिमेकडे व दक्षिणेकडे आपला मोर्चा वळविला.

युनायटेड स्टेटसचे उत्तरेस असलेल्या ग्रेट लेक्स नावानें प्रसिद्ध असलेल्या लेक ओंटारिओ, लेक हूरॉन, लेक मिचिगन वगैरे सरोवरांचे कांठाकांठानें वसाहती स्थापण्याचें काम चालू झालें. नंतर वाबाश नदीचे मुखांतून इलिनॉय, विनस्कॉसिन, व सेंट लुई येथें ते गेले. त्यानंतर त्यांनीं मिसिसिपी नदींतून दक्षिणेकडे प्रवास करीत करीत थेट मेक्सिकोचें आखात गांठलें व या मार्गावर ठिकठिकाणीं वसाहती स्थापल्या.

युनायटेडस्टेटसच्या नकाशाकडे नजर फिरविली असतां असें दिसून येईल कीं मिसिसिपी नदीचे पूर्वेस युनायटेड स्टेटसचा साधारणपणें एक

तृतीयांश भाग आहे व दोन तृतीयांश भाग पश्चिमेकडे आहे. मिसिसिपी नदीचे आसमंतांत ठिकठिकाणी वसाहती स्थापून एक रुंद पट्टा आपण ताब्यांत ठेविला व त्याचेपलीकडे जाणें इंग्रज वसाहतवाल्यास अशक्य करून सोडल्यास युनायटेड स्टेट्सचा दोन तृतीयांश भाग निर्वेधपणें आपल्या ताब्यांत राहील असा फ्रेंच लोकांचा या अंतःप्रांतांतील वसाहती करण्यांत डाव होता.

मिसिसिपी नदींतून मेक्सिकोपर्यंत थेट जाणारा पहिला धाडसी प्रवासी ला साले हा होय. नायगरा धबधब्याचे वरचे बाजूस यानेंच प्रथम जहाजांतून प्रवास केला. त्याने या कामाकरितां स्वतःचें जहाज बांधिलें. नंतर लेक एरी, लेक हूरॉन, व ग्रीन बे, यांमधून प्रवास करीत करीत, त्यानें मिचिगन सरोवर गाठलें. नंतर सेंट जोसेफ नदींतून तो इलिनॉय नदींत शिरला. तेथें त्याचे फार हाल झाले व त्याला पुढें जाण्यासारखी परिस्थिति राहिली नाहीं, म्हणून तो परत पायीं चालत एक हजार मैल गेला, व त्यानें पोर्ट फ्रॉन्टिनाक गाठलें. त्याचे गैरहजेरीत फादर हेनिपिन नांवाच्या गृहस्थाने इलिनॉय ओलांडून मिसिसिपींत प्रवेश केला. इ. स. १६८१ सालीं ला साले हा परत मिसिसिपींत आला व त्यानें मेक्सिकोचे आखातापर्यंत प्रवास केला. तेथून तो परत फिरला व पुन्हां क्विबेक येथें येऊन फ्रान्स देशास परत आला. मिसिसिपीच्या खोऱ्यात असंख्य वसाहती स्थापून तेथें आपलें अधिराज्य स्थापण्याबद्दल, त्यावेळचा फ्रान्सचा राजा चवदावा लुई यास त्यानें फार गळ घातली. चवदावे लुईनें त्याला चार जहाजे व सर्व सामग्रीसह दोनशें ऐशीं लोक मदतीस दिले. मिसिसिपी नदीचे दक्षिण भागात एक मोठें आधिराज्य स्थापावें असें त्याचे मनानें घेतलें, पण जहाजांचा कप्तान व ला साले यांचें एकमत होईना. कप्तानानें जहाजें भलत्याच दिशेनें चालविलीं व मिसिसिपीचे मुखात शिरण्याचे ऐवजीं पश्चिमेकडे टेक्साचे किनाऱ्यास सर्व जहाजे लागलीं, मग त्यांनीं माटागोर्डो येथें आपली वसाहत स्थापिली.

ला साले याला वरील प्रकरणामुळें फार वाईट वाटलें, पण त्यानें धीर सोडला नाहीं. थोड्याच दिवसांनीं सुमारें पंधरा लोक बरोबर घेऊन

त्यानें मिसिसिपी नदीचे मुखाकडे जाण्याचा प्रयत्न केला, पण त्याची दिशा चुकली. सुमारे साठ दिवस प्रवास करून कोलोराडो नदीचे उगमापर्यंत तो येऊन पोहोंचला. त्याचे मनांत कॅनडांत जावयाचें आलें होतें, पण वाटेंत त्याचे बरोबरचे लोकांत असंतुष्टता उत्पन्न झाली व त्यांनीं त्याला दगलबाजीनें ठार मारिलें. त्याच्या टोळीपैकीं फक्त सात लोक शेवटीं मिसिसिपी नदीचे कांठच्या एका फ्रेंच वसाहतीत पोहोंचले. इ. स. १७५० चे अगोदरच फ्रेंच लोकांनीं नायगरा व फ्रान्टिनाकपासून तों मेक्सिकोचे आखातापर्यंत मिसिसिपी नदीचे खोऱ्यांत ठिकठिकाणीं आपलीं मिशनें, वसाहती, व लढाऊ किल्ले स्थापन केले.

इंग्लंड व फ्रान्स देशांतील पिढिजाद वैरभावामुळें वसाहतींतही इंग्रज व फ्रेंच समाजांत तेढ वाढतच होती. सतरावे शतकाचे शेवटीं जेव्हां फ्रेंच लोकांचे ध्यानांत आलें कीं, आपली लोकसंख्या झपाट्यानें वाढणाऱ्या इंग्रज वसाहतींच्या एक दशांश सुद्धां नाहीं, तेव्हां त्यांना फार स्पर्धा वाटूं लागली. त्यांनीं जेसुइट मिशनरी पाठविण्याचा व मिसिसिपीचे भागांत नवीन वसाहती बांधण्याचा सपाटा सुरू केला. अर्थातच त्याचें इंग्रज लोकांस वैषम्य वाटूं लागलें. इ. स. १७५० पासून या तेढीस मूर्त स्वरूप प्राप्त होऊं लागलें. ओहाओ नदीचे आसमंतांतल्या प्रदेशांत इंडियन लोकांच्या वसाहती होत्या, तेथें त्यांचेबरोबर फ्रेंच लोक लोकरीचा व कातड्याचा व्यापार करीत असत. त्या प्रदेशांत व्हर्जीनिया व पेनासिल्व्हेनिया प्रांतांतील फिरत्या इंग्रज टोळ्याही येऊन व्यापार करूं लागल्या. त्यामुळें दोघांत स्पर्धा उत्पन्न होऊन प्रकरण हातघाईवर आलें. लेक एरीपर्यंतचा सर्व प्रदेश आपला आहे असें इंग्रज वसाहतवाले म्हणूं लागले, व त्यांनीं लगेच आत्मसमर्थनार्थ इंग्रज वसाहतवाल्यांच्या टोळ्यांच्या टोळ्या आणून उभ्या केल्या. पुढें ओहाओ कंपनी स्थापन करून त्यांनीं तो प्रदेश आपल्या ताब्यांतच घतला. फ्रेंच लोकांनीं सुमारे तीनशें लोकांची फलटण पाठविली, व नजीकच किल्ले बांधण्यास सुरुवात केली. इंग्रज लोकांनींही या प्रदेशापर्यंतच्या रस्त्यांची डागडुजी करून वाटेल तेव्हां अधिक लोक जमवितां येतील अशी तयारी त करू लागले.

या दोन युरोपीय राष्ट्रांचे लठ्ठालठ्ठींत आपला चक्काचूर उडणार असें इंडियन लोकांचा प्रमुख हाफ्किंग याला वाटूं लागलें; व त्यानें इंग्रज वसाहतवाल्यांतर्फे बेंजामिन फ्रॅंकलिन् याच्याशीं तह केला. हा तह कार्लाइल मुक्कामी झाला पण त्याचा इंडियन लोकांस पुढें फारसा उपयोग झाला नाहीं.

इंग्रज व फ्रेंच कॉलनींतील प्रकरण जरी हातघाईवर आलें होते तरी मूळ देशात या गोष्टीचा पत्ता लागण्यास अर्थात् काहीं कालावधि लागणें अपरिहार्य होतें. इंग्रज वसाहतींतील लोक मात्र खवळून गेले होते. तरी पण व्हर्जीनियाच्या गव्हर्नरनें असें ठरविलें की कांहीं सामोपचारानें प्रकरण मिटल्यास पाहावें. त्यानें फ्रेंच अधिकाऱ्यांना एक खलिता लिहिला. त्यांत त्यांना ब्रिटिश मुलखाचे बाहेर म्हणजे एरी सरोवराचे पलीकडे ताबडतोब निघून जाण्यास बजाविलें होतें. फ्रेंच कमांडंट जनरल सेंट पेरी याच्याकडे हा खलिता घेऊन जाण्याचें काम, त्यावेळीं सर्व्हेअरचे हुद्यावर असलेला सुप्रसिद्ध जॉर्ज वॉशिंगटन, याला सांगण्यात आले. कमांडंट पेरी हा एरी सरोवराचे कांठीं असलेल्या एका किल्ल्यांत राहात असे. येवढा लांबचा प्रवास करण्यासाठीं वॉशिंग्टनबरोबर फक्त चार सोबती, एक वांटाड्या व एक दुभाष्या इतकीं माणसें होतीं. रानावनांतून मार्ग काढीत काढीत वॉशिंगटन प्रथम हल्लीं पिटसबर्ग शहर आहे तेथे आला. तेथे त्यानें एका इंडियन टोळीशीं सख्य केलें व आपला मार्ग निर्भय करून तिच्याच मदतीनें तो पुढें निघाला. तेथून निव्वळ जंगलांतून प्रवास करीत, मोठमोठ्या नद्या ओलांडून कसाबसा तो कमांडंट पेरी राहात होता तेथे अनेक हालआपत्ती सोशीत जाऊन पोहोंचला. फ्रेंच रीतिरिवाजाप्रमाणें कमांडंट पेरीनें त्याचें स्वागत केले, पण त्याचा खलिता पाहून त्याला हंसूंच आले. लष्करी हुकुमाप्रमाणें फ्रेंच हद्दीवर अतिक्रमण करणाऱ्या प्रत्येक इंग्रजास हांकून देणं आपल्यास प्राप्त आहे असें पेरी म्हणाला.

अशा तऱ्हेचा जबाब मिळाल्यामुळें अर्थातच वॉशिंगटन परत फिरला. परत येतांना त्याचेबरोबर त्याचा दुभाषी जिस्ट हा एकटाच होता. ते ॲलिघेनी नदीपर्यंत मोठ्या कष्टानें येऊन पोहोंचले. त्यावेळीं या

नदीवर सर्वत्र बर्फाचें आच्छादन झालें होतें पण अतिशय धाडसानें त्यांनीं एक तात्पुरता लांकडी ताफा बांधला व त्यावरून ते नदी ओलांडून आले. त्यानंतर त्यांनी इंडियन लोकांसारखा पोषाक केला. थंडीनें कुडकुडत, दाट जंगलांतून रात्री अपरात्री मार्ग काढीत, उत्तर ध्रुवाच्या ताऱ्याचे धोरणानें वाट चालून ते एका मुक्कामावर पोहोचतात तोंच त्यांच्यावर एका इंडियननें गोळी झाडली; पण त्यांना कांहीं एक दुखापत न होता ते तसेच वाट चालूं लागले. पुढे पुन्हां एकदां ॲलिघनी नदी ओलांडण्याचा त्यांना प्रसंग आला. त्यावेळीं नदी दुथडी वाहात होती, म्हणून ती ओलांडणें अशक्य झालें होतें. मग त्यांनी त्या जागा कांही दिवस वाट पाहिली व नदी बर्फानें थिजून जातांच तीतून वाट काढली. नंतर पुन्हां ते जंगलांत शिरले. थोडे दिवसांनंतर ते जिस्ट राहात होता त्या वसाहतींत येऊन पोहोंचले, व तेथून परत व्हर्जीनियांत आले. या भयंकर प्रवासांतून जॉर्ज वॉशिंग्टन हा अगदी शिरसलामत परत आल्यामुळे त्याचे फार कौतुक झालें व त्याच्या कर्तबगारीचा लोकांवर पगडा बसला.

फ्रेंच कमांडंटकडून आलेला जबाब पाहून इंग्रजी वसाहतींचे गव्हर-नरनें योग्य तजवीज करण्याचे आरंभलें. ट्रेंट नांवाच्या एका शूर शिपायाचे बरोबर व्हॉलंटियर लोकांची एक मोठी तुकडी देण्यात आली व हे लोक ॲलिघनी व मोनांगाहीला या नद्यांचे संगमावर म्हणजे हल्लीं पिट्सबर्ग शहर आहे तेथें येऊन पोहोंचले. फ्रेंच लोकांचे धाकदपटशास व बडबडीस भीक न घालतां या नाक्याचे ठिकाणीं येऊन या टोळीनें तळ दिला, व ओहाओ नदीचे ओघाने पुढे जाण्याचा मार्ग सुगम करून ठेविला, पण इतक्या लहानशा सैन्यानें तिचा निभाव लागला नाहीं. कारण ॲलिघेनी नदींतील बर्फ कमी होतांच फ्रेंच लोक मोठाल्या गलबतांतून पुष्कळ सैन्य घेऊन आले व त्यांनीं ट्रेंटला हांकून दिलें, व ती जागा काबीज करून तेथील जंगल वगैरे तोडून त्यांनीं ड्यूकेन नांवाचा किल्ला बांधिला.

जॉर्ज वॉशिंगटनला आतां व्हर्जीनिया वसाहतीच्या सैन्यांत लेफ्ट-नंट कर्नल बनविण्यांत आलें होतें व तो फोर्ट ॲलेक्झांड्रिया येथें फ्रेंच लोकांशीं कराव्या लागणाऱ्या भावी युद्धाकरितां सैन्य जमा करीत होता.

ट्रेंटचा पराभव होऊन तो परत येईपर्यंत त्याला कसलीही कुमक जाऊं शकली नाहीं. धाकदपटशाचा कांहीं उपयोग होईना. आतां युद्ध करून आपला मुलुख परत मिळविला पाहिजे अशी स्थिति येऊन ठपली हा काल इ. स. १७५४ चा होता. अजून युरोपांतील इंग्रज व फ्रेंच सप्त वार्षिक युद्ध सुरूं होण्यास दोन वर्षांचा अवधि होता. तरी पण अमेरिकेंत युद्धास सुरुवात झालीच होती. या युद्धास फ्रेंच-इंडियन लढाई असें नांव पडलें.

फ्रेंच लोकांबरोबर करण्यांत यावयाचे युद्धावर जॉर्ज वॉशिंगटनची नेमणूक झाली. त्याला कर्नल करण्यांत आलें होते. त्यावेळीं त्याचें वय अवघें बावीस वर्षांचें होते. त्याचे हाताखाली त्याचेप्रमाणेंच लढाईचे कामीं पूर्ण अनभिज्ञ असे शिपाई गडी होते. पावसामुळें जे कांहीं थोडे रस्ते होते ते सर्व खराब झाले होते. बाकीचे ठिकाणीं तर रस्ते मुळींच नव्हते. माणसानाच तोफाचे गाडे ओढावे लागत व जवळ शिधासामुग्री-ही भरपूर नव्हती. अशा थाटांत या स्वारीनें आपला कंटाळवाणा प्रवास सुरूं केला. फ्रेंच लोकानीं ट्रेंटला हाकून दिलें; त्याचे अलीकडे एक किल्ला बांधून त्या किल्ल्याचे आधारानें फ्रेंच लोकांना हुसकून देऊन ड्यूकेन येथील फ्रेंच किल्ला हस्तगत करण्याचे काम त्याचेवर सोपविण्यांत आलें होतें. या तरुण सेनापतीजवळ इतर सामुग्री जरी बेताचीच होती तरी उत्साह मात्र अपरंपार होता, व वाटेल ते कष्ट काढण्याची तयारी होता.

इ. स. १७५४ चे मे महिन्यांत हे सैन्य पेनासिल्व्हेनियामधील ग्रेट मेडोज येथें येऊन पोहोचलें. येथे येतांच वॉशिंगटनला बातमी लागली कीं, फ्रेंच लोक आपण ग्रेट मेडोज् येथे येऊं अशी अटकळ बांधून अगोदरच हल्ला करण्याकरितां पलीकडे सज्ज आहेत. वॉशिंगटनने चटकन् मोर्चा वळवून एक सुरक्षित अशी जागा गांठिली व तेथें तो तात्पुरता आश्रय मिळेल अशी तजवीज करीत होता. त्या जागेस त्यानें फोर्ट नेसिसिटी असें नांव दिलें. त्यानंतर वॉशिंगटननें मिंगो नांवाच्या इंडियन टोळीशीं सख्य करून फ्रेंच लोक दबा धरून बसले होते तेथें चाल केली, व तोफेची पहिली सरबत्ती उडवून दिली. फ्रेंच पुढारी जूमॉन व्हिली व त्याचे दहा

लोक ठार झाले व एकवीस लाक कैद करून आणण्यांत आले. अशातऱ्हेनें फ्रेंच युद्धांत वॉशिंग्टननें प्रथम जय तर मिळविला. तेथून तो पुन्हा फोर्ट नेसिसिटी येथें यऊन मागून कुमक काय येते त्याची वाट पाहात बसला. फक्त एक सैनिकांचे तुकडीशिवाय मागून कांहींएक मदत येऊं शकली नाही. हा वेळपर्यंत तो पिट्सबर्गचे दिशेने रस्ता तयार करण्यात गुंतला होता.

मागून कांही एक मदत आली नाहीं हें पाहून मात्र तो विचारात पडला. त्याचे जवळ फक्त चारशें सैनिक होते. मस्किंगम व मियामी येथील इंडियन लोक आपल्याला मदत करतील अशी त्याला फार अपेक्षा होती फ्रेंच व इंग्रज यांचें परस्पर बल ताडून पाहातां त्याना इंग्रजाची बाजू घेऊन लढणें फायद्याचे वाटत नव्हतें. पिट्सबर्गचे दिशेनें रस्ते करण्याचें काम चालूं होतें, इतक्यांत फ्रेंच जनरल डी व्हिलियर्स हा मोठ्या सैन्यानिशीं चाल करून येत आहे अशी चाहूल लागली. फोर्ट नेसिसिटीपर्यंत तो मागें हटला व तेथेंच दबा धरून बसला. डी व्हिलियर्सचे सैन्यानें त्या जागेस वेढा दिला. त्यातच त्याला इंडियन लोकांनीही मदत केली. या सर्वांनी मिळून फोर्ट नेसिसिटीवर सुमारें नऊ तास हल्ला करून अनेक गोळे सोडले व वॉशिंगटनचे सैन्याचें फार नुकसान केलें त्याचे तीस सैनिक या झटापटींत ठार झाले. तो मोठा धीराचा माणूस होता. त्यानें प्रथम जरा नमतें घेऊन शत्रूचा मारा जसा नरम पडला तसा आपला जोराचा हल्ला सुरू केला. शत्रूकडील दारूगोळा बहुतकरून आतांपर्यंत खलास झाला असावा हा त्याचा अंदाज खोटा ठरला नाही. वॉशिंगटननें परत हल्ला सुरू केला, त्याबरोबर डी व्हिलियर्सचे बाजूनें तहाचें बोलणें सुरू झालें, व वॉशिंग्टनची अब्रू बचावली. त्याचेजवळ किती सैन्य आहे याचा विरुद्ध बाजूस सुगावा नव्हता, म्हणूनच वेळ निभावली. पण एकंदरींत सैन्य व दारूगोळा यांचे अभावामुळें वॉशिंगटनला परत फिरावें लागलें. वाशिंगटननें ज्या दिवशीं फ्रेंच सैन्यावर जय मिळविला तो दिवस जुलै महिन्याची चवथी तारीख हा होता. हा दिवस अमेरिकेंत सणाप्रमाणें पाळला जातो.

फ्रेंच लोकांचा लवकर पराभव करून त्यांना हांकून दिलें नाहीं तर इंग्रज वसाहतींची धडगत नाहीं हें मत सर्वच वसाहतींत प्रचलित होत चाललें होतें. एकट्या व्हर्जिनियाचे हातून फ्रेंच लोकांचा पराभव होणें अत्यंत दुरापास्त आहे ही जाणीव इतर वसाहतींत उत्पन्न झाल्यामुळें लवकरच आलबॅनी येथें सर्व वसाहतींतर्फे एक कॉंग्रेस भरविण्यांत आली. या कॉंग्रेसपुढें दुसरें एक जरूरीचें काम होतें.

आतांपर्यंत इरॉकॉय इंडियन लोक त्यांच्याशीं नीट गोडीगुलाबीनें वागत होते, पण फ्रेंच लोकांचे पराक्रमाचा व वैभवाचा त्यांच्या मनांवर अपरोक्ष परिणाम घडत आहे व हे लोक जर कां फ्रेंच लोकांस जाऊन मिळाले तर आपली धडगत नाहीं हें धोरणी मुत्सद्यांस कळून चुकलें होतें. याकरितां इंडियन लोकांशीं आपलें सख्य कोणत्या उपायांनीं कायम राखितां येईल या बाबतीं या सभेपुढें विचार व्हावयाचा होता.

आलबनी येथील कांग्रेसला फार मोठमोठे लोक आले होते. मॅसेचुसेटसतर्फे हचिन्सन, र्‍होड बेटातर्फे हॉपकिन्स, व पेनसिल्व्हेनियातर्फे बेंजामिन फ्रॅंकलिन हे गृहस्थ हजर होते.

इरॉकॉय इंडियन लोकांच्या निरनिराळ्या प्रमुख लोकांशीं कांग्रेसनें वाटाघाट करून पूर्वीचे तह कायम ठेऊन जरूर पडल्यास फ्रेंच लोकांविरुद्ध आपल्यातर्फे लढण्याचें त्यांच्याकडून वचन घेण्यांत आलें त्यानंतर इंडियन लोकांच्या टोळ्या आपापल्या गांवीं परत गेल्या.

सर्व वसाहतींचें मिळून एक मध्यवर्ति सरकार असावें, त्याच्याशिवाय सारावसुली, सार्वजनिक संरक्षण व इतर सामुदायिक व्यवहार करणें कठीण होत आहे, तसेंच शत्रूपासून रक्षण करणें, शत्रूबरोबर लढाई करणें वगैरे गोष्टी एकट्या दुकट्या वसाहतींच्या आटोक्याबाहेरच्या आहेत अशा तऱ्हेचे विचार बेंजामिन फ्रॅंकलिनसारख्या विचारवंत व दूरदर्शी माणसाच डोक्यांत वावरत होते, व नुकत्याच आलेल्या लढाईचे अनुभवावरून सर्व वसाहतींचे लोकांस ही गोष्ट पटली होती ता. १० जुलै १७५४ सालीं बेंजामिन फ्रांकलिन यानें सर्व वसाहतींचे एकीकरणासंबंधीं राज्यघटना या कांग्रेससमोर मांडली. तींत खालील ठराव होते:—

(१) फिलाडेलफिया ही सर्व वसाहतींची मुख्य राजधानी असावी. ( फिलाडेलफिया शहर मोठें, प्रशस्त, व मध्यवर्ति असल्यामुळें अगदीं लांबलांबच्या वसाहतींतील सभासद सुद्धां एका पंधरवड्याचे आंत येऊन पोहोंचतील असें त्याचें म्हणणें होतें. )

(२) सर्व वसाहतींवर एक गव्हरनर जनरल असावा व त्याची नेमणूक इंग्लंडच्या राजातर्फे व्हावी.

(३) कायदेकानू करण्याचा हक्क काँग्रेसला असावा.

(४) काँग्रेसमेंबर्स प्रत्येक वसाहतीचे सार्वजनिक सभेनें निवडावे, व त्यांची निवडणूक प्रत्येक तीन वर्षांनी व्हावी.

(५) प्रत्येक कॉलनीतर्फे कमीतकमी दोन व जास्तींत जास्त सात सभासद असावेत. ज्या मानानें वसाहती कमी अधिक वसूल मुख्य सरकारास देतील, त्या मानानें त्या वसाहतींतर्फे सभासदांची संख्या कमी अधिक असावी.

(६) अधिकारविभागणा, लष्करी अधिकाऱ्यांची नेमणूक, व एखादा कायदा फेटाळून लावणें, वगैरेसंबंधीं हक्क गव्हरनर जनरलला असावे.

(७) उलटपक्षीं लष्कराव्यतिरिक्त इतर खात्यातील नेमणुका करण्याचा, सैन्य जमा करण्याचा, कर बसविण्याचा, व व्यापारी धोरण व जकाती ठरविण्याचा हक्क काँग्रेसला असावा.

सदरहू ठरावांच्या नकला निरनिराळ्या वसाहतींच्या सार्वजनिक सभांच्या सभासदांकडे पाठविण्यांत आल्या. बेंजामिन फ्रँक्लिन् यानें ठरविलेल्या या ठरावांची संभावना निरनिराळ्या वसाहतींत कसकशी झाली हें पाहिलें म्हणजे तत्कालीन लोकमत किती वैचित्र्यपूर्ण होतें हें दिसून येईल. कॉनेक्टिकट वसाहतीनें या सुधारणांवर पूर्ण नापसंती दर्शविली, मॅसॅचुसेटसनें पूर्ण विरोध केला, न्यूयॉर्क वसाहतीनें अर्धवट पसंती दर्शविली, पण पूर्ण समाधान कोणाचेंही झालें नाहीं. बहुतेक वसाहतींचें म्हणणें पडलें कीं कोठलेंही बिल फेटाळण्याचा अधिकार जर गव्हनर जनरलकडे राहिला तर

मग आपलें स्वातंत्र्य तरी कोठें राहिलें ? तसेंच सर्व वसाहतींचे परस्पर संबंध येवढे निकट आणण्यांत सर्वांच्याच स्वातंत्र्यास धोका आहे. सर्व वसाहती एकत्र केल्यानें कदाचित् एककल्ली राजकारणास उत्तेजन मिळेल. कोणी म्हणूं लागल, सर्वच वसाहतींवर एकदम वर्चस्व स्थापण्याचा राजपक्षातर्फेचा हा कांहींतरी डाव आहे. अशा एकीकरणानें प्रत्येक वसाहतीस असलेल्या अनियंत्रित सत्तेस तिला मुकावें लागेल, हें लक्षण कांहीं ठीक नाहीं. अशा तऱ्हेनें सर्वच वसाहतींत एक प्रकारचें संशयखोर वातावरण निर्माण झालें.

तिकडे इंग्लंडमध्यें कोणाला ही घटना आवडेना. फ्रेंच लोकांना अमेरिकेतील ब्रिटिश समजल्या जाणाऱ्या मुलखाबाहेर हाकून देणें जरी अगदीं निकडीचें होतें तरीपण सर्व अमेरिकन वसाहतीचें एकीकरण होणें म्हणजे ब्रिटिश सत्तेस विघातकच आहे असें लोकमत बनूं लागलें. कोणी म्हणूं लागले कीं, अमेरिकन वसाहतींचें एकीकरण करून ब्रिटिश सरकारला हांकून देण्याचा हा सरळ कटच आहे.

इंग्लंडांतून सैन्य पाठवून व मिळेल तेवढी वसाहतींची मदत घेऊन फ्रेंच लोकांना आपल्या देशातून हांकून लावणें येवढीच गोष्ट इंग्लिश मुत्सद्यांना सयुक्तिक दिसत होती.

इकडे फ्रेंच व इंग्लिश मुत्सद्यांमध्यें सामोपचाराची भाषा चालली होती, पण जो तो दुसऱ्या पक्षास शांततारक्षणाचें आश्वासन देत होता, पण गुप्तपणें पंधराव्या लुईनें कॅनडांत तीन हजार सैन्य पाठविलेंच, इंग्लंडही झोंपा घेत नव्हतें. जनरल एडवर्ड ब्रॅडॉक यास दोन फलटणी देऊन अमेरिकेस पाठविण्यांत आलें. त्यानें निरनिराळ्या वसाहतींच गव्हर्नरांची भेट घेऊन त्यांच्यापासून मदत निश्चित करून घेतली, व इ. स. १७५५ चे मे महिन्यांत फोर्ट ड्यूकेनवर हल्ला करून तो ताब्यांत घेण्याचा निश्चय करून तो निघाला.

फोर्ट ड्यूकेनवर चढाईचा हल्ला करण्याची तयारी फार धडाडीनें व उत्साहपूर्वक झाली. इ. स. १७५५ चे जून महिन्याचे आठवे तारखेस

सर्व फौजेनें फोर्ट ड्यूकेनपासून बारा मैलांचे अंतरावर तळ दिला दुसऱ्या दिवशीं मोनांगाहीला नदी ओलांडून टर्टल क्रीक येथें सर्व ब्रिटिश फौज येऊन दाखल झाली, तरी फ्रेंच लोकांस आपला कांहीं पत्ता लागला नाहीं असें ब्रिटिश सेनापतीस वाटत होतें. मध्यंतरी लहानसें जंगल होत तें ओलांडून सर्व फौज पुढे जात होती इतक्यांत विरुद्ध पक्षाकडून जोराचा गोळीबार सुरूं झाला. शत्रु आपल्यावर चाल करून येत आहे यवढा पत्ता लागल्यावर, फोर्ट ड्यूकेनचें संरक्षण करणे कठीण जाईल, असा अंदाज बांधून फ्रेंच व इंडियन फौजा सामोऱ्या येऊन फोर्ट ड्यूकेनपासून कांहीं अंतरावरून त्यांनीं गोळीबार सुरूं केला, व अशा रीतीनें ब्रिटिश फौजेस एकदम शत्रूस तोंड देणें भाग पडलें. लढाईचे सुरुवातीपासूनच ब्रिटिश लोकांचें नुकसान होऊं लागले. फ्रेंच लोकांनी ब्रिटिशांना अशा ठिकाणीं गांठलें होते कीं ब्रिटिश फौज अगदीं उघड्या जागेवर होती तर फ्रेंच फौज दाट जंगलात तळ देऊन बसली होती. मारा सुरूं होतांच ब्रिटिश फौजेनें पुष्कळ गोळे सोडले, पण आपला गोळा नेमका शत्रूवर पडतो आहे कीं नाहीं हें समजण्यास तिला मार्ग नव्हता. तिचें काम अंदाजानें चाललें होतें. उलटपक्षीं फ्रेंच शिपाई झाडांवर चढून त्यांनीं ब्रिटिश फौजेंतील अधिकारी लोकांवर अचुक नेम धरला व सुमारें सत्तीस अधिकारी ठार केले, व सुमारें सातशे शिपाई मारले गेले, त्यामुळें त्यांच्यात दाणादाण उडाली. मुख्य सेनापति ब्रॅडॉक हाही जखमी झाला व थोड्याच वेळात मरण पावला. उरलेल्या सैन्यास सांभाळून घेऊन शिस्तानें मागें हटण्याचें काम यावेळीं जॉर्ज वॉशिंग्टन, जो कर्नलचे हुद्यावर होता, त्याचेवर पडलें. त्यानें मोठ्या धैर्यानें आघाडी रोखून धरली, व मागील सैन्यास पळण्यास अवधि दिला. अशारीतीनें अधिक प्राणहानि न होऊं देतां त्यानें शिस्तीनें पळ काढिला. ब्रिटिश लोकांचें पुष्कळ नुकसान झालें इतकेंच नव्हे तर त्यांचा आत्मविश्वास कमी झाला मुख्य सेनापति मेल्याची ज्यावेळीं सैनिकांस वर्दी लागली त्यावेळीं फारच दाणादाण उडाली. या परत फिरणाऱ्या सैनिकांनीं तोफा, दारूगोळा व सर्व लढाऊ साहित्य जेथल्या तेथेंच टाकून प्रथम फोर्ट कंबरलंड येथें पलायन केलें व नंतर त्यांनीं फिलाडेलफिया गांठली.

फ्रेंच व इंडियन लोकांना, सहजासहजीं मिळालेल्या या जयाचें फारच आश्चर्य वाटलें. इंडियन सैन्यानें मेलेल्या ब्रिटिश शिपायांचे कपडेलत्ते अंगावर चढवून फार्ट ड्यूकेन येथें जाऊन मोठा आनंदोत्सव केला.

इ. स. १७५६ सालीं गव्हर्नर शर्ले याला सर्व ब्रिटिश फौजेचें स्वामित्व मिळालें, त्याचे हाताखालीं, व्हर्जीनियानें जॉर्ज वॉशिंग्टन यास आपल्या सैन्यानिशीं, शेनेंडोहा नदाचे खोऱ्यांतील फ्रेंच व इंडियन यांचा पराभव करून, त्यांना हाकून देण्यासाठीं, पाठविलें पेनसिलव्हॅनिया प्रांतानें फ्रँकलिन् याचे हाताखालीं मोठें सैन्य देऊन क्विबेक, फोर्ट फ्रॉन्टिनाक, टोरांटो, नायगरा व फोर्ट ड्यूकेन इतकीं ठाणीं काबीज करण्याचा घाट घातला. हा वेळपावेतों इंग्लंडमधून दोन फलटणी न्यूयॉर्क येथें येऊन दाखल झाल्या होत्या.

यानंतर लॉर्ड लाऊडोन यास अमेरिकेंतील सर्व सैन्याचा कमांडर इन् चीफ करण्यांत आलें, व सर्वच फ्रेंच वसाहतींवर जोराचे हल्ले करण्याचें काम चालू होऊन मोठाच लढाई जुंपली पहिल्या प्रथम फ्रेंचांचें ऑस्वेगो हें ठाणें काबीज करण्यांत आलें. त्यांत सहा लढाऊ जहाजें, तीनशें बोटी, एकशेंवीस तोफा व फारच मोठी रोख रक्कम इंग्रजांस मिळाली.

याच वर्षी ऑगस्ट महिन्यांत डिलावेर येथील इंडियन लोकांनी मोठा हल्ला करून पेन्सिलव्हॅनियांतील सुमारें एकहजार रहिवाशांस ठार केलें. कर्नल आर्मस्ट्रांग हा तीनशें फौजेनिशीं किटानिंग या नांवाच्या इंडियन गांवावर चाल करून गेला. तें सव गांव त्यानें जाळून टाकिलें व सर्व रहिवाशांस ठार मारण्यास सुरुवात केली, काही थोडे लोक मात्र मोठ्या शिकस्तीनें जीव घेऊन पळाले, पण पुन्हां त्यांचेकडून कधीं फार त्रास झाला नाहीं.

इ. स. १७५७ सालीं लॉर्ड लाऊडोन यानें लुइस्बर्गवर हल्ला करण्याचा घाट घातला. त्याचेजवळ सहाहजार सैन्य जय्यत तयार होतें, व लढाऊ सामुग्रीही भरपूर होती. तो हॅलिफॅक्सपर्यंत गेल्यानंतर अॅडमिरल हॉबर्न हा आपल्या सोळा जहाजांचे आरमारासह व पांच हजार फौजेसह त्याला मिळाला. इतकें असूनही त्याचे हातून पुढें जाण्याचा

धीर झाला नाहीं. कांहीं दिवस हॅलिफॅक्स येथेंच रेंगाळून तो परत न्यूयॉर्कला आला.

उलटपक्षीं फ्रेंच कमांडर मार्किस ऑफ मॉटकाम हा कॅनेडियन व इंडियन मिळून सुमारें सातहजार सैन्य घेऊन न्यूयॉर्कवर चाल करून आला, व तेथील फोर्ट सेंट हेनरी किल्ला त्यानें आपल्या ताब्यात घेतला. सुमारें ६ दिवस फ्रेंच लोकांनीं या किल्ल्यास वेढा दिला. आंतील लोकांचा सर्व दारूगोळा संपतांच त्यानां शरण येणें भाग पडलें. या किल्ल्यात पिण्याच्या दारूचा मोठा सांठा हातीं लागला. मग काय इंडियन सैन्यानें त्याच्यावर तडाखा मारिला, व जय आणि दारू अशा दुहेरी मदानें उन्मत्त होऊन त्यांनीं ज्या लीला केल्या त्याना इतिहासांत तोड सांपडणार नाहीं. या धुंदींत त्यांनीं लढाईत सांपडलेल्या सुमारें तीस कैद्यास निर्दयपणें ठार केलें.

एकंदरींत या सुमारास फ्रेंच लोकांची चढती होऊं लागली. सबंध सेंट लॉरेन्सचे खोऱ्यांत इंग्लिश वसाहतवाल्याचें एकहि खेडें उरलें नाहीं इंग्रजी भाषा बोलणाऱ्या सर्व लोकांस ओहाओ नदीचे पलीकडे हांकून देण्यांत आलें. यावेळी फ्रान्सचे ताब्यांत ब्रिटिशांपेक्षां वीसपट तरी मुलुख होताच.

ब्रिटिश लोकांचा वारंवार पराभव होण्याचें मुख्य कारण म्हणजे त्यांच्यांतील अव्यवस्था, नादानपणा, व तुटपुंजा सामुग्री हाय असें पार्लमेंटला आढळून आलें होतें. यावेळीं विल्यम पिट हा मुख्य प्रधान झाला होता. त्यामुळें लढाऊ खात्यांत बरीच फिरवाफिरव होऊन एक प्रकारचा नवीन जोम उत्पन्न झाल्याचीं चिन्हे स्पष्ट दिसूं लागली.

लॉर्ड लाऊडन याचे हातांतील कमांडर इन् चीफची सत्ता काढून ती जनरल अॅबरकोम्बी यांस देण्यांत आली तथापि पूर्वीच्या दुय्यम अधिकाऱ्यांचे हातीं बरीच सत्ता ठेवण्यांत आली होती व त्यांच्याच विचारानें काम चालावें असें ठरविण्यांत आलें.

इ. स. १७५८ सालीं तीन ठिकाणी निरनिराळ्या स्वाऱ्या करण्याचें ठरलें. पहिली लुईसबर्ग वसाहतीवर, दुसरी क्रॉऊनपॉईंटवर, व तिसरी फोर्ट ड्यूकेनवर.

पहिली लुइस्बर्गवरील स्वारी दहा हजार फौजेनिशीं झाली. पहिल्याच तडाख्यास तीन फ्रेंच जहाजें गोळे फेकून जाळण्यांत आलीं. नंतर सहा दिवसपर्यंत लुईसबर्गवर भडिमार करण्यांत आला. सर्व शहराची राखरांगोळी होऊन लोक शरण आले. मार्गे हटण्यासही फ्रेंच लोकांस वाव न मिळूं दिल्यामुळें केप ब्रिटन व प्रिन्स एडवर्ड बेट हींही अनायासें ताब्यांत मिळालीं, अशा रीतीनें ब्रिटिश सैन्यास फार मोठा व झटपट असा विजय मिळाला.

दुसरीकडे जनरल ॲबरकोम्बी पंधरा हजार सैन्य घेऊन टिंकोडेरोगा, व क्राऊन पॉइंटवर चालून गेला. लढाई जुंपते न जुंपते तोंच इंग्लिश जनरल लॉर्ड हॉव हा मारला गेला, त्यामुळे ब्रिटिशांना थोडी माघार घ्यावी लागली, पुढे कांहीं काळ लढाई चालली पण त्यातही ब्रिटिशाचे पुष्कळ शिपाई मेले. इतके नुकसान आतांपर्यंत कधींच झालें नव्हतें, त्यामुळें धीर खचून त्याना मागे परतावें लागलें.

त्यानंतर कर्नल ब्रॅडस्ट्रीट याचे हातांखालीं तीन हजार सैन्य देऊन त्याला लेक ओंटारिओवरील फ्राटिनाक किल्ल्यावर पाठविण्यांत आले. अवघ्या दोन दिवसांत तो किल्ला सर करण्यांत आला व ताबडतोब त्याचा विध्वंस करून हे सैन्य परतलें. टिकोंडेरोगा येथील हल्ल्यांत झालेल्या पराभवाचे अशा रीतीनें उट्टे निघाल्यामुळें इंग्लिश सैन्यात एक प्रकारचे समाधान दिसून येऊं लागलें.

मेजर स्टार्बो नावाच्या एका अंमलदाराने अवघ्या दहाच लोकांनिशी इंडियन लोकांच्या सैन्याची एक तुकडी व बरीच लढाईची सामुग्री घेतलेले एक फ्रेंच जहाज चाललें होतें, त्यावर हल्ला केला व त्यातील सर्व लोकांस समुद्रांत फेकून किंवा ठार मारून त्या जहाजांतील दारूगोळा व शिधा-सामुग्री लांबविली. ती हकीगत फार मजेदार आहे.:—प्रथमतः त्यानें आपल्या लहानशा बोटीस एका फ्रेंच बोटीजवळ आणले व तेथील ऑफिसर लोकांस आपले बोटीवर मोठ्या प्रेमानें बोलाविलें. मग त्या ऑफिसरांशीं गप्पागोष्टी करीत त्यांना खूप दारू पाजली. ते किंचित् बेसावध दिसूं लागतांच त्यांना कैद करून किनाऱ्यावर सोडून दिलें व ती लहान फ्रेंच

बोट आपले ताब्यांत घेतली. त्याला फ्रेंच भाषा फार उत्तम येत असल्या-मुळें या लहान फ्रेंच बोटींत बसून वर सांगितलेल्या सैन्य नेणाऱ्या फ्रेंच बोटीजवळ आपली बोट नेली व ती वरील ऑफिसरांस बोलावून आपण क्विबेक येथें सरकारी कामाकरतांच जात आहों असा बहाणा केला व नंतर त्याचे लोकांनीं खलाशी लोकांवर एकदम बंदुकीचा मारा केला व जहाजही पेटवून दिलें. आगीचा डोंब उठतांच खलाशांनीं उड्या टाकिल्या व कांहींस त्यांनी गोळया घालून ठार मारिलें अशा तऱ्हेनें अगदीं थोड्या वेळांत तें जहाज ताब्यांत घेऊन सर्व शिधासामुग्री उपटली व तें जळकें जहाज खेंचून घेऊन नुकत्याच काबीज केलेल्या लुइसबर्ग या ठिकाणीं येऊन तो दाखल झाला.

फ्रेंच लोकांवरील तिसरी स्वारी एकोणिस हजार सैन्यानिशीं जनरल फोर्बस्नें फोर्ट ड्यूकेनवर केली ड्यूकेनवरील या दुसऱ्या स्वारींतही कर्नल वॉशिंग्टन आपल्या व्हर्जीनियांतील तुकडीस घेऊन हजर होता. मेजर ग्रँट हा एक मोठी टोळी घेऊन थेट फोर्ट ड्यूकेनकडे गेला, पण यावेळीं तो शत्रूच्या अगदीं माऱ्यांतच जाऊन अडकला व त्याचे एक तृतीयांश लोक ठार झाले. ब्रॅडॉकच्या सैन्याप्रमाणें याही सैन्याची वाताहत होते कीं काय असा प्रसंग येऊन ठेपला. पण वॉशिंगटन मोठ्या सैन्यासह येत आहे असें जेव्हां कळलें तेव्हां शत्रुसैन्याचें धाबें दणाणलें. त्यानें फोर्ट ड्यूकेनला आग लाविली व लहान लहान होड्यामधून आहाओ नदींतून पळ काढला. अशा रीतानें तिनापैकीं दोन ठिकाणीं ब्रिटिश सैन्यास पूर्ण जय मिळाला व फ्रेंचांची दाणादाण झाली.

दुसऱ्या वर्षी म्हणजे इ. स १७५५ सालीं ब्रिटिश सैन्याची संख्या सुमारें ५०,००० पर्यंत झाली, व गतसालीं मिळालेल्या विजयामुळें त्याला पुन्हां हुरूप आला. कांहीं झालें तरी फ्रेंच लोकांस पूर्णपणें जिंकिल्याशिवाय थांबावयाचें नाहीं असें सर्व वसाहतींसही वाटूं लागलें, या वर्षी फ्रेंच लोकांवर तीन स्वाऱ्या करण्याचें ठरलें, जनरल प्रिडो यांस नायगरा येथें पाठविण्यांत आलें. मुख्य सेनापति जनरल ॲमहर्स्ट हा गेल्या वर्षी जेथें

पराभव पावला होता तेथ, म्हणजे फोर्ड टिंकोडरोगा व क्रॉऊन पॉइंट-कडे चाल करून गेला, व जनरल वूल्फ हा सेंट लॉरेन्स नदीमधून क्विबेक-वर चाल करून गेला.

नायगरावरील स्वारीत जनरल प्रिडो हा तोफेचा गोळा लागून मेला, व त्याची जागा सर विल्यम जॉनसन यानें घेतली. त्यानें जोराचा हल्ला चढवून फ्रेंच सैन्याची दाणादाण उडविली व सहाशें लोक कैद करून नायगरा सर केला.

टिंकोडरेगा येथील लढाईत ब्रिटिशांचें सैन्यबलच इतकें मोठें होतें कीं, फ्रेंच लोक लढाईचे भानगडींत न पडता किल्ल्याला आग लावून क्रॉऊन पॉइंटकडे पळून गेले, पण तेथेही त्याचा पाठलाग झाल्यामुळें सॉरेल नदीतून ते अन्तर्मुलखात गले.

तिसऱ्या स्वारीवर जनरल वूल्फ गेला होता, त्याचेजवळ आठ हजार खडें सैन्य व चाळीस जहाजें होतीं. सेंट लॉरेन्स नदीतून प्रवास करून त्यानें थोडेच दिवसात क्विबक नजीकचा प्रदेश गांठला, व तेथें सैन्याचा तळ दिला. माऱ्याकरितां योग्य जागा शोधून काढून त्यानें क्विबेक शहराच्या खालच्या व वरच्या भागावर भडिमार केला पण क्विबेक किल्ला व गांव अजून त्यास दाद देईना. तो सर करण्यासाठीं कांहीं तरी निराळी योजना करणें अत्यंत जरूर होतें. मग त्यानें सेंट लॉरेन्स नदींतून रात्री हल्ला केला पण कांहीं जम बसेना. त्यानें नंतर सेंट लॉरेन्समधून आपलें सैन्य उत्तरेस थोडे अंतरावर नेलें, व तेथें सुरक्षित ठेवून थोड्या लोकांनिशीं योग्य माऱ्याची जागा कोणती याचा अंदाज काढला. त्या जागेस " वूल्फस कोव्ह " असें म्हणतात. या उंच टेकाडाचे जागीं चढण्यास त्याचे सैन्यास फार त्रास पडला, पण सूर्योदयापूर्वींच त्यानें मारा सुरू केला. अचानक दुसऱ्याच बाजूनें वूल्फचें सैन्य येऊन पोहोंचतांच फ्रेंच गांगरून गेले. एक तासाचे माऱ्यानेंच फ्रेंच सेनापति मॉटकाम याची गाळण उडाली व त्याचे सैन्यानें व मदतीस आलेल्या इंडियन सैन्यानेंही फारसा दम धरला नाही. जनरल वूल्फ नुकताच तापांतून उठला होता तरी स्वतः लढत होता.

त्याला प्रथम मनगटावर गोळी लागली. नंतर त्याला दुसरी जखम झाली तरीही त्यानें तिकडे लक्ष न देतां लढाई चालूच ठेविली. इतक्यांत एक गोळी त्याच्या छातीतून निघून गेली. पडतां, पडतां 'पळाले–पळाले' असा आवाज त्याच्या कानांवर आला. म्हणून त्यानें विचारलें, 'कोण पळाले ?' यावर फ्रेंच पळाले हे उत्तर ऐकून त्याला फार समाधन वाटलें व तो म्हणाला, "मग हरकत नाही, आतां मी सुखानें मरेन "

तिकडे फ्रेंच जनरल मॅटकाम्‌चीही अगदीं तशीच अवस्था झाली होती. त्याला तोफेचा गोळा लागून जबर जखम झाली होती. त्यानें आपल्या डॉक्टरला विचारले ' मी किती वेळ जगेन ? ' फार तर कांहीं तास ! ' असे उत्तर ऐकताच तो ह्मणाला, " फार उत्तम ! क्विबेक किल्ला शत्रूनें काबीज केला हे ऐकण्यास मी जगणार नाहीं. "

सुमारें पांच दिवसांनी ब्रिटिश लोकांनीं क्विबेकचा पूर्ण ताबा घेतला. पुढील वर्षी क्विबेक किल्ला परत हस्तगत करण्याचा फ्रेंच लोकांनीं प्रयत्न केला पण त्यांस यश आलें नाही. नंतर थोड्याच दिवसांनीं, जनरल ॲमहर्स्ट या ब्रिटिश सेनापतीनें, फ्रेंचांचें शेवटचें ठाणें जे मॉंट्रियाल शहर तेंही घेतलें, अशा रीतीनें सबंध कॅनडा इ. स. १७६० साली ब्रिटिश अंमलाखालीं आला.

फ्रेंच लोकांचा अमेरिकेंत पराभव होण्याचें मुख्य कारण म्हणजे, फ्रान्सनें आपल्या वसाहतींस करावी तितकी मदत केली नाहीं, धरसोडीचें राजकीय धोरण व तुटपुंजी तयारी अशी नेहमी अवस्था असल्यामुळे निर्भेळ असा विजय त्याना केव्हांच लाभला नाही. त्यांच्या ताब्यांत मुलुखही इतका होता कीं कोठेंही कडेकोट बंदोबस्त ठेवणे फारच कठीण जाई. निरनिराळे किल्ले एकमेकांपासून फार दूर असल्यामुळें एका ठिकाणापासून दुसऱ्या ठिकाणीं तात्कालिक मदत पोहोंचणे दुरापास्त होई.

ब्रिटिश वसाहतींचे ताब्यांत मुलुख बराच कमी होता. त्यांच्यांत दळणवळणही बरें होतें व ज्यावेळीं ब्रिटिश पार्लमेंटनें जोर धरला व सपाटून मदत करण्याचें अंमलांत आणलें त्यावेळीं फ्रेंचांचा बीमोड होण्यास

मुळींच अवधि लागला नाही.

जमिनीवरील लढाई जरी इ. स. १७६० पर्यंत आटोपली होती तरी आरमारी लढाया इंग्लंड व फ्रान्सच्या वसाहतीत चालूंच होत्या. इ. स. १७६३ साली पॅरिस येथे तह होऊन मिसिसिपीचे पूर्वेस असलेला सर्व मुलुख ब्रिटिशांना मिळाला. म्हणजे एका सबंध साम्राज्याइतका मुलुख फ्रान्सने गमावला. त्याचवेळीं स्पेनशीं लढाई चालू होती, तीत स्पेनचा पराभव होऊन स्पेनला आपला सबंध फ्लॉरिडा प्रांत ब्रिटिशांचे ताब्यांत द्यावा लागला. स्पेनचे ताब्यात मिसिसिपीचे पश्चिमेस असलेला मुलुख मात्र राहिला.

इ. स. १७६० पर्यंत फ्रेंच लोकांशीं झालेल्या लढाईतून ब्रिटिश सेना मुक्त होतें तोंच पूर्व टेनेसीमधील चीओकी नांवाच्या इंडियन लोकांनीं फोर्ट लंडनवर अचानक छापा घातला व तेथील सर्व सैनिकांस निःशस्त्र केले. पण येवढ्यावरच त्यांची जयतृष्णा शमन न होऊन त्यांनी पकडलेल्या सर्व ब्रिटिश लोकांची कत्तल केली. या गोष्टीने ब्रिटिश वसाहती चिडून गेल्या व या इंडियन टोळीचे पारिपत्य करण्याकरिता त्यांनी जनरल ग्रॅट व मॉटगॉमरी यांस पाठविलें. त्यांनी इंडियन लोकाचा योग्य बन्दोबस्त करून त्यांस त्या प्रांतांतून हांकून लावले.

फ्रेंच लोकांकडून मिळालेल्या मुलखांत नीट बंदोबस्त ठेवण्यासाठी व तो पूर्णपणें अंमलांत आणण्यासाठी ब्रिटिश सैनिकांच्या लहान लहान टोळ्या निरनिराळ्या ठिकाणी पाठवाव्या लागत. त्यांचेकडून इंडियन लोकास वारंवार त्रास होई, त्यामुळे सर्वच इंडियन लोक चिडून गेलेले होते. त्यांतून नुक्तेच पराभूत झालेले फ्रेंच लोकही त्यांना अधिक चिथावून देत, त्यामुळे सर्वच इंडियन लोकांनीं एकंदर निरनिराळ्या ब्रिटिश वसाहतींवर चोरटे हल्ले करण्याचा उपक्रम केला.

इ० स० १७६१ च्या उन्हाळ्यामध्यें सीनिका व बायांडोट येथील इंडियन टोळ्यांनीं एकत्र जमून डिट्राइटवर जोराचा हल्ला केला, परंतु तेथील ब्रिटिश अधिकारी कर्नल कॅंबेल यानें त्यांचा पराभव करून त्यांना हांकलून

दिलें. असा प्रकार वरचेवर होत असल्यानें तेथें फारशी शांतता नांदणें दुरापास्त होतें.

ओटावा येथील इंडियन लोकांचा नायक पॉंटिआक यानें ॲलिघेनी व मिसिसिपी यांमधील सर्व इंडियन लोकांना एकत्र करून त्या प्रांतांतील सर्वच ब्रिटिश किल्ल्यांवर हल्ला करण्याची जंगी तयारी केली. इ. स. ७ मे १७६३ रोजीं एक मोठा हल्ला करावयाचा असें त्यानें ठरविलें होतें, पण अगदीं आयत्या वेळीं कांहीं टोळ्यांचे नायकांनीं दगा दिल्यामुळें सर्वच बेत फिसकटला.

खुद्द पॉटिआक, इंडियन टोळीचा मुख्य नायक हा डिट्राइटवर हल्ला करणार होता. डिट्रॉइट येथील सर्वच शिपायाची कत्तल करण्याची त्यानें कडेकोट तयारी केली होती, पण तेथेंही त्याला अपयशच आलें. अगदीं हल्ला करण्याचे थोडावेळ पूर्वी ' आजिबवे ' नांवाच्या इंडियन टोळींतील एक मुलगी कांहीं कातडीं नजर करण्याचे निमित्तानें ब्रिटिश ऑफिसर मेजर ग्लॅडविन् यांजकडे आली. कातडीं नजर करण्याचे निमित्तानें मेजर ग्लॅडविन यांची एकांतांत गांठ पडतांच तिनें इंडियन हल्ल्याचा सर्व बेत ग्लॅडविन यास कथन केला. मेजर ग्लॅडविननें यत्किंचितही वेळ फुकट न दवडतां सर्व किल्ल्यास जय्यत तयारी करण्यास इषारा दिला. त्यावेळीं सर्व सैनिकच नव्हे तर डिट्राइट येथील नागरिकही लढ्यांत सामील झाले. अचानक छाप्याचा बेत फसल्यामुळें इंडियन लोकांची दाणादाण झाली, एंकंदरींत फोर्ट पिट् व डिट्राइट हे दोन किल्ले मात्र इंडियन लोकांनीं काबीज केले, व प्रत्येक ठिकाणीं असलेल्या ब्रिटिश फौजेची त्यानीं कत्तल करून टाकिली.

क्विबेकच्या वेढ्यानंतर इंग्लंड व फ्रान्स या देशांमधील जमिनी वरील युद्ध बहुतेक आटोपून त्या बाबतींत जरी इंग्लंड पूर्ण यशस्वी झालें होतें तरी समुद्रावरील लढाईची कटकट अद्यापि मिटली नव्हती. इ. स. १७६३ पर्यंत या दोन देशांत बारीक सारीक आरमारी कटकटी चाल- ल्याच होत्या. त्या सालीं पॅरिस येथें या दोन राष्ट्रांमध्यें तह झाला. त्या



इंडियन कुमारिकेनें केलेला स्वकुलाचा घात.

पान ९८.

तहाअन्वयें फ्रेंच लोकांची सत्ता मिसिसिपी नदीच्या पूर्व भागांतून व दक्षिणेकडे थेट मेक्सिकोपर्यंतचे भागांतून पूर्णपणें नष्ट झाली. त्याच सुमारास स्पॅनिश लोकांबरोबरही ज्या लढाया चालू होत्या, त्यांत स्पॅनिश राष्ट्राचा पराभव होऊन त्यानें फ्लॉरिडाचा पूर्व व पश्चिम भाग ब्रिटिश लोकांस तहान्वये देऊन टाकिला. त्याच तहांत ब्रिटिश लोकांनी, फ्लॉरिडा-चे मुलखाबद्दल स्पॅनिश लोकास मिसिसिपी नदीचे पश्चिमेकडील सर्व मुलुख फ्रेंच लोकांकडून देवविला. अशारीतीनें स्पेनला अधिक मुलुख मिळून कांहीं कालपर्यंत स्पेनची सत्ता मिसिसिपीचे पश्चिमेकडील भागांत स्थिर झाली. बिचाऱ्या फ्रेंच लोकांस मात्र एका मोठ्या साम्राज्याइतका मोठा मुलुख गमावून स्वस्थ बसावें लागलें.

वरील लढायांस अमेरिकन इतिहासांत ' फ्रेंच व इंडियन लढाया ' असें ह्मणतात. त्यांचे योगानें इंग्रजी भाषा बोलणाऱ्या लोकांचेंच साम्राज्य मिसिसिपीचे पूर्व भागांत सुरू झालें व ब्रिटिश लोकांच्या स्वातंत्र्याच्या कल्पना, कायदेकानू व इतर संस्था तेथें प्रस्थापित होऊं लागल्या व त्याच कल्पनांचे योगानें या नवीन बनत असलेल्या राष्ट्राचें पूर्ण स्वतंत्र राष्ट्र कसें निर्माण झालें याचा मनोरम इतिहास पुढील भागीं येईलच.

वसाहतीसंबंधीं कायदे व इंग्लंडचे वसाहतींसंबंधीं धोरण:—

एकाद्या राष्ट्राच्या साधन संपत्तीची वाढ होणें हें तेथील सरकारी धोरणावर कसें अवलंबून असतें हें अमेरिकेच्या इतिहासावरून उत्तम दिसून येतें. उद्योगधंदे व व्यापार या बाबतींत होणारे कायदे अमेरिकेंत ब्रिटिश सरकार व वसाहतवाले या दोहोंचे तर्फे होत. ब्रिटिश सरकार जे कायदे करी ते साम्राज्याचे म्हणजे इंग्लंडचे फायद्याकरितां करी, व वसाहतवाले कायदे करितांना आपल्या वसाहतीच्या फायद्यापुरतीच दृष्टि ठेवीत. त्यामुळें ब्रिटिश सरकार व वसाहतीसरकार यांमध्यें पुष्कळ वेळ विरोध उत्पन्न होई. ब्रिटिश कायद्यांचा हेतु, इंग्लंडला लागणाऱ्या कच्च्या मालाची पैदास वसाहतींत व्हावी; वसाहतींत जर कांहीं एकाद्या नव्या धंद्यास सुरवात झाली, तर त्याचा उपसर्ग इंग्लंडला पोहचूं नये, व

वसाहतीत व्यापार करण्याचा हक्क युरोपांतील इतर राष्ट्रें इतकेंच नव्हे तर साम्राज्यांतील इतर वसाहती यांनाही न मिळतां, फक्त इंग्लंडांतील व्यापाऱ्यांसच मिळावा व तो व्यापारही ब्रिटिश जहाजांतूनच व्हावा, असा होता. उलट पक्षी वसाहतवाले जे कायदे करूं इच्छीत त्यांचा हेतु, वसाहतींत उद्योगधंद्याची वाढ होऊन वसाहतींस लागणाऱ्या नित्योपयोगी जिनसा तेथल्या तेथेंच तयार व्हाव्या व त्या पाहिजे तितक्या स्वस्त व सुलभपणे मिळाव्या असा असे, त्यामुळे वरचेवर अनवस्था प्रसंग येई.

वसाहतींतिल लोकांनी केलेल्या कायद्यामध्ये, उद्योगधंद्यासाठी पुष्कळ सवलती दिल्या जात असत व त्याप्रमाणेच जेथे वसाहतीचे हितसंबंधास धोका पोहोचण्याचा संभव असे, तेथे बरेच व्यापारी निर्बंधही उत्पन्न करण्यांत येत. उद्योगधंद्याचे वाढीस वसाहतींचे कायद्यानेच उत्तेजन मिळे इतकेंच नव्हे पण पुष्कळ वेळी खासगी संस्था व कित्येक वेळी खासगी व्यक्तीही मोठे प्रोत्साहन देत. वसाहतीसंबंधी जे कायदेकानू करण्यांत येत त्याचे खालील प्रमाणे वर्गीकरण करितां येईल.

( १ ) विवक्षित जरूरीच्या कच्च्या मालाचे संरक्षण करण्याकरितां केलेले कायदे. उदाहरणार्थ जनावरे मारल्यानंतर, कातडी कमावण्याचे साधन जवळपास नसल्यामुळे पुष्कळ वसाहतवाले कातडी फेकून देत असत. अशा रीतीने पुष्कळ चामडे फुकट जाई ते जाऊं नये ह्मणून त्यासंबंधी इ. स. १६४० साली कायदा करण्यांत आला त्या कायद्याचे अन्वये कोणीही कातडे फेकून दिल्यास त्याला सुमारे बारा पौंड दंड ठोठावण्यांत येई. प्रत्येकाने कातडी संभाळून ठेवून तीं कातडी कमावणाऱ्याचे कारखान्यांत नेऊन पोचविली पाहिजेत असा निर्बंध होता.

( २ ) नित्योपयोगी वस्तू तयार करणाऱ्या लोकांस उत्तेजन देण्याकरितां केलेले कायदे–या कायद्यान्वयें, रोख बाक्षिसें, तैनाती मालाचे पैदासीवर अमुक एक रक्कम, माल तयार करितांना नुकसान आल्यास भरपाई, व्याजानें अगर बिन व्याजानें कर्जाऊ रक्कम, कारखान्यांकरितां मोफत जागा, व भांडवल उभारण्याकरितां सोडती काढण्याच्या सवलती, वगैरे

दिल्या जात. बऱ्याच वसाहतींनीं ताग, अंबाडी, लोंकर व रेशीम यांची पैदास केल्यास त्याकामीं येणारी तूट भरून देण्याची हमी घेतली होती. मेरीलॅंड संस्थानांत, कोणी घरगुती उत्तम तागाचें कापड बनविल्यास त्याला चांगले बक्षिस देण्यांत येई. विन्थ्रॉप नांवाच्या गृहस्थास याच संस्थानाने लोखंड तयार करण्याचा कारखाना काढल्यास तीन हजार एकर जमीन बहाल करण्याचे कबूल केले होते. त्याचप्रमाणे जो कोणी लोहारी भट्टी चालवील त्याला शंभर एकर जमीनही देण्याचे ठरविले होते. ऱ्होड बेटाव-रील वसाहतीने उत्तम शिडास लागणारा कपडा तयार करणाऱ्यास तीन हजार पौंड कर्जाऊ देण्याचे कबूल केले होतें.

( ३ ) विशिष्ट वस्तू बाहेर न जाऊं देण्यासाठीं केलेले कायदे— कित्येक वेळी, लोखंड, लोकर, ताग व चामडीं वगैरे जिन्नस बाहेर प्रांतीं न जाऊं देता त्याचा वसाहतीतले वसाहतींत उपयोग व्हावा ह्मणून कायदे करण्यात येत.

( ४ ) निर्गत व आयात होणाऱ्या मालावर जकात घेण्यासंबंधीं कायदे वेळोवेळीं वसाहतीतर्फे करण्यांत येत.

( ५ ) वसाहतीत जहाजे बांधणारांस किंवा वसाहतीतील जहाजांचे मालकांस विशेष सवलती देण्यासंबंधी कायदे.

( ६ ) निरनिराळ्या प्रांतामध्यें दळणाच्या गिरण्या, लाकूड काप-ण्याचे कारखाने व तत्सदृश दुसरे अनेक कारखाने काढणाऱ्या लोकांस त्या त्या प्रांतापुरते मक्ते देण्यासंबंधीं केलेले कायदे.

वसाहतींनी केलेल्या वरील कायद्यांनी एकंदर व्यापारावर व त्यांचे स्वतःचे सांपत्तिक स्थितीवर थोडा फार परिणाम होई पण सर्व वसाहतींत कायदे सारखे नसल्यामुळें व मुख्य व्यापारी धोरण ठरविण्याचें काम ब्रिटिश पार्लमेंटकडे असल्यामुळे त्यांचा व्हावा तितका उपयोग होईना. वसाहतीची वाढ जसजशी अधिक होऊं लागली तसतशी ब्रिटिश कायद्यांची मगरमिठी वसाहतवाल्यांस अधिक जाणवूं लागली.

इंग्लंडचें वसाहतीसंबंधींचें जे धोरण तें ' मर्कंटाइल थियरी ' या नांवानें प्रसिद्ध आहे. व्यापारोत्तेजक धोरण ( अर्थात् इंग्लंडचा व्यापार वाढविण्याचे धोरण ) असा त्याचा साधारण अर्थ आहे. त्यावेळीं युरोपांतलि इतर देशांचेंही आपल्या वसाहतीसंबंधानें असलेच धोरण होते. सांपत्तिक महत्त्वाकांक्षा व मुख्यत्वेंकरून इंग्लंडची राजकीय मजबुती वाढवून ते सबंध युरोपांत अत्यंत प्रबळ राष्ट्र व्हावें हा हेतु याच्या बुडाशी होता. हे धोरण साधण्यासाठी जे जे उपाय अमलांत आणण्यांत आले त्यामुळे वसाहतीमधील उद्योगधंद्यांचे सर्वच नियंत्रण व्यापारी धोरणास अनुसरून होऊं लागलें, व्यापारी धोरणाचीं मुख्य सूत्रे खालीलप्रमाणे होती.

( १ ) इंग्लंडांतील व्यापाऱ्यांस मुबलक भांडवलाचा पुरवठा.

( २ ) इंग्लंडांतील उद्योगधंदे चालावेत ह्मणून सुदृढ व कर्तबगार मजूर निपजावेत ह्मणून केलेली योजना.

( ३ ) कृषिविषयक धंदे व नित्योपयोगी वस्तू व व्यापारोपयोगी वस्तू तयार करणारे कारखाने चालविण्याची व त्यायोगे इंग्लंड कोणत्याही परराष्ट्रावर अवलंबून राहूं नये ह्मणून केलेली योजना.

( ४ ) मुख्यतः व्यापारोपयोगी व प्रसंग पडल्यास लढाई करण्यास योग्य अशा प्रचंड आरमाराची तरतूद.

ब्रिटिश दर्यावर्दी व्यापारास फार उत्तेजन देण्यांत आल्यामुळे उत्तम खलाशी निपजूं लागले, व समुद्रावर बरेच लोकांचा निर्वाह चांगल्या तऱ्हेनें होऊं लागला, त्यामुळें बेकारी कमी होऊं लागली होती. प्रसंगोपात् युद्ध उद्भवल्यास इंग्लंडांतील शेतीस व तद्विषयक इतर धंद्यासही उत्तेजन देण्यांत येई. कारखान्यांची वाढ होऊं लागल्यामुळे बेकारी कमी होऊं लागली. या संपत्तीचा उपयोग फौजा व आरमार याकडे करून व्यापारास अधिक बळकटी आणण्यास सुरुवात झाली. वसाहती निव्वळ इंग्लंडास लागणारा कच्चा माल पुरविण्याकरितां व इंग्लंडांत तयार होणारा पक्का माल विकत घेण्याकरितां आहेत असा ब्रिटिश लोकांत विश्वास उत्पन्न होऊं लागला. युरोपांतील मुख्य मुख्य राष्ट्रें स्वतःचे उपयोगास लागणारा माल तयार करूं लागल्यामुळें इंग्लंडांत तयार झालेला माल वसाहतीचे

माथीं मारल्याशिवाय तरणोपाय नाहीं असें ब्रिटिश मुत्सद्यांस आढळून आलें व त्या दृष्टीनें वसाहतींचा एकंदर राज्यकारभार आंखण्याचें धोरण स्पष्टपणें अमलांत येऊं लागलें, व त्या धोरणास अनुसरून जाचक असे कायेद वसाहतीवर लादण्यांत येऊं लागले.

वसाहतीसंबंधी इंग्लंडांत झालेल्या कायद्यांचा वसाहतीचे सांपत्तिक स्थितीवर अनिष्ट परिणाम होऊं लागला. विशिष्ट कच्चा माल तयार करण्याकरितां वसाहतवाल्यांस उत्तेजन देण्यांत येई व क्वचित् धाक दपटशाही देण्यांत येई. उलट ज्या तयार मालाची इंग्लंडचे तयार मालाशीं स्पर्धा होण्याचा संभव दिसूं लागे त्या मालावर जबर नियंत्रण बसविण्यात येई. इंग्लंडमध्यें पिकलेल्या गव्हाशी स्पर्धा होऊं नये म्हणून वसाहतींतून जाणाऱ्या गव्हावर जकात ठेवण्यांत आली. त्याचप्रमाणें मासळीच्याही व्यापारावर नियंत्रण ठेवण्यांत आलें. अमेरिकेतील खारविलेल्या मांसाचे विक्रीस बंदी झाली, अशा अनेक कारणांमुळे वसाहतीचा युरोपांतील इतर देशांशी व्यापार वाढूं लागला पण त्या व्यापारावरही नियंत्रण करण्यांत येऊं लागले. वसाहतींतून बाहेर जाणाऱ्या मालाकरिता लागणाऱ्या जहांजांच्या वाहतुकीसंबंधी कायदे करण्यांत आले, तरी पण डच लोकाच्या जहाजांतून जाणाऱ्या मालाची वाहतूक अधिक होऊं लागली, त्यामुळें नॅव्हिगेशन ॲक्ट नांवाचा कायदा इ स. १६४५ साली करण्यांत आला. त्याच कायद्यास पुन्हां इ. स. १६५१, १६६३, १६७२, व १६९६ सालीं अधिक जुलमी कायद्यांची पुस्ती जोडण्यांत आली.

वसाहतीतीलउद्योगधंद्यांचे नियंत्रणासंबंधी जे कायदे करण्यांत येत ते ' बोर्ड ऑफ ट्रेड व प्लँटेशन्स ' नांवाच्या प्रीव्ही कॉऊनसिलचे कमिटीकडून सुचाविण्यांत येत असत. अमेरिकेंतील ब्रिटिश लोकाचे हितसंबंध राहण्याचें खास काम याच कमेटीकडे होतें. या कमिटीचे अध्यक्षांना वसाहतींतील लागवडीकडे लक्ष पुरविणें, शेती, व्यापार व उद्योगधंदे यांचें निरीक्षण करणें, वसाहतींसंबंधीं तक्रारी अर्ज स्वीकारणें व इंग्लंडचे हितप्रबंधाकडे लक्ष देऊन त्यांचा निकाल देणें वगैरे गोष्टींबाबत सर्व अधिकार

असत. निरनिराळ्यावेळीं वसाहतींचे गव्हर्नरांकडून आलेले रिपोर्ट पाहिले ह्मणजे वसाहतींची औद्योगिक वाढ कशी खुंटत चालली होती तें स्पष्टपणें दृष्टोत्पत्तीस येतें. वसाहतींतील उद्योगधंद्यासंबंधीं कमिशनरचे पहिलें कर्तव्य ह्मणजे त्यांपासून इंग्लंडला जास्तीत जास्त किती वसूल मिळेल याची चौकशी करणे, हे होतें.

अगदी पहिल्या पासूनसुद्धा वसाहतींतील लोकांस इंग्लंडांतून आलेला माल रोख पैसा देऊन खरेदी करणें जड जाई, त्यामुळें वसाहतींतच बनलेला माल कांहीं मोबदला देऊन खरेदी करणे त्यांना अधिक सोईचे होई. शिवाय इंग्लंडातून आलेल्या नित्योपयोगी व चैनीच्या वस्तूंस किमतही फार पडे. म्हणून प्रथम मॅसॅचुसेट संस्थानानें वसाहतींतच काहीं उद्योगधंदे सुरू व्हावे म्हणून प्रयत्न केला. इ. स १६४० सालीं सर्व ग्रामाधिकाऱ्यास संस्थानने, ताग पेरणे, तो कमावणे त्याच्यापासून सूत काढण्याकरिता चरखे बनविणे, तसेच सर्व शाळांतील मुलांस तागाचे, लोकरीचें व कापसाचें सूत बनविण्यास शिकविण्याविषयी हुकूम केला इतकेंच नव्हे, तर इ स १६५६ सालीं प्रत्येक ग्रामाधिकाऱ्यास असे फर्माविण्यांत आलें कीं प्रत्येक कुटुंबातून एक किंवा दोन माणसांनीं दर आठवड्यास तीन पौंड प्रमाणे सूत एका वर्षातून ३० आठवड्यापर्यंत नियमाने काढलेंच पाहिजे व जर काढले नाहीं तर कमी पडणाऱ्या प्रत्येक पौंड सुतामागें एक शिलिंग याप्रमाणे दंड भरला पाहिजे !

त्यावेळीं कापड बनविण्याकरितां लागणारा कच्चा माल पुरेसा होत नसे. इ स. १६२९ सालीं युरोपांतून तागाचे बी आणून त्याची लागवड करण्यांत आली. कापसापासून सूत करण्याचे तेथील लोकांस लवकर जमेना, ह्मणून कापूस तागाशीं मिसळून सूत करण्यांत येई. इंग्लंडांतून कच्ची लोकर किंवा मेंढ्या आणविण्याची ट्रेड कमिशनरने बंदी केली होती, फक्त लोंकरीचें तयार कापडच तेथून येई. त्यामुळे लोंकर स्पेन देशांतून आणविणे प्राप्त होतें व ती अर्थातच फार महाग पडे व तिच्यावरही केव्हां बंदी होईल त्याचा नियम नव्हता. ह्मणून मॅसचुसेट संस्थानानें, वसाहतींतच ज्या कांहीं थोड्या मेंढ्या होत्या त्यांचें पूर्ण संरक्षण व त्यांची वाढ करण्याचें फर्मान

काढलें, तसेंच इंग्लंडांतून येणाऱ्या प्रत्येक वसाहतवाल्यास येतांना जमेल तितक्या अधिक मेंढ्या बरोबर आणण्याबद्दल वसाहतवाल्यांकडून आग्रहाचीं पत्रें जात.

लवकरच पुरेशा कच्च्या मालाची व्यवस्था होतांच, प्रत्येक घर एकेक विणकामाचा कारखानाच बनला व तेथे बायका लोकरीचें सूत काढून आपणास लागतील तसले कपडे विणूं लागल्या लवकरच चोळ्या, जाकिटे, पायमोजे, गंजिफ्राक, विजारी व सर्व तऱ्हेचा साधारण प्रतीचा कपडा बनूं लागला. याचा कित्ता लवकर डच व स्वीडिश वसाहतींनीं गिरविण्यास सुरुवात केली. पेन्सिल्व्हॅनिया वसाहतीने उत्तम कपडा तयार करणारांस फार मोठी बाक्षिसें देऊं केली होती, त्यामुळे फिलाडेलफिया येथे उत्तम विणकर निपजले व तेथील लोकरी मालाची ख्याती होऊं लागली.

जोपर्यंत प्रत्येक कुटुंबांत लागणारा किरकोळ कपडा घरचेघरी बनविण्यांत येई तोंपर्यंत तिकडे कोणाचे विशेष लक्ष्य गेलें नाहीं पण जसजसा उत्तम कपडा बाजारांतही येऊन विकूं लागला तसतशी इंग्रज कापडाचे व्यापाऱ्यांस पोटदुखी होऊं लागली. त्यावेळचे न्यूयॉर्कचे गव्हर्नर लॉर्ड कॉर्नबरी नावाचे गृहस्थ होते. त्यांनीं बोर्ड ऑफ ट्रेडला केलेल्या रिपोर्टांत खालील मजकूर आहे.

" लॉग आयलंड व कॉनोक्टिकट येथे लोकरीचा कपडा तयार होऊं लागला आहे अशी मला खात्रीलायख बातमी मिळाली आहे. लॉग आयलंड येथें तयार झालेला सर्जचा कपडा मी स्वतः पाहिला आहे. तो कोणालाही वापरतां येईल इतका सुंदर आहे. आतां जर ते सर्जसारखा कपडा विणूं लागले तर थोडे दिवसांतच साधारण सर्व जातीचा व पुढें लवकर उत्कृष्ट तलम कापडा विणूं लागतील. तसेच येथे उत्तम फुलर्स अर्थ व पाइप क्ले. सांपडते, त्यापासून काय परिणाम होणार आहे हे जाणण्याचें माझ्यापेक्षां अधिक लायख गृहस्थांचे मतावर मी सोंपवितों. या बाबतींत माझें मत मी प्रदर्शित करीत आहे त्याची मला क्षमा असावी. माझे मतें वसाहती ह्या मुख्य झाडाचे फांद्यांप्रमाणें आहेत व त्यांनीं मुख्य झाड जें इंग्लंड त्यावर अवलंबून व त्यास नमून असावें. इंग्लंडांत इंग्रज लोक ज्याप्रमाणें कारखाने

काढतात त्याप्रमाणे या लोकांना येथेंही काढूं दिल्यास व त्याकडे दुर्लक्ष केल्यास, मग फार दिवस असें होणे शक्य नाही ( ह्मणजे वसाहती मुख्य झाडाचे फांद्यांप्रमाणें राहणें शक्य नाही. ) जर या लोकांना असें दिसून आलें कीं आपल्या देशांत तयार झालेल्या कपड्याने, इंग्लंडहून आलेल्या कपड्याइतक्याच सुखावह व सुंदर तऱ्हेनें शरीर भूषवितां येते, व त्याबाबत इंग्लंडवर अवलंबून राहण्याची जरूरी नाहीं, तर त्याचा परिणाम असा होईल की, अगोदरच इंग्लंडचे लोकांवर ज्यांची विशेष प्रीति नाहीं त्यांना आपल्या अंतःकरणांतील उत्कट इच्छा व बेत तडीस नेण्यास फारसा अवधि लागणार नाहीं. वसाहतीत कशा तऱ्हेचे लोक आहेत याचा आपण विचार केल्यास मी ह्मणतों त्यासंबंधी आपणास आश्चर्य वाटणार नाही "

वरील रिपोर्टाचा लवकरच परिणाम दिसून आला. पार्लमेंटांतील लॉर्ड कमिशनरनें ' वूलन ॲक्ट ' ह्मणजे लोकरीसंबंधीं कायदा इ. स. १६९९ सालीं पास केला. त्या कायद्याने, कॉलनीतून बाहेर देशी, किंवा एका वसाहतीतून दुसऱ्या वसाहतीत, किंवा एका गांवाहून दुसऱ्या गावीं सुद्धां, विक्रीकरितां लोकरीचा कपडा पाठविण्यास बंदी केली. शिवाय दुसऱ्या वर्षी इंग्लंडांतून जाणाऱ्या लोकरीचे कपड्यावर वसाहतीत जकात घेतली जाऊं नये असा बंदोबस्त केला. या कायद्याने पुढें शंभर वर्षे जवळ जवळ लोंकरीचे कापडाचे धंद्याची पूर्ण गळचेपी केली. वसाहतीत इंग्लंडांतून येणाऱ्या सर्व मालापैकी अर्धा अधिक लोकरीचा कपडाच असे. ही गोष्ट ध्यानांत घेतल्यास या कायद्याचें स्वरूप किती भयंकर होतें हें दिसून येईल.

चामड्याचे धंद्याचे बाबतींतही तशीच गोष्ट होती. स्वयंशासित अशा कोणत्याही समाजाला, विशेषतः थंड देशांत, चामड्याची जरूर किती आहे हें सहज समजण्यासारखें आहे. वसाहतीत अगदीं प्रथमपासून सुद्धां शिकार केलेल्या हरणांचीं व मेंढ्यांची कातडीं कमावून त्यापासून जोडे, बूट व पायांस बांधण्याचे पट्टे वगैरे जिनसा तयार करीत असत. न्यू इंग्लंडमध्यें पहिला चामडीं कमविण्याचा कारखाना इ. स. १६२९ सालीं निघाला. मॅसचुसेटमधून एका चांभारास आणवून त्याला पन्नास एकर जमीन व

दहापौंड वेतन देऊन लिन् येथें ठेवण्यांत आलें होते. या ' लिन् ' येथील कारखान्यांत उत्तम जोडे व बूट निघूं लागले व सर्व वसाहतीत त्यांची प्रसिद्धी होऊं लागली.

चामड्यांचा भरपूर पुरवठा व्हावा म्हणून मॅसचुसेट संस्थानने खास कायदे करून चामडीं फुकट कुजून जाऊं नयेत, सर्व कमवून उपयोगांत आणण्यांत यावींत असा बंदोबस्त केला होता. अशारीतीने बूट-जोडेच नव्हे तर चामड्यांचे व्यापारास कांही वर्षे उत्तेजन मिळाले पण पुढें झालेल्या ब्रिटिश कायद्यानुसार सर्व बाहेर देशीं पाठविण्यांत येणारीं चामडीं, फक्त ब्रिटिश जहाजांतूनच, व इंग्लंडलाच पाठविलीं पाहिजेत असा निर्बंध झाला.

विशेषतः बीव्हर नांवाच्या जनावराचे मऊ लुसलुशीत चामडें टोप्या करण्याचे कामी वापरीत. त्याच्या सुंदर टोप्या बनत व सर्व वसाहतींतून त्याच वापरल्या जात. इंग्लिश टोप्या कॉलनींत खपेनात, त्यामुळें लंडन येथील फेल्टच्या टोप्याचे कारखानदारांनी पार्लमेंटचे या कामी लक्ष्य वेधलें. न्यू इंग्लंड व न्यूयॉर्क येथून दरसाल दहाहजार टोप्या परदेशी सुद्धां जाऊं लागल्या व शिवाय खुद्द बॉस्टनमध्ये टोप्यांचे सोळा कारखानदार झाले आहेत अशी त्यांनी ओरड केली. या टोप्या इंग्लंडास फारकरून जातच नसत पण वेस्ट इंडीज, आयर्लंड, स्पेन, व पोर्तुगाल येथे पाठविण्यांत येत असत. वरील देशात ब्रिटिश टोप्याचे व्यापारात वसाहतवाले चढाओढ करितील व आपला व्यापार बुडेल या भयाने इ स. १७३१ सालीं कायदा करण्यांत आला. त्यामुळें, तयार किंवा कच्ची रंगविलेली किंवा न रंगविलेली फेल्टस् किंवा टोप्या, जहाजावर अगर घोड्यावर किंवा गाडीवर परठिकाणीं पाठविण्याचे निमित्तानें लादणें, गुन्हा ठरविण्यांत आला, तसेंच असला गुन्हा करणारास पांचशें पौंड दंड प्रत्येक गुन्ह्यामागें ठरविण्यांत आला. तसेंच सात वर्षे उमेदवारी केल्याशिवाय कोठल्याही वसाहतवाल्यास टोप्या करण्याचे धंद्यांत नोकर ठेवण्याची बंदी केली, व नीग्रो लोकांस या धंद्यांत मुळींच कामास ठेवूं नये अशी सक्त ऑर्डर काढण्यांत आली. या कायदेबाजीनें टोप्या करण्याच्या धंद्यास वसाहतींत मूठमाती मिळाली.

दक्षिणेकडे ज्या वसाहती होत्या तेथे मुख्यत्वेकरून शेतीचेच धंदे चालल्यामुळें व लोकसंख्येंत नीग्रो लोकांचीच भरती असल्यामुळें तेथें फारशी नित्योपयोगी जिनसांची पैदास होतच नसे. तेथील वसाहत सरकारने, कच्चा माल पैदास करण्यासाठीं व त्यापासून टोप्या, लोकरीचे कापड, पायमोजे वगैरे करण्यासाठी पुष्कळ उत्तेजन देऊन पाहिले, पण तेथे अगदी कमी दर्जाच्या कापडाशिवाय कांहीं उत्पन्नच होऊं शकले नाही तेथील लोकांच्या चैनी राहणीबद्दल व निष्काळजीपणाबद्दल बेव्हरले नांवाच्या गृहस्थाने खालील उद्गार काढले आहेत. " हे लोक आपला सर्व तागाचा, कापसाचा व लोंकरीचा कपडा, तसेंच रेशमी कपडा, टोप्या, व चामड्याचे सर्व जिन्नस इंग्लंडमधून आणवितात. वास्तविक येथल्याइतका उत्तम ताग व अंबाडी जगावर कोठेही पिकत नसेल त्याच्या मेंढ्यांवर शुभ्र विपुल व सुंदर लोकर निघते, पण ती हे लोक केवळ मेंढ्यांस बरें वाटावे ह्मणूनच काढून टाकतात; रेशमी किड्यांस जरूर असलेलीं तुतीची झाडें तर येथे रानोमाळ जंगली झाडांप्रमाणें वाढतात व त्यावर रेशमी किडेही उत्तम पोसले जातात, असे अनुभवास आले आहे. त्याच्या टोप्यांचीं कातडीं तर खुद्द येथूनच रवाना झालेली आहेत. कातडी तर येथे इतकीं विपुल आहेत कीं ती बहुतेक सडूनच जातात. क्वचित् त्यांचा उपयोग करण्यांत येत असेल तर, पावसाने घरे गळूं लागली ह्मणजे जिनसांवर आच्छादन घालण्याचे कामी, नाही म्हणावयाला मोठा गाजावाजा करून थोडीशी चामडीं येथे कमवितात पण त्यांचें केवळ नोकर लोकांचे जोड्यांचे पलीकडे काहीं बनत असेल तर शपथ ! जोपर्यंत विलायती जोडे विकत मिळताहेत तोपर्यंत ह्या देशी जोड्यांकडे कोणी ढुंकूनही पाहात नाहीं. कदाचित् कोणी हरणाचे कातड्यापासून कांहीं वस्त्रप्रावरण बनविले तर महत्‌भाग्य ! खरोखर हे लोक इतके नादान आहेत कीं, जरी यांच्या देशांत उत्तम लांकडांचे ढीगच्या ढीग सडून जात आहेत तरी लांकडांच्या बनविलेल्या चिजा सुद्धां हे विलायती घेतील. कपाटें, खुर्च्या, टेबले, स्टुलें, पेट्या, गाडीचीं चाकें, इतकेंच नव्हे तर लांकडीपळ्या, झाडण्यासुद्धां झाडून विलायती ! धिःकार असो या लोकांच्या आळसाला व परावलंबित्वाला. "

न्यूइंग्लंडांतील लोकांपेक्षां या दक्षिणेकडील वसाहतवाल्यांचे गिऱ्हाइकीनें इंग्लंडांतील व्यापारांचे उखळ चांगलेंच पांढरें झालें.

लोखंडाचे कारखाने :— इंग्लंडांतून लोखंडी जिन्नस म्हणजे खिळे, मोळे, शेतीची आउते, बंदुका, नांगर व जहाजांची सामुग्री, सांखळ्या वगैरे आणविण्यास फार पैसा लागे, त्यामुळे अगदी आरंभापासूनच वसाहतवाल्यांनीं या जिनसा वसाहतीत बनविण्याचा उपक्रम केला. किनाऱ्यालगतच्या गाळांत लोखंडी अशोधित धातूचा सांठा भरपूर आहे असें आढळून आले होतें, त्यापासून चांगले लोखंड पैदा होईल अशी खात्री होती. इ. स. १६४३ साली जॉन विनथ्रॉप याने इंग्लंडहून कांहीं कारागीर व पुरेसे भांडवल आणून लिन् येथे एक भट्टी सुरू केली व लोखंड काढण्याचे काम चालू झाले. तेथे लगतचे भट्टीस लागणारा लांकडी कोळसा व भट्टीचे पंखे चालविण्याकरितां लागणारी पाण्यापासून मिळणारी शक्ति ही दोन्ही सुलभ होती. तेथें दररोज सात टन ओतीव लोखंड निघूं लागले. तेथे लवकरच लोहारी भट्या सुरू करण्यात आल्या व त्यांपासून कोयते, खुरपीं, शेतीची आउते हीं निघूं लागली. शिवाय लांकूड कापण्याच्या कारखान्यांतील सर्व यंत्रसामुग्री तेथेच बनवूं लागले. त्यामुळे त्या कारखान्याची फार प्रसिद्धी झाली. तेथे सुमारे पंचवीस वर्षेपर्यंत हा धंदा चालू होता. पुढे तेथील अशोधित धातू व लांकूड ही संपुष्टांत आल्यामुळे तो कारखाना ब्रेनट्री येथें नेण्यांत आला. या कारन्यास तीन हजार एकर जमीन मोफत देण्यांत आली होती. हा कारखाना सुमारे दहा वर्षेपर्यंत चालला. पुढे मग ठिकठिकाणी पुष्कळ कारखाने निघूं लागले. खिळे करण्याचा धंदा न्यू इंग्लंडांतील शेतकरी लोकास एक दुय्यम धंदाच होऊन बसला. खिळ्यास लागणारी तार अगर पट्टी शेजारीं असलेल्या कारखान्यांतून आणीत व फावेल तेव्हां खिळे बनवून शेतकरी लोक विकत. एका दिवसांत एक शेतकरी सुमारें दोन हजारपर्यंत खिळे तयार करी.

अमेरिकेंत जितकें लोखंड पैदा होत असे तितक्या सर्वांचाच तयार जिन्नस करण्याकडे उपयोग नसे. त्यांतील बराच भाग इंग्लंडला, मोठमाठ्या

गठ्ठयांचे स्वरूपांत रवाना होत असे. शिवाय अशोधित लोखंडही बऱ्याच मोठ्या प्रमाणांत रवाना होई. खुद्द इंग्लंडमध्यें जरी बरेंच लोखंड पैदा होई तरी त्याला लागणाऱ्या कच्च्या अशोधित लोखंडाच्या भरपूर सांठ्याचा शोध अद्यापि तेथें लागला नव्हता. त्यामुळें रशिया व स्वीडन मधून तें पक्क्या अगर कच्च्या स्वरूपांत आणवावें लागत असे. त्यामुळें इंग्लिश लोखंडी कारखानदारांनीं असा बेत केला कीं, अमेरिकेंत लांकूड व लोखंडी अशोधित धातु तसेंच धबधब्याचे पाण्याची शक्ति पुष्कळ मिळण्यासारखी आहे, तेथूनच इंग्लडला लागणारें सुमारें २० हजार टन लोखंड बिडाच्या स्वरूपांत तयार करवून इंग्लंडला आणवावें म्हणजे तें बरेंच स्वस्त पडेल; तसेंच तें मग, युरोपांतील इतर देशांतून आणावयास नको, सर्व व्यवहार साम्राज्यांतच होईल. त्यांनीं तसा पार्लमेंटला अर्ज केला व पार्लमेंटनें इ० स० १७५० सालीं कायदा करून अमेरिकेंतून आणविल्या जाणाऱ्या बिडावर आयात जकात माफ करण्याची सवलत त्यांना दिली. त्याचा फायदा असा झाला कीं इतर युरोपियन बंदरांत जास्ती जकात भरावी लागत असल्यामुळें बहुतेक सर्व अमेरिकन लोखंड लंडनच्या बंदरांत उतरूं लागलें व अमेरिकेंतील कच्च्या लोखंडाची मागणी वाढली, पण ब्रिटिश कावा तेथेंच थांबला नाहीं, तर पुढें असा कायदा करण्यांत आला कीं इंग्लंडच्या बादशाच्या अंमलाखालीं असलेल्या अमेरिकन वसाहतींत कोणीही लोखंडाचे रूळ, पट्टा, बार, पत्रे वगैरे कोणताही व्यापारी तयार माल करितां कामा नये. फक्त बिड तयार करावें व इंग्लंडलाच इंग्रजी जहाजांतूनच पाठवावें. अशा तऱ्हेनें लोखंडापासून तयार जिन्नस बनविण्याच्या धंद्याचें वसाहतींतून उच्चाटन झालें.

तंबाखूच्या नियंत्रणा संबंधीं कायदा इ. स. १६२१ सालीं पास झाला. त्या कायद्यानें असें ठरविण्यांत आलें होतें कीं, परदेशीं तंबाखू पाठवितां कामा नये, सर्व तंबाखू इंग्लिश जहाजांतून फक्त इंग्लंडच्याच कोणत्यातरी बंदरावर पाठविला पाहिजे. तेथें त्याच्यावर दर पौंडामागें तीन पेन्स जकात घेतली जात असे. युरोपांतील इतर देशांत तंबाखू इंग्लंड

मधूनच पाठविला जात असे, त्यामुळे इंग्रज व्यापाऱ्यांची चंगळ चालली होती. पुढें तंबाखूचा सांठा इंग्लंडमध्यें वाढल्यामुळें तंबाखूचा भाव फार खालीं पडला. युरोपांतील इतर बंदरांत तंबाखूस भाव बरा येई पण तेथें माल पाठविण्याची सक्त बंदी होती. खुद्द वसाहतींत किनाऱ्याकिनाऱ्यानें मालाची विक्री करावी तर तेथेंही दर पौंडास एक पेनीप्रमाणें कर ठेविला होता. हा कर लोक नेहमीं चुकवीतच असत. या परदेशीं व्यापार करण्याचे नियंत्रणामुळें जकात चुकवून धंदा करण्याचे व्यवहारास फार ऊत आला होता. परदेशी जहाजें लांब अंतरावर माल भरण्याकरितां येऊन उभीं रहात. तेथें रात्रीं अंधारांतून तंबाखूसारखा माल भरून होडगीं जात व खुशाल चढल्या भावांत माल विकून परत येत. मुख्य कायदाच जुलमी असल्यामुळें त्याची अशा तऱ्हेनें पायमल्ली करण्यांत कोणास आपण कांहीं गैर करितों असें वाटत नसे. किनाऱ्यावरील व्यापाराचे टेहळणीकरितां लढाऊ जहाजे असत पण त्यांचेकडून कांही विशेष कामगिरी झाली नाहीं. कांहीं खलाशी या चोरट्या व्यापारांत असे तरबेज झाले होते कीं, एखादा सौदा चोरून पटविला कीं, ते त्याबद्दल फुशारकी मारीत व सांपडण्याची वेळ आलीच तर खुशाल आपलें होडकें किनाऱ्यालगत बुडवून टाकीत व नंतर सावकाश तें वर काढीत.

नौकानयनाचा कायदा ( नॅव्हिगेशन ॲक्ट ) इंग्लंडची डच जहाज-वाल्यांशीं समुद्रावरील व्यापारांत जी चढाओढ चालली होती तिचें पर्यवसान वरील कायदा पास होण्यांत झालें. इ० स० १६५१ सालीं क्रॉम-वेलच्या पार्लमेंटनें हा कायदा पास केला व पुढें १६६१ सालीं त्याला अनेक पुस्त्या जोडण्यांत आल्या. या कायद्यानें असें ठरविण्यांत आलें होतें कीं, इंग्लंड किंवा इंग्लंडच्या वसाहती येथें उतरणारा व आशिया, आफ्रिका व अमेरिका खंडांतून येणारा कोणताही माल, फक्त ब्रिटिश जहाजांतूनच आणला पाहिजे. खुद्द युरोपांतून जर माल आला असेल तर तो ज्या देशांतून आणला असेल तेथल्या किंवा, फक्त इंग्लिश जहाजांतून आणला पाहिजे. इंग्लंडला येणारा माल ज्या देशांत तो बनविला असेल तेथून तो

थेट आला पाहिजे, मध्यें इतर देशांच्यातर्फे येतां कामा नये. तसेंच जर कोणी हा नियम मोडील तर त्याचें जहाज व त्यावरील सर्व माल जप्त करण्यांत येईल. या कायद्याने डच लोकांशी युद्ध उद्भवलें व त्याचा परिणाम त्यांचे हातून अमेरिकेंतील न्यू ॲमस्टरडाम ( हल्लीचे न्यू यॉर्क ) ही वसाहत जाण्यांत झाला व त्यामुळे डच लोकांचा अमेरिकेशी व्यापार संपुष्टांत आला. हा सर्व व्यापार इंग्लंडमध्ये बाधलेल्या किंवा अमेरिकेतील वसाहतीत बांधलेल्या जहाजांचे वांट्यास आला. हा व्यापार पुरा पाडण्याइतकी जहाजे दोन्हीही राष्ट्रांजवळ नसल्यामुळे जहाजांचा नूर वाढला, पण पुढें जहाजे बाधण्याचे धंद्यास अमेरिकेत जोर चढल्यामुळे तितकेसें नुकसान आले नाहीं.

इंग्लंडपेक्षां जहाजे बाधण्याच्या सोई अमेरिकेत अधिक होत्या. तेथें जहाजे बांधण्याचे लांकूड उत्तम, स्वस्त व मुबलक मिळे. डोलकाठ्यासाठीं फरलांकडाचे अखंड सोट मिळत. त्याचप्रमाणे देवदाराच्या झाडांपासून टरपेटिन, राळ व डांबर मिळे, त्याचा जहाजे बांधतांना फार उपयोग होई. तसेंच ताग मुबलक असल्यामुळे दोरखंडे तयार करण्याचीही सोय उत्तम होती. वसाहतवाल्यांनी जहाजे बाधण्याचे कामांत फार झपाट्याने प्रगति केली. नद्यांपासून धबधब्यांचे रूपाने पुष्कळ शक्ति उत्पन्न होत असे, तिचा लांकडे कापण्याचे कामी फार उपयोग होई. न्यू इंग्लंड, न्यू यॉर्क, पेनासिलव्हॅनिया, व्हर्जीनिया, मेरिलॅंड व साउथ कॅरोलिना वगैरे सर्व वसाहतींत जहाजे बांधण्याचे काम सुरू झालें. नैसर्गिक सुबत्ता व आळस या दोन गोष्टींमुळे दक्षिणेकडील वसाहतींनीं कधी जहाजे बाधण्याची तसदी घेतली नाही. वास्तविक पहातां त्यांच्याइतकी जहाजे बाधण्याची नैसर्गिक सोय इतर वसाहतींना नव्हती.

ब्रिटिश पार्लमेंटच्या स्वार्थ बुद्धीस अजून आळा पडला नव्हता, त्यानें इ. स. १६६३ सालीं एक नवीन कलम नॉव्हिगेशन कायद्यास जोडलें. त्यांत ब्रिटिश वसाहतीतून कांहीं जिन्नस इंग्लंडखेरीज इतर कोणत्याही देशास पाठवावयाचे नाहींत असा निर्बंध होता. त्या पदार्थात कापूस, नीळ, रंगाचे कामीं उपयोगांत येणारीं काष्टें, साखर, तंबाखू, व आलें

इतक्या पदार्थांची भर पडली. या सर्व पदार्थांवर इंग्लंडमध्यें उतरतांच जकात घेतली जाई व नंतर ब्रिटिश व्यापाऱ्यांचे कमिशन पदरांत पडल्यावर ते युरोपांतील इतर ठिकाणीं जाऊं देत. पुढे पुढें या जिनसांची यादी वाढतच गेली. काकवी, तांदूळ व आरमारी सामुग्री या जिनसांचा या यादींत इ. स. १७०५ सालीं; तांबें, व बीव्हर जनावरांचे चामडे, यांचा इ. स. १७२२ साली; व माशांचे कल्ले, कातडीं, लांकूड, कच्चे रेशीम व पोटॅश यांचा १७६४ साली समावेश झाला.

वरील माल भरलेल्या जहाजांकडून प्रथम ब्रिटिश बंदरांत उतरून जकात वगैरे भरून नंतर पुढें जाऊं असा करार करून घेतला जाई.

इ. स. १६६३ सालीं वसाहतींचे मागे दुसरे एक शुक्लकाष्ठ लावण्यांत आले. वसाहतींत बाहेर देशाहून येणारा सर्वच माल प्रथम इंग्लंडांत आणून त्याच्यावरील जकात कमिशन भरून नंतर तो वसाहतींत आयात केला पाहिजे असा नवीन कायदा करण्यांत आला. मात्र कांही बाबतींत या कायद्याची अंमलबजावणी फार कडकपणाने करण्यांत येत नसे. विशेषत. आयर्लंडांतून जाणाऱ्या मालावर जकात न घेतां तो परभारे जाऊं देत.

इंग्लंडच्या वसाहतींसंबंधीं व्यापारी धोरणाचा मुख्य हेतु उघडच होता. वसाहतींतून बाहेर देशी पाठविण्यांत येणारा सर्व माल इंग्रज जहाजवाल्यांखेरीज दुसऱ्या कोणास नेता येत नसल्यामुळे जहाजांच्या वाहतुकीमधील परदेशी चढाओढ बंद पडली, त्याचा फायदा घेऊन इंग्रज बाटीवाल्यांनीं वाहतुकीचे दर सपाटून चढविले व अतोनात नफेबाजी सुरू केली. सर्व माल ब्रिटनचे किनाऱ्यावर प्रथम उतरून ब्रिटिश गोदामातून सांठविला गेल्यामुळे इंग्रज व्यापाऱ्यांची व अडत्यांची पण चंगळ उडाली. इंग्रज कारखानदाराना कच्चा माल स्वस्त मिळूं लागला व तयार मालाला वसाहतीच्या गिऱ्हाइकीचा मक्ताच मिळाल्यामुळें तो हवा तेवढा महाग विकता येऊं लागला.

सर्वच व्यवहार या कायद्याबरहुकूम चालला असता, तर अमेरिकन वसाहतवाल्यांस फार मोठें नुकसान आलें असतें; कारण एक तर कच्चामाल ब्रिटिश व्यापारी पाडून भावांत मागत असत व दुसरें तयार माल

खरेदी करणें कॉलनींतील उद्योगधंदे धुळीस मिळाल्यामुळें, त्यांना प्राप्तच होतें व तो वाहतुकीचे चढलया भावामुळें, व विलक्षण नफेबाजीमुळें त्यांना भलताच महाग पडे. या जुलमी कायद्यांची अंमलबजावणी करण्याचें बरेंच कठीण जाई. वसाहतवाल्यांनी जकात चुकवून व परकी जहाजांत चोरून माल चढविण्याचें धोरण बिनधोक अंमलांत आणले. या चोरट्या व्यापारांत फिकायत पुष्कळ होऊं लागल्यामुळे अगदीं संभावित गणले जाणारे वसाहतीतील व्यापारी सुद्धा या धंद्यापासून अलिप्त नव्हते. कांही कांहीं लोक प्रतिकाराचे साधन म्हणून चोरटा धंदा करणे देशाभिमानाचे आहे असे समजत असत वसाहतींतील कारखाने व उद्योगधंदे यांनी यत्किंचित् जर का तग धरला असला तर तो केवळ या चोरट्या धंद्यामुळेच होता, हेही तितकेंच खरे आहे. जकात व नियंत्रण चुकवून माल रवाना करण्याची लवकरच एक स्वतंत्र पद्धतीच अंमलात आली फ्रान्स व हॉलंड येथे तंबाखू जकात चुकवून रवाना करण्यात येऊं लागला. मालाने भरलेलीं इतर राष्ट्रांची गलबते समुद्रात किनाऱ्यापासून थोड्याशा अंतरावर येऊन उभीं रहात व तयार मालाची आयात व कच्चा मालाची निर्गत होडकी, ताफे, व लहान लहान मच्छीमारी बोटी यांतून खुशाल आड मार्गाने चाले. इ. स. १७०० साली सुमारे एक तृतीयांश आयात व निर्गत व्यापार चोरून करण्यांत आला असा दाखला सांपडतो. वसाहतीतील लोकमत बेकायदेशीर व्यापारास अनुकूल असल्यामुळे, ब्रिटिश सरकारचे नियंत्रण व टेहळणी यांचा व्हावा तितका उपयोग झाला नाही.

काकवीविषयी कायदा ( मोलॅसिस ॲक्ट )—आणखी एका कायद्याने वसाहतीवरील जुलमात भर घालण्यात आली. या कायद्याने वसाहतवाल्यांच्या वेस्टइंडीज़शी असलेल्या व्यापारास धक्का बसला. वसाहतवाले बारबेडॉस, जमेका, फ्रेंच लोकांचे ताब्यांत असलेलीं बेटे व डच ग्वायना यांशी व्यापार करीत. त्यांपैकीं पहिलीं दोन म्हणजे बारबेडॉस व जमेका हीं ब्रिटिश लोकाचे ताब्यांत होती. ती दोन्ही बेटे वसाहतींत उत्पन्न होणारा सर्व माल घेऊं शकेनात, त्यामुळें फ्रेंच मुलुख व डच ग्वायना येथें माल पाठविणे प्राप्तच होते. शिवाय फ्रेंच लोक आपले धंद्यांत अधिक कुशल

असल्यामुळें तेथून साखर व काकवी अधिक किफायतशीर खरेदी करित येई. फ्रेंच वसाहतींतील काकवीपासून होणाऱ्या दारूस फ्रान्स देशांत बंदी झाल्यामुळें बारबेडॉस व जमेका या ब्रिटिश बेटांतलि साखरेस व काकवीस कोणी विचारीना. या बेटांतील इंग्रज मळेवाल्यांनीं पार्लमेंटास अर्ज केल्यावरून पार्लमेंटमध्यें एक बिल पास झाले. या बिलाने इंग्लंड आयर्लंड व अमेरिकन वसाहती येथे ब्रिटिश बेटाशिवाय इतर ठिकाणाहून येणारी साखर व काकवी यास मज्जाव करण्यात आला, व त्याच प्रमाणे घोडे व लांकूड परकी वसाहतींत विकण्याची अमेरिकन वसाहतींस बंदी करण्यांत आली पण हाऊस ऑफ लॉर्डसचे आग्रहावरून पूर्ण बंदी काढण्यांत येऊन त्याचे जागी दारू व इतर मादक पेये यांवर दरग्यालनीं नऊ पेन्स, व काकवी व तत्सम पदार्थ यावर दरग्यालनीं सहा पेन्स, व साखरेवर दर हंड्रेडवेटला पाच शिलिंग याप्रमाणे जबर जकात परकी ठिकाणाहून येणाऱ्या या जिनसावर बराविण्यात आली. याप्रमाणे फ्रेंच व डच इंडीजशी असलेला व्यापार वसाहतवाल्याचे हातचा गेला असता पण जकात चुकाविण्याच्या कलेचा उत्कर्ष होत गेल्यामुळे त्याचा तितकास परिणाम जाणवला नाही व चोरून मारून पुष्कळच व्यवहार घडत असे मोलॅसिस ॲक्ट इ. स. १७३१ साली पास झाला. अशा तऱ्हेनें दिवसें दिवस वसाहतींतील व्यापाराचा कोंडमारा होऊं लागला प्रत्येक व्यवहारात कसला तरी कायदा आड येई. कच्चा माल स्वस्त दरात विकणे भाग पडे व पक्क्या मालास विलक्षण किंमत पडे त्यामुळें वसाहतीत नेहमी नाण्याची टंचाई भासूं लागली. स्पेनशी व्यापार बिनहरकत चालू होता, तोपर्यंत पुष्कळसे स्पॅनिश चांदीचे नाणे खेळते राही व पण तेही आता बंद झाले होतें. नाण्याच्या तुटवड्यामुळे वसाहतींतील अंतर्गत व्यवस्थेवरही त्याचा परिणाम होऊं लागला. इ. स. १६९० साली लुईसबर्गवर केलेली स्वारी निष्फळ ठरून, लढाईवरील शिपाई ज्यावेळी परतले त्यावेळीं त्यांचे पगार चुकविण्याची पंचाईत येऊन पडली. स्वारीवर निघतांना शिपाई जी लूट मिळवून आणतील तींतील मोठा भाग त्यांना द्यावयाचे ठरलें होते पण पराभव झाल्यामुळें, जीव बचावून परत येतां येतां पुरेवाट झाली. त्यावेळीं मॅसचुसेट

येथील स्थानिक सरकारने ४०,००० पौंड किंमतीचे कर्जरोखे काढले; पण पुरेशी पत नसल्यामुळे या रोख्यांचा भाव २५–३० टक्क्यांनीं उतरला, पुढे स्थानिक सरकारनें कर वगैरे भरतांना या रोख्यांचे चलन पूर्ण किमतीने स्वीकारण्याची हमी घेतल्यामुळें भाव दर्शनी किमतीस येऊन ठेपले. इ. स. १७११ सालीं कॅनडावर केलेल्या स्वारींतही यश न आल्यामुळे पुन्हा नवीन कर्ज उभारण्यात आलें, पण या बाबतींत न्यू यॉर्क, पेन्सिल्व्हेनिया, -होड आयलंड, कनेक्टिकट वगैरे वसाहतींनी योग्य भाग घेतला होता. एका दृष्टीनें हें कर्ज वसाहतींमधील एकीचे दृढीकरण होण्यास कारणीभूत झालें.

सर्व सुसंघटित राष्ट्रांमध्ये कागदी नोटा काढून खजिन्यांतील तात्पुरती तूट भरून काढण्याचा व्यवहार राजमान्य समजला जातो. जोपर्यंत पुढील वर्षाच्या वाढत्या उत्पन्नांतून फेड होण्याची आशा असते तोपर्यंत असे करण्यांत कोणालाही धोका नाही. पण वसाहतींचा पाय दिवसेदिवस उत्पन्नाचे मानानें मागेच खेचला जात असे त्यामुळें कर्जरोख्यांचे भाव तोलून धरणे फार कठीण जाई. पडत्या भावाचा परिणाम जे व्यापारी असले रोखे खरेदी करीत त्यांना नुकसान येण्यांत होत असे. दिवसेंदिवस नाण्याचा तुटवडा भासूं लागला व व्याजाचे दरही १०–१२ टक्क्यापर्यंत चढले.

ह्या परिस्थितीवर मॅसचुसेट्स वसाहतीने एक नवीन तोड काढली. जमिनी तारण गहाण ठेऊन घेऊन वसाहत सरकार कर्जदारास अगदी सवलतीचे कर्ज देऊं लागले. हे कर्ज कागदी नोटाचे रूपाने असे व दरसाल या कर्जाच्या एक पंचमांश इतकी रक्कम कर्जदाराने फेड करावी व पांच वर्षांत पूर्ण फेड करावी असा करार असे. अशा रीतीने कागदी नोटांचा कर्जरूपानें पन्नास हजार पौंडांपर्यंत प्रसार झाला व पुढें या कर्जरोख्यांची रक्कम २६०००० पौंडपर्यंत फुगली. इतर वसाहतींनींही या योजनेस आपआपल्या प्रांतांत चालना दिली. परंतु या सर्व गोष्टींपासून इष्ट परिणाम घडून आला नाहीं. शेतकरी लोकांकडून वरचेवर कर्जफेड झाली नाही, त्यामुळे कर्जरोख्यांचा भाव कायम राहीना.

## ६ वें) गव्हर्नरला पगाराबद्दल धमकी

निरनिराळया वसाहतींचे गव्हर्नरांनी या कर्जरोख्यांचे प्रसारास विरोध केला पण त्याकडे वसाहतींनीं लक्ष्य दिलें नाही. कायदेमंडळानें खुद्द गव्हर्नरांचा पगारच न देण्याची धमकी दिली व अशा रीतीनें लोकमतास त्यांची संमति मिळवली. खाजगी कर्जाची फेड वसाहतीच्या कर्जरोख्यांत केल्याने ती कायदेशीर समजली जाई व धमकीने या बाबतीत विरोध केल्यास त्याबद्दल त्याला दंडाची शिक्षा होई. या जबरदस्तीबद्दल वसाहतींतील व्यापाऱ्यांनी व लंडनच्या पेढीवाल्यांनी फार ओरड केली. इ स. १७५१ साली वसाहतवाल्यांनीं यापुढें कर्जरोखे काढूं नयेत असा ठराव झाला, पण एकंदरीत वसाहतवाल्याना ती गोष्ट आवडली नाहीं. अशा रीतीने वसाहतींत कायदेशीर जुलूम-जबरदस्ती चालू असल्यामुळे वसाहतवाले इंग्लिश सत्तेस कंटाळून गेले व त्यांच्यामध्ये असंतोषाची वृद्धि होऊं लागली. आपला देश स्वतंत्र झाल्याशिवाय या जाचांतून आपली सुटका होणे अशक्य आहे अशी त्यांची खात्री होऊं लागली. स्वातंत्र्याचे युद्ध जाहीर होण्यापूर्वी असंतोष कसा पसरत गेला व राज्यक्रांति होण्यास इष्ट परिस्थिति कशी उत्पन्न झाली होती हें यावरून स्पष्ट दिसून येईल.



# स्वातंत्र्ययुद्धाचीं कारणें

## प्रकरण सातवें.



फ्रेंच व इंडियन युद्धा ' मुळे अमेरिकन वसाहतीवर फार महत्त्वाचे परिणाम झाले होते पॅरिस येथील तहामुळें फ्रेंच लोकांनी सेंट लॉरेन्स नदीचे व ग्रेट लेक्सचे आसमंतातील सर्व प्रदेशाचा ताबा सोडून दिला, तसेंच मिसिसिपी व ॲलिघेनी या द्यांचेमधील अत्यंत सुपीक प्रदेशही त्यांना इंग्रज वसाहतवाल्यांचे ताब्यांत द्यावा लागला व अशा रीतीनें इंग्रजांचा पूर्ण विजय झाला. फ्रेंच लोक इंडियन लोकांस चिथावून ब्रिटिशवसाहतीवर हल्ला करण्यास लावीत, तीही पीडा आपोआप बंद झाली. इंडियन लोकांसही कळून चुकलें की, आतां या परकी लोकाचा पगडा आपल्या देशावर बसल्याशिवाय रहात नाही, म्हणून त्यानी इंग्रज व फ्रेंच लोकांनीं आक्रमिलेल्या मुलुखापलीकडील गिरिकंदरांत आपले निवासस्थान कायम केले. स्पेन देशापासून क्यूबा व फिलिपाइन बेटे इंग्रजांनी लढाईत जिकलीं होतीं, ती त्यांचीं त्यांस परत देण्याचे बोलिवर फ्लॉरिडा प्रांत ब्रिटिशांचे ताब्यांत देण्यास स्पेन तयार झाला. अशा रीतीने एका मोठ्या सलंग प्रांतावर ब्रिटिश लोकांना ताबा मिळाला व त्यांनीं महत्त्वाचे ठिकाणीं ब्रिटिश फौजा ठेविल्या. अशा रीतीनें फोर्ट ड्यूकेन, नायगारा, व डिट्रॉइट वगैरे जागीं चांगला बंदोबस्त ठेवण्यांत आल्यामुळें परकीय वसाहतवाले व इंडि-

यन लोक यांच्यापासून आतां पूर्ण शांतता लाभेल म्हणून वसाहतवाल्यांस आशा वाटूं लागली होती.

सात वर्षांच्या सतत युद्धामुळे वसाहतवाल्यांचे अंगीं स्वसंरक्षण करण्यास आवश्यक असें लढाऊ सामर्थ्य आपोआपच आलें होतें. कारण वसाहतींनीं स्वतःच्या खर्चानें पोसलेलें पंचवीस हजार सैन्य ब्रिटिश सैन्याचे मदतीस दिलें होते, तसेच वसाहतवाल्यांनी आपली चारशे जहाजें लढाईचे कामीं दिली होतीं व त्यांनीं शत्रूच्या वाहतुकी जहाजांना अतोनात त्रास दिला व हे शेवटीं आरमारी लढाईत जो शेवटचा विजय झाला त्याचें मुख्य कारण होते. ब्रिटिश पार्लमेंटनें वरील मदतीबद्दल वसाहतवाल्यांची मुक्तकंठाने वरचेवर स्तुतीही केली होती.

एकत्र लढत असतां अमेरिकन शिपायांस ब्रिटिश फौजेचे गुणावगुण सहजच समजून आले. ब्रिटिश शिपायांत शिस्त वगैरे गुण कांहीं प्रमाणांत अधिक असत, पण याच देशांत जन्म पावल्यामुळे आपल्या आसपासचा मुलूख, लोक, व इंडियन लोकांशी लढण्याची पद्धति वगैरेबद्दल अमेरिकन शिपायास अधिक माहिती असे, तसेंच अमेरिकन शिपाई काटकपणांत ब्रिटिश शिपायास हार जाण्यासारखा नव्हता हीही गोष्ट उघड उघड दिसून येऊं लागली. त्यामुळे ब्रिटिश शिपायांबद्दल अमेरिकन शिपायांस फारसें महत्व अगर भीतीही वाटत नव्हती.

अशा रीतीनें अमेरिकन वसाहतवाल्यांत एक प्रकारचा आत्मविश्वास उत्पन्न होऊं लागला होता. सभोंवतालच्या परिस्थितीचा विचार त्यांच्या मनांस पीडा देऊं लागला होता, जुलुमाबद्दल उत्पन्न होणारी चीड त्यांचे मनांस जाणवूं लागली होती, प्रतिकाराचा मार्ग ते शोधीत होते, आत्मविश्वास त्यांचे ठाईं उत्पन्न होण्यास प्रत्यक्ष लढाईच कारण झाली होती, व त्या लढाईंत त्यांनीं जयही मिळविला होता. मानवी जीवनाची जी स्थिति,

तीच राष्ट्राच्या जीवनाचीही आहे. त्यांना बाल्य, तारुण्य व प्रौढावस्थाही आहे. मान–अपमान व राग–लोभ हीं जशीं वैयक्तिक तशीं सामुदाईकही आहेत, मग प्रत्यक्ष खिसे कापले जाऊं लागले व पोटास चिमटा बसूं लागला म्हणजे व्यक्तीप्रमाणें राष्ट्रही खडबडून जागें होऊन प्रतिकाराचे मार्ग शोधूं लागलें, तर त्यांत नवल कसले ?

वसाहतवाल्यांची प्रत्येक बाबतीत कुचंबणा होऊं लागली होती. व्यापाराच्या, शेतीच्या, व कारखानदारीच्या प्रत्येक बाबतींत कसला तरी कायदा आडवा येई, त्यामुळे आर्थिक अडचण येई, येवढेंच नव्हे तर आपल्याच देशांत एकही गोष्ट करण्याचें स्वातंत्र्य आपल्यास नाहीं याबद्दल वसाहतवाल्यांस अपमान वाटणे स्वाभाविक होते.

सप्तवार्षिक युद्धानंतर इंग्लंडचे ताब्यात खुद्द अमेरिकेंतच नव्हे तर हिंदुस्थानांतसुद्धां इतका मुलुख आला कीं इंग्लंड एक मोठे साम्राज्य बनलें व एवढ्या विस्तृत साम्राज्याचा बंदोबस्त नीट ठेवण्यास लागणारा फौजफाटा ठेवणे व त्यासाठीं पैशाचा बंदोबस्त करणे अगत्याचें होऊन बसलें होतें. विशेषतः अमेरिकन वसाहतवाले जकातीविषयक कायद्यांचें राजरोस अतिक्रमण करीत, त्यामुळे त्या कायद्यामुळे होणारा फायदा मुळींच होत नसे व वसुलांत तूट येई. या गोष्टीचा पुरा बंदोबस्त झाला पाहिजे असें पार्लमेंटचें म्हणणे होते. वसाहतवाल्यांच्या बेकायदेशीर वर्तनाचा बीमोड करण्याकरितां दहाहजार ब्रिटिश रेग्युलर सैन्य अमेरिकेंत ठेवण्यांत यावे व त्याच्या खर्चाची रक्कम वसाहतींचे उत्पन्नांतून कापून घ्यावी असा त्यावेळचे मुख्य प्रधान लॉर्ड ग्रेन्व्हिल व बोर्ड ऑफ ट्रेडचे अध्यक्ष यांनी ठराव केला व त्याला तिसरे जॉर्ज बादशहा यांनीं पूर्ण पाठिंबा दिला. आपण केलेल्या कायद्यांचें उल्लंघन झाल्यास जार्ज बादशहास फार चीड येई पण केलेला कायदा न्याय्य आहे कीं नाही याचा विचार करण्यास त्याला कधीं फुरसत मिळत नसे.

पार्लमेंटला वसाहतींचे राज्यकारभारांत हात घालण्याचे काय अधिकार आहेत यासंबंधीं स्पष्ट कायदा अद्यापपर्यंत झाला नव्हता. आतांपर्यंत अंतर्गत राज्यकारभारांत अमेरिकन वसाहतवाल्यांस साधारण इंग्रज लोकांपेक्षां अधिक अधिकार होते असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. कलोनियल असेंब्ली म्हणजे वसाहतवाल्यांची मुख्य सभा आतापर्यंत अंतर्गत व्यवहारासंबंधी कायदे करी व सर्व व्यवस्था नीट चालत असे. फक्त कोठें प्रश्न आलाच तर ब्रिटिश व्यापारी धोरणास धोका पोंहोचण्याचा प्रसंग आला तरच येई. वसाहती–सरकारचे धोरणानेच सर्व करवसुली व त्याचा विनियोग होई. ब्रिटिश पार्लमेंटने जे कायदे केले होते ते कॉलनीतील सर्व व्यापाराचा मक्ता फक्त इंग्लंडकडेच रहावा या दृष्टीनें केले होते व वसाहतींचे बंदरांतून ज्या जकाती बसविल्या होत्या त्यांचा हेतु ब्रिटिश मालाशी स्पर्धा करणाऱ्या मालाची वसाहतींमधून हकालपट्टी करण्याचा होता; पण अंतर्गत जकाती किंवा कर पार्लमेंटने आजपर्यंत वसाहतींवर बसविल्याचें उदाहरण नव्हतें, इतकेच नव्हे तर पूर्वीचे ब्रिटिश मुख्य प्रधान वॉलपोल व पिट् या दोघांनी अशा तऱ्हेचे कर बसविणे गैरशिस्त आहे म्हणून तसल्या सूचना पूर्वी धुडकावून दिल्या होत्या. पण सप्तवार्षिक युद्धांत इंग्लंडला सुमारें चौदा कोटी पौंड कर्ज झालें होतें व त्याची फेड कशी करावी हा प्रश्न येऊन पडला होता. शिवाय नवीन काबीज केकेल्या मुलखाचा बंदोबस्त ठेवण्यास किती पैसा लागणार होता त्याचा अंदाजच नव्हता. खुद्द ब्रिटिश लोकांवरही कराचा बोजा वाढतच चालला होता व त्यांच्यांत अधिक असंतोष वाढूं देणें इष्ट नव्हतें, उलटपक्षीं वसाहतवाल्यांची लोकसंख्या वाढत होती व त्यांच्यांत सुबत्ता नांदत आहे असे इंग्रज मुत्सद्यांस वाटत होतें व शिवाय वसाहतींच्या स्वातंत्र्यासाठींच झालेल्या लढाईचा खर्च वसाहतींनींच द्यावयास पाहिजे असें ब्रिटिश पार्लमेंटचें म्हणणें होतें.

इ. स. १७६४ सालीं 'शुगर ॲक्ट' नांवाचा कायदा पास झाला. १७६३ च्या मोलॅसिस ॲक्टाचीच ही सुधारून वाढविलेली आवृत्ति होती. मोलॅसिस् ॲक्टापासून ब्रिटिश सरकारला कांहीं एक फायदा झाला नाहीं,

कारण कर जबर असल्यामुळें व्यवहार बंदच झाला व जो होई तो चोरून मारून ह्मणजे जकात चुकवून होई. ही चूक पुढे दुरुस्त करून शुगर ॲक्ट अमलांत आणला. या कायद्यांत साखरेवरील जकात पूर्वीच्या अर्ध्यानें ठेविली होती. हेतु हा कीं लोक इतकी जकात खुशीनें भरतील. पण त्यांत अशी एक सुधारणा केली होती की, साखरेच्या जोडीस दुसऱ्या अनेक चिजा बसविल्या होत्या उदाहरणार्थ कॉफी, दारू, नकशीचें कापड, रेशीम व फ्रेंच बनात या सर्वांवर जकात लादण्यात आली होती. वरील जकाती माफक असल्यामुळे व या सर्व वस्तू श्रीमंत लोकच वापरीत असल्यामुळे जकात सहज वसूल होईल अशी अपेक्षा होती. शुगर ॲक्टच्या कायद्याचे प्रस्तावनेंत सदरहू कायदा, वसाहतींचे संरक्षणार्थ लागणारे पैशाची तरतूद करण्याकरितां आहे असें ह्मटले होतें.

काकवीवरील जकात जरी एका ग्यालनवर तीन पेन्सप्रमाणे होती तरी त्यामुळें काकवीची किंमत सुमारें वीस टक्क्यांनीं वाढली व दारू गाळणारांचा नफा बहुतेक नाहींसा झाला, कारण काकवीची किंमत वाढली तरी दारूची किमत मुळींच वाढली नाही, यामुळे दारू गाळण्यांत फायद मुळींच पडेना. वेस्ट इंडीजशी काकवीचा व्यापार बंद झाल्यामुळें काकवी-बद्दल वेस्ट इंडीजला उलट पाठविण्याचा मालही अर्थात् बंद झाला, त्यामुळे जहाजांस काम नाहींसें झाले व ती तशींच बंदरांत पडून राहूं लागली, अथवा दुसरीकडे काम शोधूं लागलीं. दारूचा व्यापार बसल्यामुळें माला-च्या किंमती उतरूं लागल्या, व लोकांत बेकारीही वाढूं लागली. मॅसचुसेट-मधील मासळीचा व्यापारही बंद पडूं लागला, कारण बहुतेक सर्व मासळी काकवीच्या मोबदल्यांत जात असे, वेस्ट इंडीजमधून काकवी येणें बंद होतांच मासळीस कोणी विचारीना. दोन तृतीयांशापेक्षां अधिक व्यापार मासळीचे धंद्यांत कमी झाला. या अन्यायाबद्दल त्यावेळचे मॅसचुसेटचे गव्ह-र्नर बेर्नार्ड यांनीं पार्लमेंटला तक्रार अर्ज पाठविला होता व त्यांत दर ग्यालनास एक पेनीपेक्षां अधिक जकात असूं नये असें ह्मटलें होतें.

वेस्ट इंडिजशीं व्यापार बंद झाल्यानें वसाहतींत जें स्पॅनिश चांदीचें नाणें खेळतें राही तेंही बंद झालें व हे सर्व कर रोख पैशांनीं भरावयाचे

असल्यानें फारच त्रेधा होई, कारण ज्या जकातीमुळें जवळचा खेळता पैसाच नाहींसा झाला ती जकात रोख नाण्यांत भरण्यास नाणेंच शिल्लक नव्हतें. याच वेळीं वसाहतींनीं अधिक कागदी नोटा काढूं नयेत असें पार्लेमेंटनें नियंत्रण घातलें होतें. एकंदरींत वसाहतीचे कल्याणाचे दृष्टीने हे नियंत्रण कदाचित् योग्य असले तरी आतांचा समयच असा होता की या नियंत्रणानें असंतोषांत भरच पडली व वसाहतवाल्यांचा कोंडमारा होऊं लागला.

तीन हजार मैल अंतरावर असलेल्या सहानुभूतिशून्य राज्यकर्त्यास वसाहतींतील लोकांची कशी कुचंबणा झाली होती याची कल्पनाही नीटशी नव्हती.

शुगर ॲक्टची अंम्मलबजावणी नीटशी होत नव्हती, आतांपर्यंत फक्त दोन हजार पौंड वसुली करण्यास ब्रिटिश ऑफिसरांस आठ हजार पौंड खर्च आला होता. आतां ही अंम्मलबजावणी अधिक कसून व्हावयाची होती. कस्टम खात्यांतील आफिसरांनीं सारा वेळ जकात कट्टयावरच राहिले पाहिजे. असे हुकूम सुटले व तपासणी कसून करण्याबद्दल ताकीत मिळाली. जकात चुकवून आणलेला माल कोठे तरी लपविला आहे असा संशय आल्यास वाटेल त्या घराची झडती घेण्याची परवानगी जकात-आफिसरांस मिळाली, किनाऱ्याचे संरक्षणास ठेविलेल्या सर्व लढाऊ गलबतांवर जकात चुकवून कांहीं जहाजे व्यापार करीत आहेत असा संशय आल्यास झडत्या घेण्याचें काम सोपवून देण्यांत आलें. लष्करी बंदोबस्ताचे कोर्टीस जकात चुकाविल्याबाबतचे खटले ज्यूरीचे मदतीशिवाय चालवून लोकांस शिक्षा ठोठावण्याचा अधिकार मिळाला, परंतु शुगर ॲक्टपासून कांहीं एक उत्पन्न होईना.

इ. स. १७६५ सालीं स्टॅंप अक्ट नांवाचा कायदा वसाहतींवर लादण्यांत आला. असला कायदा इंग्लंडमध्यें चालू होता व त्यापासून उत्पन्नही उत्तम येई. मुख्य प्रधान ग्रेनव्हिल यांनीं असा कयास बांधला कीं हा कायदा वसाहतींस लागूं केल्यास सुमारें एक लक्ष पौन्ड उत्पन्न होण्यास

हरकत नाहीं. या कायद्याचे अन्वयें अर्ध्या पेनीपासून तों दहा पौन्डां-पर्यंतचे स्टॅप काढलेले होते व ते प्रसिद्ध केलेल्या नियमांप्रमाणें कर्जखातें, दस्तऐवज, लायसेन्स, करारनामे, मृत्युपत्रें, गहाणखते, बाक्षिसपत्रें, तसेंच सर्व तऱ्हेचे अर्ज, छापील मजकूर, पुस्तकें, क्यालेंडरे, व चोपडीं वगैरे सर्व ठिकाणीं लावण्यास कायद्याने भाग पाडले होते. हे स्टॅप विकण्याकरितां सर्वत्र माणसे नेमण्यांत आली होतीं, व स्टॅप न लावल्यास पांचपासून पन्नास पौंडांपर्यंत दंडाची शिक्षा कायद्यांत सांगितली होती. किरकोळ वर्तमानपत्रें किंवा पंचांगे विकणारे सुद्धा या स्टॅप ॲक्टापासून सुटले नव्हते. वर्तमानपत्रास किंवा पंचांगास सुद्धां स्टॅप लाविला नाहीं तर दोन पौंड दंड होई, व खोटे स्टॅप तयार केल्यास मृत्यूचीच शिक्षा होती.

इतका कडेकोट बंदोबस्त जरी स्टॅप ॲक्टने करून ठेविला होता तरी त्यापासून यावा तितका वसूल मुळीच येईना. लोकांनी स्टॅप विकतच घेण्याचें नाकारले. पुष्कळ लोक करारनामे कागदावर लिहीतच नसत, तोंडी कररावर काम चालूं लागले. हा नवीन स्टॅप लाविलेला कागद देश-भक्त वकील हातीच धरीत नसत. वर्तमानपत्रे छापण्याचींच बंद झालीं व छापत तीं स्टॅपाचे ऐवजी मृत्यूचा अस्थियुक्त मुखवटा स्टॅपाचे जागीं छापूं लागलीं. स्टॅप असलेल्या पेट्या जाळण्यात येऊं लागल्या किंवा समुद्रांत फेकून देण्यांत येऊं लागल्या.

साऊथ करोलिनामध्ये स्टॅप लावण्याचे लोकांनी नाकारल्यामुळें कोर्टेंच बंद ठेवण्यांत आलीं. बॉस्टन येथील स्टॅप विकणाऱ्या माणसांस तंबी देऊन लोकांनी नोकरी सोडण्यास लावले. तेथील स्टॅप ऑफिसला आग लावण्यांत आली व लेफ्टनंट गव्हर्नरचे घरही जाळण्यांत आलें. न्यूयॉर्क येथेही पुष्कळ खटपट झाली पण स्टॅप लावण्याचें कोणी कबूल करीना. सर्व किनाऱ्यावरील शहरांत ही चळवळ हां हां म्हणतां पसरली.

स्टॅपॲक्टला जो विरोध झाला तो एकतर पैशाच्या अडचणीमुळें झालाच, कारण या कायद्यामुळें पुष्कळ व्यापारी लोकांचें प्रत्यक्ष पैशाकडून नुकसान होणारच होतें पण मुख्यतः वसाहतवाल्यांचा विरोध निराळ्याच तत्वाकरितां होता. त्यांचें म्हणणें, ज्या ब्रिटिश पार्लमेंटमध्यें आपल्या

तर्फेची बाजू मांडण्यास कोणीही नाहीं त्या पार्लमेंटला आह्मांवर कर बसविण्याचा अधिकार नाही. वसाहतवाल्यांच्या या ह्मणण्यास पिट् व बर्क या दोन उदारमतवादी इंग्रजांचाही पाठिंबा होता. खुद्द तिसरे जार्ज यांचा किंवा त्यांचे प्रधान मंडळाचा लोकमतावर फारसा विश्वास नव्हता, मग तें इंग्लंडचे असो अथवा वसाहतींतील असो. इ. स. १७६६ सालीं तेरांपैकीं नऊ वसाहतींनीं, आपल्या हक्कांसंबंधीं एक लांबलचक अर्ज तिसऱ्या जॉर्ज बादशहाकडे पाठविला होता पण नेहमींप्रमाणेंच त्या अर्जाची वासलात लागली.

अर्ज करून दाद लागत नाही अशी जेव्हां वसाहतवाल्याची खात्री झाली तेव्हां इंग्रज व्यापाऱ्यांचे कानास चिमटा घेऊन तरी आपली दाद लागते कीं काय हें पाहण्याचे वसाहतवाल्यांनी ठरविले. ' नॉन् इंटरकोर्स ' नांवाचे धोरण त्यांनी अमलांत आणलें. अलीकडील बहिष्काराचे चळवळीप्रमाणे कांहीं अंशीं ही चळवळ होती. स्टँप ॲक्ट व इतर जुलमी कायद्यांचा पुरा बंदोबस्त होईपर्यंत इंग्लंडमधून कसलाही माल आणावयाचा नाही असा न्यूयॉर्कचे व्यापाऱ्यांनी आपसांत करारनामा काढला. बॉस्टन व फिलाडेल्फिया येथील व्यापाऱ्यानींही अशीच चळवळ आरंभिली. किरकोळ व्यापाऱ्यांनीं असा ठराव केला कीं, ज्या वस्तूंवर बहिष्कार जाहीर झाला त्या वस्तू मुळीच विकावयाच्या नाहींत व शिवाय गिऱ्हाइकांनींही असा ठराव केला कीं, होतां होईल तों देशी वस्तूंवरच काम चालवावयाचे. ' डॉटर्स ऑफ लिबर्टी ' ह्मणून स्त्रियाची संस्था होती तींतील प्रत्येक स्वातंत्र्य कन्यकेनें, कसलाही इंग्रजी माल वापरावयाचा नाही व कपडा तर अमेरिकेंत तयार झालेलाच वापरावयाचा असा निश्चय जाहीर केला. देशाभिमानी वसाहतवाल्यांनी सूत काढण्याचे सामने चालू केले, व एका दिवसांत जी स्त्री सर्वात अधिक सूत काढी तिला मोठमोठी बाक्षिसे देण्याचे ठरविले. इ. स. १७६८ सालीं केम्ब्रिज ( मॅसचुसेट्स् ) येथील युनिव्हर्सिटींत जो पदवीदान समारंभ झाला त्याला आलेल्या सर्व वसाहतींतील विद्यार्थ्यांनीं फक्त वसाहतींत तयार झालेले स्वदेशी कपडे घालूनच आपआपल्या पदव्या ग्रहण केल्या. दुसऱ्या वर्षी ऱ्होड आयलंडमधील विद्यार्थ्यांनींही हाच कित्ता गिरविला.

हळूं हळूं परदेशांतून येणाऱ्या मालाची जागा पटकावण्यासारखा स्वदेशी माल वसाहतींतच तयार करण्याचा पद्धतशीर उपक्रम वसाहत-वाल्यांनीं आरंभिला. इ. स. १७५१ सालीं बॉस्टन येथें ' उद्योग धंद्यांचे वाढीकरितां व गरीब लोकांस कामें मिळवून देण्याकरितां ' ह्मणून एक संस्था स्थापन झाली होती. पुढे इ. स. १७६४ साली मॅसचुसेटसचे जन-रल कोर्टानें सुमारें पंधराशें पौन्ड देणगी देऊन एक कारखाना चालू कर-ण्यास उत्तेजन दिले, त्यानंतर न्यूयॉर्क व फिलाडेलफिया येथे स्वदेशी माल तयार करणाऱ्या व त्याची विक्री करणाऱ्या संस्था निघूं लागल्या. या व इतर दुसऱ्या शहरांतून लवकरच अगदीं इंग्रजी मालाप्रमाणे उत्तम तागाचें व लोकरीचे कापड निपजूं लागले. या कामी लोकर व ताग यांचा लवकरच तुटवडा भासूं लागला. त्यामुळे शेतकरी लोकास ताग व लोकर उत्पन्न कर-ण्याबाबत वसाहती उत्तेजन देऊं लागल्या. ज्यांच्यावर उत्तम लोकरीची पैदास होते अशी कोकरें मारणे निंद्य समजण्यांत येऊं लागले व कोणी कोकराचे मास विकूं लागला तर त्याची समाजात हेटाळणी झाल्याखेरीज रहात नसे.

वसाहतीतील गव्हर्नरांचे या नवीन चळवळीसंबंधांत जे रिपोर्ट गेले त्यांत या नवीन चळवळीचे फारसें महत्व नाही, त्या सहज दडपून टाकितां येतील असाच उल्लेख असे, पण अमेरिकन लोकांनी या कामी केलेली चळ-वळ पाहून प्रधान मंडळाचे मनावर इष्ट परिणाम घडून आला. इंग्रजी मालाची मागणी अजिबात बंद झाली. अमेरिकन लोकांस नको असलेला माल घेऊन जाण्यास जहाजवाले धजत नसत. नको असलेल्या मालाबरोबर कदाचित् आपलें जहाजही बुडवून टाकतील अशी त्यांस भीति वाटत होती, कांहीं जहाजे अर्धवट माल भरून जात तर कांही तशींच ब्रिटिश बंदरांत नांगरून पडत. अमेरिकन गिऱ्हाईक हातचें गेल्याबद्दल कारखान-दारांना वाईट वाटूं लागले, व कांहींना कारखानेही बंद ठेवावे लागले. इंग्लंडांत हजारों लोक बेकार झाले, वसाहतीतलि असेंब्लीचे सभासदांनींच नव्हे तर खुद्द इंग्रजी व्यापाऱ्यांनी व मजुरांच्या संस्थांनीं पार्लमेंटला हे जुलुमी कायदे रद्द करून सुव्यवस्था स्थापन करावी ह्मणजे व्यापाराचें

नुकसान होणार नाही, असे अर्ज केले, तसेंच कारखानदारांना अमेरिकेंत वसूल करण्याच्या मालाबद्दलच्या बाक्या वसूल करणें फार जड जाऊं लागलें, व त्यांनींही हे कायदे रद्द करण्याबद्दल आग्रह धरिला. बोर्ड ऑफ ट्रेड कडेही रोज हे कायदे रद्द करण्याची खटपट करण्यासाठी, अर्जाचीं पुडकीच्या पुडकीं येऊं लागलीं.

स्टँप ॲक्ट ज्यावेळी लागूं केला त्यावेळीं त्यासंबंधानें पार्लमेंटांत फारसा वादविवाद झालाच नाहीं, पण तो बंद करण्याची ज्यावेळीं सूचना आली, त्यावेळी पार्लमेंटात जो वादविवाद झाला व जो धुमाकूळ माजला त्याला इतिहासात इतर ठिकाणीं तुलना सापडणे कठीण आहे. स्टँप ॲक्ट-काढून टाका म्हणणारा पार्लमेंटचा विरोधी पिट् याने हा ठराव मांडला. त्यात समूळ, पूर्णत्वाने व ताबडतोब काढून टाकावा असे स्पष्ट शब्द होते व तसेच हा कायदा काढून टाकण्याचे कारण म्हणजे तो तत्वतःच चूक म्हणून काढून टाकण्यात यावा असे म्हटले होते. तरी पण पिट्ला सुद्धां, वसाहतींवर ब्रिटिश सरकारला वाटेल ते कायदे लादण्याचा अधिकार आहे व तसेच वसाहतीत वाटेल त्या मालाचे नियत्रण करणे, कारखाने व उद्योगधंदे बंद करणे, किंवा इतर वाटेल तशी व्यवस्था लावणे हा ब्रिटिश पार्लमेंटचा पूर्ण अधिकारच आहे असें वाटत होतें. वसाहत-वाल्याच्या खिशांत हात घालून प्रत्यक्ष पैसा बाहेर काढून त्याचे खुशी-शिवाय घेणे, येवढ्या एकाच गोष्टीचा पार्लमेंटास अधिकार नाही असा त्याचा समज होता. ही तरी मेहरबानीच. पिटच्याच शब्दांत त्याचीं मते पहा.

‘ Let the sovereign authority of this country, over the colonies, be asserted in as strong terms as can be devised, and be made to extend to every point of legislation whatsoever; that we may bind their trade, confine their manufacture, and exercsie every power whatsoever–except

that of taking their money out of their pockets without their consent. ' ही झाली अत्यंत उदार अशा पिट-सारख्या ब्रिटिश पुढाऱ्याची गोष्ट, मग इतरांचीं मतें वसाहतींबद्दल कशी असतील ते वाचकांनींच ठरवावें.

त्यावेळी बेंजामिन फ्रँकोलन् लंडनमध्यें पेन्सिल्व्हॅनिया संस्थानतर्फे वकील ह्मणून होता. त्याची अमेरिकन लोकांना या स्टॅंपॲक्टबद्दल काय वाटत आहे यासंबंधीं पार्लमेंटरी कमिटीपुढे साक्ष घेण्यांत आली. त्यानें स्पष्ट सांगितले की, या कायद्यास अमेरिकन वसाहतवाले कधीच मान वांकविणार नाहीत. तो ह्मणाला, ' माझ्या मते स्टॅंप ॲक्ट ह्मणजे सरकारला भरपूर कर दिल्याशिवाय कोणी व्यापार करूं नये, एकमेकांत व्यावहारिक अदलाबदल करूं नये, कांही विकत घेऊं नये, विकूं नये, कर्ज काढूं नये, कर्ज फेडूं नये, लग्न करूं नये, किंवा मृत्युपत्रही करूं नये, असला हा आमचे पैसे उपटण्याचा कायदा आहे, हा पाळला तरी तोटा होतो व न पाळला तर खटला होऊन नुकसान होते. अशा तऱ्हेच्या कायद्यास मान वांकविल्यास त्यापेक्षां अधिक हानिकारक व अधिक जुलमी कायदे आमच्या डोक्यावर लादले जातील, पुढच्या वर्षी ह्मणजे इ. स. १७६६ सालीं हा स्टॅंप ॲक्ट ताबडतोब रद्द झाला. रद्द करण्याचे जाहीरनाम्यांत ह्मटले होते कीं, " या कायद्यान्वये बऱ्याच लोकांची गैरसोय होत असल्याचें दिसून आल्यामुळें व आमच्या राज्यांतील व्यापारास धोका पोंहचण्याचा संभव दिसून आल्यामुळें तो बंद करण्यांत येत आहे. "

अशा रीतीने स्टॅंप ॲक्ट जरी मागे घेण्यात आला तरी त्यांतील मूलभूत तत्व जे लोकांच्या संमतीवांचून त्यांच्यावर कर बसविणें ते तसेंच राहिलें, कारण लवकरच ' डेक्लेरेटरी ॲक्ट ' नांवाचा नवीन कायदा अमलांत आला. त्याला वसाहतींवरील हक्क प्रस्थापित करण्याचा कायदा असे ह्मणतां येईल. या कायद्यांत ह्मटलें आहे कीं, ' अमेरिकेंतील कॉलनीज व मळे, हे, ग्रेट ब्रिटनचे पार्लमेंटचे हातांखाली व त्यावर अवलंबून असणारे मुलुख ह्मणून पूर्वीपासूनच आहेत, हल्लींही आहेत व पुढेंही अगदीं हक्कानें असतील व त्यावर ग्रेटब्रिटनचे पार्लमेंटची व राजाची अनियंत्रित सत्ता

चालेल. ' स्टॅप ॲक्ट रद्द झाला, त्याचे विजयामुळें, अमेरिकेंत आनंदीआनंद झाला होता. साऊथ कॅरोलिनाचे लोकांनी पुन्हां ब्रिटिश कपडे अंगावर घालून राजाचा वाढदिवस साजरा केला व अंगावरील देशी कपडे गरीब-गुरीबास वाटून दिले न्यूयॉर्क व बॉस्टन येथील व्यापाऱ्यांनी पुन्हां ब्रिटिश कापड व माल मागविण्यास सुरुवात केली. तथापि एकंदरीत ब्रिटिश पार्लेमेंटचे समाधान झाले नाही. वसाहतीपासून कराचे रूपानें पुष्कळ पैसा काढल्याशिवाय आपला अधिकार वसाहतीत चालतो असे समजण्यास त्याला काही आधार नव्हता इ स. १७६६ सालचे अखेरीस पार्लमेंटनें शुगर ॲक्ट किंचित् सौम्य करून पुन्हा सुरू केला. त्यात काकवीवरील कर दर ग्यालनामागें फक्त एक पेनी ठेविला होता, व अशा रीतीने तरी लोक नवीन कारभारास संमति देतात की काय हे ब्रिटिश सरकार पहात होते. शिवाय ज्या लोकानी करभारास नापसंती दाखविली त्यांना शिक्षा व्हावी ह्मणून म्यूटिनी ॲक्ट नावाचा कायदा लागू केला ज्या ज्या भागांत करबंदीची चळवळ झाली होती तेथे तेथे ब्रिटिश फलटणी ठेवण्यात आल्या, व त्या त्या भागांतील शिपायास जळण काटक, दिवाबत्ती, व राहण्यास जागा पुरविण्याचे नागरिकास भाग पाडण्यात आले. ह्या जबरदस्तीचा तर लोकांस विशेषच राग आला. विशेषत न्यू यॉर्क, बॉस्टन व चार्लस्टन येथील लोकांचे असेब्लीने या नवीन जुलमास मान वाकवूं नये, अशा तऱ्हेची लोकास सल्ला दिली

अशा तऱ्हेने लोकांनीं आपल्या सत्तेचा उपमर्द केल्यामुळे ब्रिटिश सरकार अधिक चिडले व त्याने अधिक जबरदस्तीचे उपाय अमलांत आणण्यास सुरुवात केली. न्यू यॉर्क येथील लोकाची असेब्ली बंद ठेवण्यांत आली व तेथें बंडाच्या कायद्याची सक्त अंमलबजावणी चालू करण्यांत आली. व्यापारी कायद्यांची अंमलबजावणी कसून करण्याकरितां जकातीकमिशनरांच्या नवीन नेमणुका विलायतेतून करण्यांत आल्या व त्यांना भरपूर सत्ता देण्यांत आली. तसेंच कांचमाल, छापखान्यांची शाई व कागद, चहा, दारू, तेल व फळफळावळ वगैरे वसाहतींत आयात होणाऱ्या मालावर जकाती

लादण्यांत आल्या. या जकातींपासून होणारे उत्पन्नांतून, ब्रिटिश सरकारचे अमेरिकेंतील गव्हर्नर, एजंट व इतर सरकारी ऑफिसर यांचे पगार देण्यांत यावयाचे होते, व या जकातींवर लोकांचे असेंब्लीची सत्ता बिलकुल चालावयाची नव्हती. ज्या कायद्यान्वयें ह्या जकाती बसविण्यात आल्या होत्या त्याला 'टाऊनशेंड ॲक्ट' असें ह्मणतात, ह्या जकाती जबरदस्त नसल्या तरी सर्व प्रकारचे नित्योपयोगी पदार्थांवर असल्यामुळें सर्व लोकाचे चरितार्थाचा खर्च वाढला व महागाई भासूं लागली.

खड्या लष्कराचे खर्चापेक्षांसुद्धां, गव्हर्नर व इतर ब्रिटिश अधिकारी यांचेवर असेंब्लीची कसलीच सत्ता चालावयाची नसल्यामुळें, वसाहतींतील लोकांस एक नवीनच अपमानास्पद प्रसंग आपल्यावर गुदरला असें वाटल्यास नवल नाहीं. बरें, हे नवीन अधिकारी तरी कसलेले हुशार लोक असत असें ह्मणावे तर तसेंही बरेच वेळ नसे. ते कोणा तरी लॉर्डाचे कनिष्ठ चिरंजीव असावयाचे, व त्याचे हातून बंदोबस्तही बेताचाच ठेवला जाई, कारण ते कामाची टंगळमंगळ करीत असत, कॅरोलिना वसाहतींत तर या नालायख अधिकाऱ्यांमुळें, गुन्हेगारी व बेकायदेशीर व्यवहार यांना नुसता ऊत आला होता.

स्टँप ॲक्ट पास झाल्याचे कळतांच एखाद्या दारूचे कोठारात ठिणगी पडावी तसें सर्व अमेरिकेंतील वसाहतींत झाले. जिकडे तिकडे राजकीय सभा भरण्यास सुरुवात झाली, उत्तम वक्त्यांना जिकडे तिकडे मान मिळूं लागला. वर्तमानपत्रांतून या करांचे अनौचित्याबद्दल लेख फडकूं लागले. प्रत्येक शहरी सभातून पास झालेले ठराव पार्लमेंटकडे पाठविण्यांत येऊं लागले हा कायदा अंमलात राहूं नये, ताबडतोब रद्द व्हावा या हेतूनें खटपट करण्यासाठीं कित्येक वसाहतींनीं आपले प्रतिनिधी लंडन येथे पाठविले. हा कर बसवितांना ब्रिटिश पार्लमेंटची विचारपरंपरा खालीलप्रमाणें होतीः— 'सप्तवार्षिक युद्ध इंग्लंडनें वसाहतींकरितां केलें, त्याअर्थी वसाहतींनाच त्याचा फायदा मिळाला आहे, ह्मणून त्याचा सर्व खर्च वसाहतींनीच सोसावा हें योग्य आहे, व वसाहतींना स्टँपड्यूटी भरून थोड्या वर्षांत हें कर्ज फेडणें शक्य आहे.'

वसाहतींतील लोक ह्मणत, 'सर्व वसाहती इंग्लंडच्याच असल्या-कारणानें त्यांचें संरक्षण करणें हें इंग्लंडचें कामच आहे, शिवाय या युद्धांत वसाहतींनीं सैन्य व पैसा या दोन्ही रूपानें ब्रिटिश सरकारास द्यावयाची तितकी मदत दिलेलीच आहे इतकेंच नव्हे तर ब्रिटिश सरकारास जो इतका अफाट मुलुम लढाईत मिळाला तो मिळण्यांत वसाहतवाल्यांचेच रक्त सांडलें आहे, व ब्रिटिश सरकारास उलट फायदाच झाला आहे. कानडाचा सर्व मुलुख तर ब्रिटिश सरकारास निव्वळ नफ्यांत पडला आहे. हा नवीन कर भरण्यांत वसाहतवाल्यांचें निव्वळ आर्थिक नुकसानच नसून त्यामुळें त्यांचे स्वातंत्र्यास बाध येत आहे! वसाहतवाले असें ह्मणत कीं ' निव्वळ तत्वा-करितां आह्मास हा कायदा नको आहे. ब्रिटिश पार्लमेंटमध्यें जोंपर्यंत आमचे प्रतिनिधी नाहात तोंपर्यंत आमच्यावर कसलाही कर बसविण्याचा त्यास अधिकार नाहीं. पुनः जर युद्ध करण्याचा प्रसंग आला तर आह्मी तें स्वतः करूं, आह्मांस कोणाच्या मदतीची अपेक्षा नाहों ' या करासंबंधीच्या प्रारंभीच्या वादविवादात ब्रिटिश मुत्सद्दी विल्यम पिट यानें वसाहत-वाल्यांची बाजू घेतली होती, पण पुढे विल्यमपिटला लॉर्ड चॅथॅम अशी पदवी मिळून तो लॉर्ड बनला, व स्टँप ॲक्ट पास झाला. हाऊस ऑफ लॉर्डस्मध्ये एकमत होऊन स्टँप ॲक्ट पास झाला होता. त्याचवेळीं तिसऱ्या जॉर्ज बादशहास वेड लागल्यामुळे या बिलावर सही होऊं होऊन शकली नाहीं, पुढे काही दिवसांनी राजाचेबद्दल जे कौन्सिल नेमले होते त्याची सही या बिलावर झाली. यावेळी बेंजामिन् फ्रॅंकलिन् इंग्लंडमध्यें होता. त्यानें आपल्या एका अमेरिकन मित्रास पत्र लिहितांना लिहिलें कीं,' आतां अमेरिकन स्वातंत्र्याचा सूर्य अस्तास गेला आहे. उद्योगधंदे व काटकसर यांचा दीप पेटवून त्याचेवर आपल्यास काम निभावून घेणे प्राप्त आहे.' त्याचे मित्रानें त्याला परत उत्तर लिहिलें कीं, 'आपण शांत असा, आतां काय पेटवायचे तें आह्मांस नीट माहीत आहे.' यावरून त्यावेळचे लोकक्षोभाची नीट कल्पना येण्यासारखी आहे.

बंडाचा वणवा पेटला !– अशा तऱ्हेची या नवीन कायद्यानें केलेली लोकमताची पायमल्ली या नवोदित व स्वातंत्र्यप्रेमी राष्ट्रास खपली नाहीं.

मेघांचा कडकडाड व्हावा व मोठी वीज पडावी तशी स्थिति हा कायदा पास झाल्याचे ऐकतांच वसाहतींत उत्पन्न झाली. जे अभिमानशून्य शिळपट लोक होते ते नाशिबास दोष देऊं लागले व दुःख करूं लागले, पण जे जिवंत रक्ताचे होते त्यांना संताप चढला, त्यांच्या मनोवृत्ती अनावर झाल्या व त्यांनीं साधेल त्या मार्गाने प्रतिकार करण्याचे ठरविलें. आणि मोठमोठ्या शहरांत लोकांच्या टोळ्या हवालदिल होऊन रस्त्यांतून फिरूं लागल्या व कांही कांही ठिकाणी अत्याचार होऊं लागले.

फिलाडेलफिया व बॉस्टन शहरी शोकदिग्दर्शक आवाजांत चर्चच्या घंटा वाजूं लागल्या, व लोक ह्मणूं लागले की, ' स्वातंत्र्याचे हे मृत्युगीतच वाजत आहे ' न्यूयॉर्क शहरी जगी मिरवणूक निघाली. तेथे एका मोठ्या फळ्यावर मृत्यूचा अस्थिमय मुखवटा चिकटविण्यात आला त्यावर ' इंग्लंडचा मूर्खपणा व अमेरिकेचा सत्यानाश ' अशा अर्थाचा मजकूर लिहिला होता. हा फळा मिरवणुकीबरोबर फिरविण्यांत आला निरनिराळे वक्ते येऊन आगीत तेल ओतल्याप्रमाणे भाषणे करीत होते. व्हर्जीनियाचे असेंब्लीचा पॅट्रिक हेनरी नांवाचा तरुण मेंबर होता, त्याचा क्रोध अनावर झाला व त्याने पुष्कळ इतर मेंबरास पुढाकार घेऊन पार्लमेंटास विरोधी भाषणे करण्याचा उपदेश केला पण कोणी तयार होईना, मग तो स्वतःच पुढे झाला एका कायद्याचे पुस्तकांतील पान जोराने फाडून तो ह्मणाला ' व्हर्जीनियांतील प्रत्येक माणूस इंग्रज रक्ताचा आहे व इंग्लंडांतील इंग्रज माणसांत असलेले एकूणएक अधिकार त्यास असले पाहिजेत. आपल्यावर बसत असलेल्या एकूणएक करांबद्दल पसंती नापसती दर्शविण्याचा हक्क ज्याप्रमाणे प्रत्येक इंग्रजास आहे तसाच तो प्रत्येक अमेरिकन माणसासही असला पाहिजे ' आपल्या इच्छेविरुद्ध बसलेल्या कायद्यास विरोध करणे प्रत्येक वसाहतवाल्याचे पवित्र कर्तव्य आहे व जो असे न करील तो आपल्या देशाचा शत्रु आहे अशा तऱ्हेचे ठराव असेंब्लीपुढे आले, त्यांवर कडाक्याचे वादविवाद झाले, व सभेंत धुमाकूळ माजून राहिला. व्हर्जीनियाची असेंब्ली सर्वात जुनी व नांवाजलेली होती व कांहीं तरी निर्णय देणें तिला प्राप्त होतें. या सभेंत युनायटेडस्टेटसचे भावी दोन प्रेसि-

डेंट जातीनें हजर होते. एक जॉर्ज वाशिंगटन व दुसरा थॉमस जेफरसन्. दोघेही वादविवाद शातपणें ऐकत होते. इतक्यांत पॅट्रिक हेनरीची स्वारी कडाडली, व तो फार जहाल भाषा बोलूं लागला व त्यांत त्यानें तिसऱ्या जॉर्ज बादशहासंबंधीं अनुदार विधाने केली. इतक्यात सभेंत ' राजद्रोह ' ' राजद्रोह ' असा पुकारा कांही मेंबर लोकांनीं केला तथापि त्यावेळीं उचित असे ठराव पास करून घेण्यात आले, पण दुसऱ्या दिवशी पॅट्रिक हेनरी सभेत नव्हता त्याचा फायदा घेऊन आदल्या दिवशीच्या सभेंतील कांहीं ठरावांची भाषा सौम्य करण्यात आली. ह्या सर्वांत जुन्या असेंब्लीने घेतलेला पुरस्कार पाहून इतर असेंब्लींवर त्याचा इष्ट परिणाम होऊं लागला.

पहिली कलोनियल कॉंग्रेस—निरानेराळ्या असेंब्लीत नवीन कायद्याचे विरोधी ठराव होऊं लागले. बॉस्टनचे असेंब्लीत जेम्स ओटिस नावाच्या सभासदाने सर्व वसाहतीची संयुक्त कांग्रेस बोलवावी असा ठराव आणला. प्रत्येक वसाहतीने राजाची परवानगी न घेता संयुक्त कॉंग्रेसला एक प्रतिनिधि पाठवावा आणि या कॉंग्रसनें राष्ट्रानें प्रतिकाराचा कोणता मार्ग स्वीकारावा याची शहानिशा करावी. एकंदर नऊ वसाहतींनी आपले प्रतिनिधी इ. स. १७६५ चे आक्टोबर महिन्याचे सातवे तारखेस न्यू यॉर्क येथें पाठविले व तेथें पहिली कलोनियल कॉंग्रेस भरली. या कॉंग्रेसमध्ये एकंदर अठ्ठावीस प्रतिनिधी होते व तिचा अध्यक्ष मॅसॅचुसेटसमधील टिमथी रगल्स नावाचा गृहस्थ होता. बरीच भवति न भवति होऊन शेवटीं अगदीं सौम्य पण स्पष्ट अशा शद्बात ठराव पास झाले. त्यांत ' सर्व अमेरिकन वसाहतवाले इंग्रज रक्ताचे आहेत व इंग्रज लोकांप्रमाणेच त्याच्या संमतीशिवाय त्यांच्यावर कोणताही कर बसवितां येणार नाहीं ' असें म्हटले होतें. पार्लमेंटचे हाऊस ऑफ कॉमन्स व हॉऊस ऑफ लॉर्डस या दोन्ही सभांकडे या सभेचे ठरावांचे मसुदे पाठविण्यांत आले. त्याचप्रमाणे खुद्द बादशहांकडेही एक अर्ज करण्यांत आला होता.

तारीख एक नोव्हेंबरपासून स्टॅंप ॲक्ट अमलांत यावयाचा होता. ब्रिटिश अधिकाऱ्यांचे अगदीं सुरुवातीचेपासून योग्य अम्मलबजावणी व्हावी म्हणून कसून प्रयत्न चालू होते. आतांपर्यंत सर्व स्टॅंप छापले जाऊन

जिकडे तिकडे रवाना झाले होते. पण प्रत्येक ठिकाणीं कोणी ते खरेदीच करीना व कांही ठिकाणीं लोकांनी त्यांचा नाश करण्यास प्रारंभ केला. अशारीतीनें तारीख एक नोव्हेंबर १७६५ हा ब्रिटिश खजिन्यांत नवीन वसूल येण्याचा प्रारंभींचा दिन न ठरतां सर्व वसाहतींभर सुतकाचा दिवस म्हणून मानण्यांत आला.

प्रथम सर्व कायदेशीर व्यवहारच बंद पडला व सर्व सरकारी ऑफिसें बंद ठेवण्याची पाळी आली. लग्न ठरलेलीं वधूवरें सुद्धां लग्नाचे करारास स्टॅंप लावावयाचा नाहीं ह्मणून तशींच परत जात व अविवाहित स्थितींत राहण्याचें पतकरीत.

पुढें व्यवहार सुरू झाले पण कोणी स्टॅंप अॅक्टाचे कायद्यांत सांगितल्याप्रमाणें स्टॅंप लावील तर शपथ.

या सुमारास 'सन्स ऑफ लिबर्टी' नांवाची संस्था सुरू झाली. या संस्थेचा उद्देश कोणत्याना कोणत्या उपायानें ब्रिटिश जुलमी कायद्यांचे अंमलबजावणीत घोटाळा माजेल असें करावयाचें, असा होता. न्यूयॉर्क, बॉस्टन व फिलाडेलफिया येथील व्यापारी मंडळीनी असा ठराव केला कीं, स्टॅंप अॅक्ट रद्द होईपर्यंत ब्रिटिशमाल ह्मणून मागवावयाचा नाहीं.

इ. स. १७६६ चे मार्च महिन्यांत स्टॅंप अॅक्ट रद्द झाला, त्यामुळें सर्व अमेरिकाभर आनंद झाला. पण हा आनंद लवकरच मावळला, कारण पुढें टाऊनशेंड डयूटीज ह्मणून नवीन कर लागू झाले. त्यांची माहिती मागील प्रकरणीं आलीच आहे.

टाऊनशेंड डयूटीजचे कायद्यामुळे अमेरिकन लोकमतांत पुन्हां खळबड उडाली, व पुन्हां ब्रिटिश मालाचे बहिष्कारास सुरुवात झाली. वसाहतीतील सर्व वर्तमानपत्रें ब्रिटिश पार्लमेंटचे हेटाळणीनें भरलेलीं असत. इ स. १७६८ साली मॅसचुसेटसचे असेंब्लीनें एक पत्रक प्रसिद्ध करून इतर सर्व असेंब्लीजकडे पाठवून दिलें. त्यांत या नवीन कायद्यांच्या प्रतिकाराचे उपाय सुचविले होते. या प्रकाराबद्दल मॅसचुसेटसच्या असेंब्लीची ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं फार कानउघाडणी केली व हें पत्रक

परत घेण्यास व तें प्रसिद्ध केल्याबद्दल दिलगिरी प्रदर्शित करण्यास भाग पाडले.

या गोष्टीचा व्यापारी लोकांस फार राग आला, त्यांनीं आपलें बहिष्काराचें धोरण जोरांत पुढे चालविलें. इतकेंच नव्हे तर सरकारी जकाती चुकवून बेधडकपणे माल आयात करणें सुरू केलें. इ. स. १७६८ सालीं एक मालानें भरलेली बोट जकात चुकवून जात असतांना कस्टम अधिकाऱ्यांनीं पकडली. त्याबरोबर बरीच गडबड माडली. लोकांनो कस्टमचे अधिकाऱ्यांवर हल्ला केला व त्या अधिकाऱ्याना जाव बचावण्यासाठीं कॅसल विल्यम येथें पळून जावें लागलें. लवकरच जिकडे तिकडे बंडाळी सुरू होते कीं काय अशी भीति वाटूं लागली. जनरल गेज याची ह्या बंडाळीचा बींमोड करण्याचे कामीं नेमणूक करण्यांत आली तो तारीख एक ऑक्टोबर १८६८ साली मॅसचुसेट शहर काबीज करावें अशा थाटाने शहरांत शिरला व लोकांवर जरब बसविण्याचें काम त्यानें सुरू केल. त्याचेबरोबर सुमारे सातशें सैनिक होते.

इकडे पार्लमेंटचे डोके ठिकाणावर नव्हतें, पार्लमेंटनें १७६९ सालीं मॅसचुसट्सचे सर्वच लोकांवर बंडखोरीचा छाप मारला व त्यांपैकीं जे चळवळे सांपडतील त्यांना पकडून इंग्लंडला पाठविण्याबद्दल हुकूम सोडला. तेथें या गुन्हेगारांचा लष्करी कायद्याप्रमाणे चौकशी व्हावयाचा होती. मग मात्र आगींत तेल ओतल्याप्रमाणें झाले. मॅसचुसेट्सच्या जनरल असेंब्लीनें यीं ब्रिटिश हुकुमाविरुद्ध ठराव केला व इतर वसाहतीच्या असेंबूलीजूनींही तसेंच केलें.

नॉर्थ कॅरोलिनामध्यें प्रत्यक्ष बंडासच सुरुवात झाली. पण तेथल्या गव्हर्नरानें मोठ्या शिताफीनें बंडखोरांस पर्वतांचे पलीकडे हांकून दिलें. त्याच हांकून दिलेल्या लोकांनी टेनेसी वसाहत स्थापन केली

बॉस्टन येथील कत्तल—निरनिराळया अमेरिकन शहरांमध्यें ब्रिटिश शिपाई व अमेरिकन नागरिक यांच्यामध्यें फारसें प्रेम दिसून येत नव्हतें. ब्रिटिश शिपायांस अमेरिकन नागरिकांकडे तुच्छतेनें पाहण्याची व स्वतःच्या बडेजावाखातर वाटेल तेथें नागरिकांचा पाणउतारा करण्याची

खोडच लागून गेली होती. इ. स. १७७० सालीं या शिपायांनीं न्यूयॉर्क येथील एका उद्यानांत स्थापन केलेला ' लिबर्टी पोल ' ह्मणजे स्वातंत्र्याचा झेंडा कुऱ्हाडीनें तोडून टाकला. त्यावरून तंटा उपस्थित होऊन लोकांनीं शिपाई लोकांस चांगला चोप दिला. बॉस्टन येथील कांहीं उपद्व्यापी लोकांनी, शहराचे संरक्षणाकरितां ठेवलेल्या कॅपटन प्रेस्टनचे तुकडीवर हल्ला केला व त्यांस भलभलत्या शिव्या दिल्या व तुमची छाती असेल तर गोळीबार करा असा सवाल केला, त्याबरोबर कॅपटन्‌प्रेस्टनचे शिपायास चीड येऊन त्यांनीं गोळ्या झाडल्या, त्या झटापटींत तीन वसाहतवाले ठार झाले व बरेच जखमी झाले. या प्रसंगास अमेरिकन इतिहासांत बॉस्टन येथील कत्तल असें नांव आहे.

आतापर्यंतच्या अनुभवाने इंग्लंडांतील राज्यकर्त्यास अमेरिकेसंबंधानें कांही तरी निराळ्या प्रकारचे राजकारण केले पाहिजे इतके ठाऊक होतें. कांहा तरी सवलती दिल्याशिवाय लोक ताळ्यावर येणार नाहीत हे स्पष्ट दिसूं लागलें होते ह्मणून पार्लमेंटने आतापर्यंत बसविल्या होत्या त्या चहाखेरीज इतर सर्व प्रकारच्या जकाती माफ करण्यासाठीं १७७० साली टाऊनशेंडॲक्ट रद्द केला व १७७२ साली एक कायदा पास झाला, त्यांत मॅसचुसेट येथील सरकारी अधिकाऱ्यांचा पगार तेथील असेंब्लीस न विचारतां तेथीलच खजिन्यांतून घेण्यात यावा, असा हुकूम होता. त्यालाही वसाहतवाल्यांनीं नेहमीप्रमाणे विरोध केला. इतक्यांत ' गास्पी नांवाचें सरकारी जहाज प्रॉव्हिडन्स येथील वसाहतवाल्यांनीं भर बंदरात पकडून, त्याच्यावर चढून, तें जाळून टाकल्याची बातमी इंग्लंडमध्ये येऊन पोहोंचली.

टाऊन शेंड ॲक्ट रद्द झाल्यामुळें वसाहतींतील नागरिकास आपला एकप्रकारें जय झाल्याप्रमाणें वाटूं लागले व ब्रिटिश मालास पहिल्याप्रमाणें मागणी जाऊं लागली व एक प्रकारचें समाधान उत्पन्न झाल्याचें चिन्ह दिसूं लागलें. पण चहावरील जकातीसंबंधीं मात्र व्यापाऱ्यांचे मनांत अद्यापि तेढ राहून गेली होती. चहाचे बाबतींत ईस्टइंडिया कंपनीखेरीज इतर कोणाचा चहा अमेरिकेंत येऊं द्यावयाचा नाहीं व या एका बाबतींत तरी पूर्ण मक्ता आपल्या हातांत राखावयाचा याविषयी पार्लमेंटचें ठाम

मत झालें होतें कारण आतांपर्यंत चहाचा खप विलक्षण वाढला होता. वसाहतींत येणारा सर्व चहा इंग्लिश बंदरांत प्रथम उतरून तेथें त्यावर जकात भरून मगच वसाहतींत पाठविला पाहिजे असा निर्बंध घातल होता. वसाहतवाल्यांनीं ह्या कायद्यास धाब्यावर बसविलें. एकंदर पंधरा लक्ष पौंड चहा वसाहतींत खपे, पण त्यातील नऊ दशांश चहा वसाहत-वाले जकात चुकवून हॉलंडमार्गें किंवा थेट हिंदुस्थान व चीन देशांतून आणवीत. त्यावर तोड म्हणून व आपला कायद्याचा अंमल चालविण्या-करितां म्हणून ब्रिटिश चहा अमेरिकन व्यापारी जर आणतील तर त्यावर त्याला दर पौंडामागे एक शिलिंग ड्यूटी परत देण्याचा डाव ब्रिटिश सरकारने खेळून पाहिला, कारण या नव्या युक्तीनें जकात चुकवून आण-लेल्या चहापेक्षां सुद्धा जकात भरून आणलेला चहा स्वस्त पडे. अशा-तऱ्हेने ईस्टइंडिया कंपनीचा चहा प्रथम अमेरिकेंत घुसडण्यापासून ब्रिटिश सरकारला तात्कालिक आर्थिक लाभ कांहींच राहिला नव्हता, तरीपण अमेरिकन लोकांचे पचनीं आपला अधिकार पाडावा हाच हेतु या खटप-टीचे बुडाशीं होता. उलटपक्षी वसाहतवाले हा सर्व डाव ओळखून होते. त्यांनी कांही झालें तरी ब्रिटिश चहाच आपले किनाऱ्यावर उतरूं द्याव-याचा नाहीं असा निश्चय केला इ. स. १७७३ चे डिसेंबर महिन्याचे सोळावे तारखेस बॉस्टन बंदरात ब्रिटिश चहा उतरल्याची वर्दी तेथील नागरिकांस लागली. लगेच नगरांत एक मोठी सभा भरविण्यांत आली, तिला शहरातील एकूण एक लोक आले होते. या सभेंत सॅम्युएल ॲडॅम्स व जोशिआ क्विन्सी यांची भाषणे झाली. सुमारे पन्नास नागरिक रेड इंडियन लोकाचा पोषाक करून आले होते सायंकाळ होतांच हे सर्व लोक चहानें लादलेली जहाजें नांगरून पडली होतीं तेथें गेले व जहाजांवर चढून त्यांनीं चहानें भरलेल्या मोठमोठ्या तीनशे पेट्या समुद्रांत फेकून दिल्या, या प्रसंगास अमेरिकन इतिहासांत ' बॉस्टन टी पार्टी ' अशी संज्ञा आहे. न्यू यॉर्क व फिलाडेलफिया येथेही चहानें भरलेलीं जहाजें पाठविलीं होतीं ती तशींच खालीं न करितां लंडनला परत पाठवून देण्यांत आलीं. चार्लस्टन येथे व्याापाऱ्यांकडून चहा जबरदस्तीनें काढून घेऊन लोकांनीं एका कोठारांत कुलूप लावून ठेवला व तेथेंच तो सडून गेला.

या प्रसंगाची हकिगत जेव्हां पार्लमेंटला कळली तेव्हां पार्लमेंटने या कृत्यांचा सूड घेण्याचें ठरविलें, बॉस्टन बंदर व्यापाराकरितां बंद करण्यांत आलें. या बंदरांत बादशहांचे प्रजाजनांस सुरक्षितपणें व्यापार करतां येणें अशक्य झाल्यामुळें, व सरकारी जकातींचा वसूल सुरक्षितपणेकरितां येणें अशक्य झाल्यामुळें, हें बंदर बंद करण्याकरितां लढाऊ जहाजेंही ठेवण्यांत आलीं. तेथील कस्टम हाऊस सालेम येथे नेण्यांत आलें. केवळ परदेशी व्यापारावरच अवलंबून असणाऱ्या या शहरात थोडेच दिवसात शुकशुकाट झाला. सालेम शहरीं कस्टम हाऊस नेण्यांत आले खरें, पण तेथील लोकांनीं ही पांडा पतकरण्यास आपण तयार नाहीं असें बजावलें. मार्बल हेड येथील व्यापाऱ्यांनीं बॉस्टन येथील व्यापाऱ्यास आपलीं गोडाउन्स फुकट वापरण्यास दिलीं.

मॅसॅचुसेटस् वसाहतीची सनदच रद्द केली व यापुढें ही वसाहत म्हणजे फक्त बंडखोराचा जमाव आहे असें ठरविण्यांत आलें व जे लोक कायदेशीर कामांत अडथळा आणतील त्या सर्वास पकडून लंडनला पाठवून देण्याबद्दल मॅसचुसेटसचे गव्हर्नरास पूर्ण अधिकार मिळाले. व्हर्जीनिया येथील असेंब्ली रद्द करण्यांत आली होती, पण तिचे सभासद गुप्तपणें जमून त्यांनीं काम काज चालू ठेविलें होतें.

इ. स. १७७४ चे सप्टेंबर महिन्यांत दुसरी कलोनियल कांग्रेस फिलाडेलफिया येथें भरली. या काग्रेसला अकरा वसाहतींनी आपले सभासद पाठविले होते. या सभेनें तीन जाहीरनामे काढले. एक राजे-साहेबांकडे पाठविला, दुसरा इंग्रज लोकांस उद्देशून होता, व तिसरा कानडाचे लोकांस उद्देशून होता, त्याशिवाय सर्व वसाहतींतर्फे सर्व ब्रिटिश व्यापारावर बहिष्कार घालण्याचा ठरावही पास झाला. ही हकीकत पार्लमेटकडे गेल्यावर जनरल गेज यास या उद्धट लोकांस शिक्षा करण्या-करितां म्हणून पाठविण्यांत आलें. त्याचेबरोबर दहा हजार ब्रिटिश शिपाई होते. बॉस्टन नेकवर हल्ला करून ब्रिटिशांनीं तेथें तात्पुरता किल्ला उभा केला. केम्ब्रिज व चार्लेस टाऊन येथील दारूगोळा व लष्करी स्टोअर बॉस्टन येथें आणण्यांत आलें.

## सभाबंदीची तंबी !

जनरल असेंब्लीस पुन्हां सभा न भरविण्याबद्दल ताकीद देण्यांत आली. जनरल असेंब्लीची गुप्तपणें सभा भरून त्यांत ब्रिटिशांविरुद्ध लढाईंत प्रतिकार करितां यावा ह्मणून बारा हजार खडें सैन्य वसाहतींतर्फे उभे करण्याबद्दल ठराव पास झाला.



# स्वातंत्र्य युद्धास सुरुवात

## प्रकरण ८ वें



लढाईस सुरुवात—जनरल गेज यानें बॉस्टन बंदर ताब्यात घेतांच बॉस्टन येथील नागरिक शहराबाहेर खटार गाड्यांत सामान घालून निघून जाऊं लागले. या सर्व खटारगाड्यांत लढाइ करण्याची सामुग्री साठवून गुप्तपणे त्या बॉस्टनपासून सतरा मैलांवर असलेल्या कंकॉर्ड गावीं रवाना होत होत्या. वसाहतवाल्यांस या गुप्त लढाईचें महत्व फार होतें, कंकॉर्ड येथील लढाऊ सामानाची वर्दी ब्रिटिश सैन्यास लागतांच, तेथे चाल करून जाऊन ही सर्व लष्करी सामुग्री हस्तगत करण्याचा हुकूम ब्रिटिश सैन्यास सुटला कर्नल स्मिथ व मेजर पिटकेर्न हे कंकॉर्डवर चाल करून निघाल्याचे समजताच सर्व बास्टन शहर घंटानाद करून जागे करण्यांत आले व वसाहतवाल्यांपैकीं दोन गृहस्थ विल्यम डॉवस व पॉल रिव्हेर हे घोड्यावर बसून लेक्सिंगटन येथें सुमारे एकशेतीस बदुकवाले लोक या कंकॉर्डवर हल्ला करण्याकरितां जाणारे लोकांस अडथळा करण्यास सज्ज झाले. सायंकाळपर्यंत ब्रिटिश सैन्य आलेंच नाहीं पण सायंकाळीं मेजर पिटकेर्नचे हातांखालील लोक येऊन पोहोचतांच एक चकमक झडली व त्यांत वसाहतवावाल्यांचे सोळा स्वयंसेवक जखमी झाले व त्यांतील कांहीं मृत्यू पावले. अशा तऱ्हेनें पहिली चकमक लेक्सिंगटन येथें झडून स्वातंत्र्ययुद्धास राजरोस सुरुवात झाली.

त्यानंतर ब्रिटिश शिपाई कंकॉर्ड येथे सरळ चालून गेले. पण त्यावेळेपर्यंत तेथील लढाऊ सामानाचा सांठा नागरिकांनीं हलवून दूर सुरक्षित ठिकाणीं नेऊन ठेविला होता, त्यामुळें ब्रिटिशांचे हातीं कांहीं लागलें नाहीं. ब्रिटिफ फौज कंकॉर्ड येथील दारूगोळ्याचा सांठा तपासून पहात असतां एकदम वसाहतवाल्यांचें सैन्य तिच्यावर चालून गेलें. दोन ब्रिटिश

शिपाई या झटापटींत पडले व बाक व लेक्झिंगटनचे मार्गे परत बॉस्टनकडे पळून गेले या लढाईत नॉर्थब्रिज हे ठिकाण वसाहतवाल्यांनीं ताब्यांत घेतलें बंदुकांचे बार ऐकूं येतांच सर्वच दिशांनी वसाहतवाल्यांचे सैन्य येऊं लागले, सुमारे सहा मैल रस्त्यावर शत्रूंस पळून जातां जातां पुरेवाट झाली व त्यांत त्याचे सुमारें दानशें त्र्याहत्तर शिपाई गारद झाले. वसाहतवाल्यांचे सुमारे पन्नास लोक मेले व चौतीस जखमी झाल कॅकॉर्डचे लढाईत मिळालेल्या विजयाची बातमी चोहीकडे हां हा ह्मणता पसरली व त्यामुळे वसाहतवाल्यास मोठें स्फुरण चढले. सर्व देशभर युद्धाचे वारे दुमदूमून राहिले तरुण मंडळी स्वतःचे खर्चाने स्वयंसेवक बनून बॉस्टन येथे सैन्यास मिळूं लागली. येणेप्रमाणे सुमारे वीस हजार स्वयंसैनिक लढाई करण्याकरितां तयार झाले. बॉस्टन शहराभोवती खंदक खणून वसाहतवाल्यांनीं तात्पुरता किल्ला तयार केला. सेनापति गेज व त्याचे शिपाई यास समुद्रांत हाकून देण्याचा वसाहतवाल्यानी आपला निश्चय बोलून दाखविला. न्यू हॅमशायरहून कॅपटन जॉन स्टार्क हा आपले सैन्य घेऊन आला इस्रायल पटनाम् हा तर अवध्या अठरा तासात शंभर मैल अंतर तोडून लढाईस येऊन मिळाला होता. ऱ्होड आयलंडहून कर्नल नॅथानल ग्रीन व न्यू हॅवनहून बेनेडिक्ट आर्नोल्ड आपआपल्या सैन्यासह येऊन दाखल झाले.

टिकॉंडेरोगावर हल्ला.— व्हेर मॉट येथील ईथॅन आलन नावाचा योद्धा टिकोंडेरोगा नांवाच्या ब्रिटिश किल्ल्यावर अवध्या पावणे तीनशे वसाहतवाल्या शिपायांनिशी चाल करून गेला तो टिकोंडेरोगा किल्ल्याचे समोर असलेल्या लेक जॉर्ज सरोवराचे काठी येऊन पोचला. दुसऱ्या दिवशी अवघ्या त्र्यायशी लोकांसह त्याने ते सरोवर ओलांडून किल्ल्यावर हल्लों केला व मोठ्या शिताफीने तो ताब्यांत घेतला व तेथील सर्व पलटणी निशस्त्र करून कैद केल्या. अचानक हल्ला आल्यामुळे किल्ल्यावरील मोठमोठ्या पलटणी सुद्धां भेदरून जाऊन वसाहतवाल्यांचे स्वाधीन झाल्या. या धाडशी प्रयत्नांत वसाहतवाल्यांस अजब यश आलें, व किल्ल्यांतील सर्व सामुग्री व दारूगोळ्याचा मोठा सांठा हातीं आल्यामुळें त्यांना पुढील कार्यक्रमांत मोठी मदत झाली. पुढें दोन दिवसांनीं याच सैन्यानें क्राऊन

पॉइंट नांवाचें नाकें हस्तगत केलें, त्यामुळें लेक जार्ज येथील ब्रिटिश सत्ता पूर्णपणें नष्ट झाली.

या अपयशानें चिडून जाऊन ग्रेट ब्रिटननें जनरल हॉव, क्लिन्टन व बर्गाइन या अधिकाऱ्यांचे हातांखालीं आणखी दहा हजार सैन्य बॉस्टन येथें पाठविलें. जनरल गेज आतां मोठी स्वारी करून आसपासचा मुलुख, गावें, शेते, घरें वगैरे जाळून बेचिराख करून टाकणार आहे अशी सर्वत्र अफवा उठली. या अफवेचा आधार घेऊन वसाहतवाल्यांचें सैन्य जय्यत तयारी करून बंकरहिल येथें शत्रूंची वाट पहात दबा धरून बसलें. वसाहत-वाल्यांच्या सैन्याचे आधिपत्य कर्नल विल्यम प्रेस कॉट याजकडे होते व त्याचे हाताखालीं बाराशे सैन्य होते.

अगदीं रातोरात अमेरिकन लोकांनीं इतकें सैन्य जमा करून लढा-ईची तयारी केलेली पाहून ब्रिटिश सेनापति कॅपटन गेज चकितच झाला त्याने जनरल हॉव यास वसाहती सैन्यावर चाल करून जाण्यास सांगितलें. ब्रिटिश सैन्य अगदी जवळ येऊन ठेपेपर्यंत वसाहतवाल्यांनी एकही गोळी सोडली नाहीं पण ते आटोक्यांत येतांच बंदुकीचा असा विलक्षण मारा केला कीं, हॉवच्या सैन्यास मागें परतावें लागलें. शत्रूच्या माऱ्याच्या किंचित् पलीकडे जाऊन हॉवने आपल्या सैन्याची पुन्हां जुळवाजवळ केली व मोठ्या निश्चयानें परत हल्ला केला. पण या हल्ल्यांतही ब्रिटिशांस यश मिळाले नाही. वसाहतवाले अचूक नेम मारीत व असा जोराचा मारा करीत कीं, ब्रिटिश सैन्याची दाणादाण उडे व त्यास पळण्याशिवाय दुसरा मार्गच रहात नसे. वसाहतवाल्यांजवळ दारूगोळा व अन्नसामुग्री फारच बेताची होती. तिसरा हल्ला ब्रिटिशांकडून झाला, त्यावेळीं त्यांच्याजवळ गोळ्या शिल्लक नव्हत्या. त्यांनीं दगड फेंकण्यास सुरुवात केली व बंदुकीच्या दस्त्या-नेंच ठोकाठोकी सुरू केली पण त्यास मागें परतावें लागलें. या लढाईत ब्रिटिशांचे दहाशेंचोपन शिपाई निकामी झाले व वसाहतवाल्यांचे चारशेंवीस लोक निकामी झाले. अशा तऱ्हेनें स्वातंत्र्ययुद्धाची पहिली निक-राची लढाई झाली. या लढाईत जरी वसाहतवाल्यांना पूर्ण यश आलें नाहीं

तरी तीमुळें त्यांचें धैर्य न खचतां उलट वृद्धिंगत झालें. खेड्यातून आलेलें, स्वत:घोड्यावरून व कसातरी पोषाक करून लढणारें हे वसाहती सैन्य पूर्ण शिस्तीच्या व्यवस्थित पोषाखाच्या ब्रिटिश सैन्याबरोबर उत्तम तऱ्हेनें लढूं शकतें ही गोष्ट आतांपर्यंतच्या लढायात उत्तमपणे दिसून आली होती. या घनघोर युद्धाची बातमी, वसाहतींतून ताबडतोब जाऊन पोहोंचली. प्रत्येक ठिकाणी विलक्षण उत्साह दिसून येई. जिकडे पहावें तिकडे स्वातंत्र्याची भाषा ऐकूं येई व लोक विलक्षण स्वार्थत्याग करण्यासाठीं उत्सुक आहेत असें आढळून येई.

ज्या दिवशीं टिकोंडेरोगा येथील किल्ला सर झाला त्याच दिवशीं फिलाडेलफिया येथें कलोनियल कॉंग्रेस भरली होती. वॉशिंगटन, जॉन ॲडॅम्स, सम्युअल ॲडॅम्स, बेंजामिन फ्रॅंकलिन्, पॅट्रिक हेन्री व जेफरसन हे सर्व देशभक्त त्या कांग्रेसला हजर होते. हे सर्व निरनिराळ्या पक्षाचे होते, पण शौर्यांत कोणी कोणास हार जाण्यासारखे नव्हते. त्यांनीं एकमतानें इंग्लंडच्या राजास एक खलिता पाठविला. त्यांत म्हटलें होते की, 'अमेरिकन वसाहतींना अन्याय, लूट व अपमान या तिहींचा प्रतिकार करण्याकरितां केवळ निरुपायानें लढावें लागत आहे. गुलामगिरीपेक्षां वसाहतवाले लढाईत मृत्यु आला तरी आनंदानें सहन करितील ! '

या कांग्रेसचे सुरुवातीस भाषण करितांना जॉन ॲडॅम्स म्हणाला की, 'सध्यांचे परिस्थितीकडे लक्ष देतां सर्व अमेरिकन सैन्यास एक सेनापति ताबडतोब नेमणें प्राप्त आहे व याकामीं ज्याला शिपाईगिरीचा चांगला अनुभव आहे अशा गृहस्थाची म्हणजे जॉर्ज वाशिंगटन याची नेमणूक त्या जागीं करण्यांत यावी.' येवढी मोठी मानाची जागा मिळाल्याबरोबर जॉर्ज वाशिंगटन याचें हृदय विनयानें सद्‌गदित झालें.

बंकरहिलचे लढाईचे अगोदर फक्त दोनच दिवस कॉंग्रेसनें जॉर्ज वाशिंगटन याचे नेमणुकीस मान्यता दिलेली होती. यावेळीं त्याचे वय फक्त त्रेचाळीस वर्षांचें होते. शूर योद्धा, निःस्सीम देशभक्त व हुशार राजकारणी अशी त्याची अगोदरच ख्याती झाली होती. त्याचा जन्म

व्हर्जीनियांत झाला होता. वयाचे अकरावे वर्षापासून आपल्या मातेचे पोषणाची जबाबदारी त्याच्यावर येऊन पडली होती. त्याला शाळेतील साधारण शिक्षण मिळाले होतें कॉलेजचें शिक्षण त्याला लाभले नव्हते. सर्व्हेचे त्याने खास शिक्षण घेतले होतें व त्या विषयाचा त्याला फार नादही होता. वयाच्या सोळाव्या वर्षीच त्याच्या चुलत्याने साऊथ पोटोमॅक नदीचे खोऱ्यातलि जमिनीची मोजणी करण्यास पाठविले होते ओहाओ कंपनीत लष्करी नोकरीत असतांना, ब्रॅडॉकचे सैन्याची धूळधाण होत असताना, त्यानें त्याचा बचाव करून ते शिस्तीने मागे परतून घेतले, त्यामुळे त्याचा लौकिक झाला होता.

कमांडर इन् चीफचा हुद्दा मिळताच मोठ्या तानडीनें त्याने केंब्रिज् येथील सैन्याचे आधिपत्य स्वीकारले. त्यापुढे स्वातंत्र्याचे लढाईचा शेवट होऊन वसाहतवाले विजयी झाले तोंपर्यंत एकंदर वसाहती सैन्याची जबाबदारी जॉर्ज वाशिंग्टनकडे होती

अगदीं कॉंग्रेसच्या सुरुवातीस कांग्रेसने वीस हजार खडे सैन्य ठेवण्याचा ठराव केला. पण या सैन्याचे खर्चाची तरतूद काय करावयाची हा मोठा प्रश्न येऊन पडला. सहकारी तत्त्वावरील वसाहतींचे राज्याचे कल्पनेतील मुख्य अडचण तिला आता जाणवूं लागली. प्रत्येक वसाहत आपआपल्यापुरता वसूल करी, जकाती बसवी, व एकंदर राज्यकारभार करी पण आतांपर्यंत लढाई करावयाची झाली तर काय व्यवस्था करावी हा प्रश्नच कॉंग्रेसपुढें आला नव्हता. ह्या मुख्य प्रश्नाची तरतूद झालेली नसल्यामुळे वरचेवर वसाहतींचे राज्य व सैन्याचे अधिकारी यामध्ये कटकटी उत्पन्न होत.

सैन्याचें आधिपत्य स्वीकारतांच वाशिंगटनचे हातांखालीं चौदा हजार वसाहती सैन्य जमा झाले. त्याला कवाईत व शिस्त या दोन्हींचीही ओळख नव्हती, इतकेच नव्हे तर शिस्तींत वागण्याची इच्छा पण त्याचे ठिकाणीं दिसून येईना. दारूगोळा व लढाऊ सामानाचीही तरतूद भरपूर नव्हती.



स्वातंत्र्यसंस्थापक जॉर्ज वॉशिंगटन.

पान १४४.

वाशिंगटननें या सैन्याचे तीन भाग पाडले. एक भाग आर्टीमस वार्ड याचे ताब्यांत देऊन त्याला रॉक्सबरी येथें स्थाइक केले. दुसरा भाग चार्लस ली याचे ताब्यात देऊन त्याला प्रॉसपेक्ट हिल येथे ठेविलें. तिसरा भाग स्वतःचे हातांखाली घेऊन तो केम्ब्रिज येथे राहिला. बंकर हिलचे लढाईनंतर ब्रिटिशांनीं बॉस्टन शहरचा ताबा घेण्याचा प्रयत्न केला पण वसाहतवाले एक हातभरही मागे हटेनात व ब्रिटिश सेनापतीची खात्री होऊन चुकली की, उघड्या लढाइत जय मिळणें कठीण आहे.

जिकडे तिकडे हा वेळपावेतो ब्रिटिश सत्ता लोकांनी झुगारून दिली होती व म्हणण्यासारखा अडथळाही वसाहतवाल्यास या कामी केला नाहीं. व्हर्जीनिया-गव्हर्नरानें मात्र एक युक्ति काढली. त्यानें गुलाम होते त्या सर्वांस स्वातंत्र्य देण्याचे कबूल केले व ब्रिटिशांशी राजनिष्ठ असलेल्या लोकांचा संघ निर्माण करून वसाहतवाल्यात फूट उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला, पण या कामीं त्याला यश आले नाहीं.

वसाहतवाल्याना कानडा आपल्याशीं सहकार्य करून ब्रिटिश सत्ता झुगारून देण्याचे कामीं मदत करील म्हणून मोठी आशा होती पण ती अगदी फोल ठरली. जनरल शूलर व मॉटगॉमरी या वसाहती-ऑफिसरांस सेटजॉन्स व मॉटरीयाल हे किल्ले घेण्यासाठी पाठविण्यांत आलें होतें. जनरल मॉटगॉमरीनें ब्रिटिश फलटणीपासून सेट जॉन्सचा किल्ला हस्त-गत केला, व थोडे दिवसात मॉटरीयालचाही किल्ला हस्त-गत झाला. त्यानंतर जनरल मॉटगॉमरीने क्विबेकवर अवघ्या तीनशें शिपा-यांनिशी हल्ला केला. केंब्रिज येथील सैन्यापैकी एक हजार लोक बरोबर घेऊन त्याच वेळी कर्नल आर्नोल्डही क्विबेकवर चाल करून येत होता.

क्विबेकला गाठीपर्यंत कर्नल आर्नोल्डचे फारच हाल झाले होते. आर्नो-ल्डचे व मॉटगॉमरीचे मिळून अवघे नऊशें शिपाईच काय ते लढण्यासारखे उरले होते. त्या दोघांनी मिळून क्विबेकवर निकराचा हल्ला केला पण शत्रू-च्या जय्यत तयारीपुढें त्यांचे कांही चालले नाही. त्यांनी वीस दिवसपर्यंत

वेढा कायम ठेविला पण क्विबेक किल्ला अतिशय दुर्गम असल्यामुळें व आयत्या-वेळीं मॉटगॉमरीस गोळी लागल्यामुळें त्यांना मागें हटणें भाग पडलें. मॉंट-गामरीचे मृत्यूनें हतबल झालेले सैन्य मागे हटलें तोच आर्नोल्ड यासही भयंकर जखम झाली व पुढे त्या सैन्यांत देवीची सांथ पसरली व सर्वेच लोकांचा पराभव होऊन मागें हटावें लागलें. या स्वारीनें कानडा कायमचा ब्रिटश राज्यास मिळाला व पुढें वसाहतीवर हल्ले कर-ण्यास तें एक सुरक्षित ठिकाण ब्रिटिश सैन्यास आयतें उपयोगीं पडले.

कांग्रेसने जॉर्ज बादशहांस लिहिलेल्या खलित्याचे उत्तर आतांपर्यंत आलें होतें. वसाहतवाल्यांचा युद्धांत पाडाव करून त्यांना जेरीस आणून कायमचे नमवून टाकण्याशिवाय गत्यंतर नाही असे पार्लमेंटने ठरविलें. पण या आत्मघातकी विचाराने अमेरिकन स्वातंत्र्याचा दिवस किंचित् लवकर उगवला असें ह्मणण्यास हरकत नाहीं बंकरहिलचे लढाईनंतर जन-रल गेज याचे जागी जनरल हॉव हा सेनापति झाला, व त्यानें बॉस्टन येथें तळ दिला. सबंध हिवाळाभर वॉशिंगटन बॉस्टन शहरास वेढा देऊन बसला होता. उन्हाळ्याचे तोंडास वॉशिंगटनचे मनांत बॉस्टनवर प्रत्यक्ष हल्ला करावयाचें आले होते, पण इतरांस ही कल्पना पटली नाही. ते ह्मणाले, ' डॉरचेस्टर हाइटस् ही मान्याची जागा काबीज करून आपण बसावे ह्मणजे तेथून वाटेल तेव्हा बॉस्टनवर हल्ला करून ब्रिटिश सैन्यास हांकून देतां येईल ! ' त्याप्रमाणें वसाहती सैन्यानें डॉरचेस्टर हाइट्स् ही जागा ताब्यांत घेतली व तेथें तळ दिला. आतांपर्यंत अमेरिकन सैन्य कां पलीकडे सर-कत आहे याची दादसुद्धां जनरल हॉव यास नव्हती पण दिवस उजाड-तांच जेव्हां वसाहतवाल्यांनीं जोराचा मारा केला तेव्हां डॉरचेस्टर हाइट्स् ताब्यांत घेणें किंवा पळून जाणें याखेरीज त्यास दुसरें गत्यंतर नव्हतें. त्यानें अडीच हजार सैन्यास डॉरचस्टर हाइटस्वर हल्ला करण्यास फरमावलें. वाशिंग्टन ब्रिटिश सैन्याच्या हालचाली नीट पहात होता. त्याच दिवशीं गतवर्षी झालेल्या बॉस्टन येथील कत्तलीचा वर्षदिन असल्यामुळें वसाहत सैन्यासही फार स्फुरण चढलें होतें. आतां बंकरहिलप्रमाणेंच जोराचें

युद्ध जुंपणार इतक्यांत मोठें वादळ झालें, व तें सुमारें एक दिवसपर्यंत चालू होतें. दुसरे दिवशीं सकाळपर्यंत वसाहतवाल्यांनीं आपल्या सैन्याची अधिक मागणी केली, त्यामुळें जनरल हॉव यास लढणेंच शक्य झालें नाहीं व त्याला पळ काढावा लागला. अशा रीतीनें न्यू इंग्लंडची राजधानी ब्रिटिशांचे हातून कायमची सुटली.

जें ठिकाण आपल्या ताब्यांत ठेवतां येणें शक्य नाहीं त्याची निदान जातां जातां जाळपोळ तरी करतां येते. वॉशिंगटननें, ब्रिटिश जनरलशीं पत्रव्यवहार करून बॉस्टन शहराचा जाळपोळीपासून बचाव केला. व उलट पळून जात असतां ब्रिटिश सैन्यास त्रासही दिला नाहीं. तारीख सतरा मार्च १७७६ रोजीं सर्व ब्रिटिश लष्कर जहाजावर चढून बॉस्टनहून निघून गेलें व त्याच्याबरोबर ब्रिटिश लोकांस फितलेल्या सुमारें पंधराशें वसाहतवाल्यांनाही पळून जावें लागलें. ता २० मार्च रोजी विजयी वॉशि-गटगने मोठ्या थाटात बॉस्टन येथें प्रवेश केला. वॉशिंगटनचे विजयाची सर्वत्र फार वाहवा झाली व त्याचे सन्मानार्थ एक मेडल पाडण्यांत आलें.

दुसरीकडे सुरू झालेल्या लढाया—बॉस्टन येथील विजयामुळे न्यू इंग्लंड ब्रिटिशांचे तावडीतून सुटले, पण केवळ न्यू इंग्लंड म्हणजेच काहीं सर्व अमेरिका नव्हे हे जाणण्याची न्यू इंग्लंडचे वसाहतवाल्यानी बुद्धिमत्ता दाखविली नाही. त्याना वाटलें आपण सुटलों, आतां दुसऱ्या वसाहती आपआपल्यापुरते पाहून घेतील. न्यू इंग्लंडच्या बचावाकरितां ज्यांनीं आपले प्राणसुद्धां अर्पण केले असते, अशा उत्कट देशाभिमानी लोकांस सुद्धां इतर वसाहतींचे बचावाकरितां धावून जाणे किती अगत्याचे आहे ह्याची नीटशी कल्पना नव्हती. या गोष्टीची जाणीव वॉशिंगटन ज्यावेळीं बॉस्टन येथील सैन्य हलवून न्यू यॉर्कचे बचावाकरितां तिकडे वळला त्यावेळीं वाशिंगटनला होऊन चुकली. जरी बॉस्टनचा बचाव झाला तरी शत्रूचा मोर्चा न्यू यॉर्ककडे वळल्यानें न्यू यॉर्कवर मोठी आपात्ति आली होती व ती टाळण्याकरितां जनरल ली यास वाशिंगटननें कनेक्टिकट येथील लढाऊ तुकडीबरोबर पाठविलें होतें. सर हेनरी क्लिंटन न्यू यॉर्कवर मारा करणार त्याच बेतास जनरल ली न्यू यॉर्क येथें पोहोंचला. न्यू यॉर्क येथील नागरि-

कानी स्वयंसेवकांचे पथक अगोदरच उभारले होतें, इतक्यांत त्यांना जनरल लीची कुमक येऊन पोहोंचली. ब्रिटिशांचे तर्फे सर पीटर पार्कर व लॉर्ड कॉर्नवार्लीस हेही अडीच हजार सैन्यानिशीं ब्रिटिश फौजेस मिळाले. त्यांनी चार्लसटनवर हल्ला केला व तो किल्ला सर करण्याचे ठरविलें. पण कॅरोलिनांतील सैन्यही तसेच चिवट होतें, तें लवकर हार जाण्याचे लक्षण दिसेना. ब्रिटिश जहाजांनीं समुद्राचे मार्गानेही हल्ला करून पाहिला पण त्यांचा टिकाव लागला नाहीं. चार्लसटनचा बचाव उत्तम झाला, ब्रिटिशांचे दोनशे शिपाई पडले व वसाहतवाल्यांचे फक्त बत्तीसच लोक पडले. ब्रिटिश सैन्य चार्लसटन सोडून न्यू यॉर्कचे दिशेनें चाल करूं लागले.

ब्रिटिश लोकांचा आतां सर्व मारा न्यू यॉर्कवर होणार हे ठरूनच गेल्यासारखे होते. वॉशिंगटनचे सैन्यात जरी आतांपर्यंत सुमारे सत्तावीस हजार लोक जमले होते तरी खरोखर उपयोगी सैन्य त्याच्यापाशी बारा तेरा हजारांपेक्षां अधिक नव्हतें. शिवाय सैन्यापाशीं भरपूर दारूगोळा नव्हता, शिधासामुग्री नव्हती व शिस्त वगैरेही उत्तम नव्हती. सर्वच बाजारबुणगे व स्वयंसेवक सैन्य, तें कधी हुकूम मानी तर कधीं अडून बसे. अशा विविध अडचणींतून वॉशिंगटन यास आपला मार्ग आखावयाचा होता, उलटपक्षी ब्रिटिश लोकांपाशीं पैसा, दारूगोळा व शिधासामुग्री भरपूर होती. त्यांचें सैन्य कवाइती होतें व त्यांच्यांत शिस्तही वाखाणण्यासारखी होती।

एका लहानशा जर्मन संस्थानांतून ब्रिटनने सतरा हजार लढाऊ सैन्य पगारी ठेवून घेतलें होते, ते अमेरिकेत रवाना करण्यांत आले. परकी शिपाई वसाहतवाल्यांवर घालून त्यांचा पराभव करून वसाहतवाल्यांची पुरी धूळधाण उडविण्याचा तिसऱ्या जॉर्जचा निश्चयच झाला होता. त्या-शिवाय पंचवीस हजार ब्रिटिश सैन्य जय्यत तयार करून अमेरिकेंत पाठ-विण्यांत आलें होतें व खर्चाचे कामीं दहा लक्ष डॉलरची स्पेशल मंजुरी देण्यांत आली होती.

# समेटाची आशा नष्ट होत चालली

आतांपर्यंत ज्या चकमकी झाल्या त्यांवरून लवकरच सलोखा होईल व इंग्रज लोकांबरोबर तडजोड होईल असे मानण्यास जागा होती. कोणीही पूर्ण स्वातंत्र्याची कल्पना मनांत आणीत नसे पण दिवसेंदिवस याही कल्पनेंत फेरबदल होऊं लागला. अमेरिकन लोकांचा राग राजा व प्रधानमंडळ याजवरच जास्त होता. ब्रिटिश राज्यसंस्थेबद्दल त्यांना तितकासा तिटकारा वाटत नव्हता. खुद्द वॉशिंगटन याम सुद्धां इ. स. १७७६ पर्यंत मुख्य राष्ट्राशीं वसहतींनीं तुटून राज्यकारभार करणे चमत्कारिक वाटत होते. परंतु युद्धात जसजसा वसाहतवाल्यांचा अधिकाधिक नाश व नुकसान होऊं लागले तसतसा ब्रिटिश राजसत्तेविषयीचा जिव्हाळा कमी होऊं लागला व पूर्ण स्वातंत्र्याची तहान वसाहतवाल्याना लागूं लागली. अजूनही कांही जुनी खोडे होती, त्याच्या अंगावर पूर्ण स्वातंत्र्य ह्मणताच कांटा उभा राही. आतापर्यंत ज्या प्रमुख लोकांस राजनिष्ठ ह्मणवून घ्यावे असें वाटत होते त्यांना सुद्धां स्वातंत्र्याची कल्पना अधिकाधिक रुचूं लागली. दिवसेंदिवस सलोखा होण्याची आशाही कमी होऊं लागली होती. लोकांनी असेंब्लीज्‌ना स्वातंत्र्य जाहीर करण्याबद्दल तगादा लावला; व असेंब्लीज्‌नीं कॉंग्रेसकडेही हेंच मागणे मागितले.

कॉंग्रेसने प्रथम प्रत्येक वसाहतीला जी राज्यपद्धति स्वातंत्र्य व सुरक्षितता यांशीं सुसंबद्ध अशी असेल ती चालूं करण्यास परवानगी दिली व स्वतंत्रपणे कांग्रेसने लोकमत अजमावण्याचे काम चालूं ठेवले.

इ. स १७७६ चे जून महिन्याचे सातवे तारखेस रिचर्ड हेनरी ली या व्हर्जीनियातर्फेच्या सभासदाने कॉंग्रेसपुढे स्वातंत्र्याचा ठराव आणला, त्यावर पुष्कळ वादविवाद झाला, व स्वातंत्र्यवादी पक्षाचें बहुमत झाले. पुढें चार दिवसांनीं ता. ११ जून रोजीं, थॉमस जेफरसन, जॉन ॲडाम्स, बेंजामिन फ्रॅंकलिन्, रॉजर शेरमान् व राबर्ट लिव्हिंगस्टोन यांची कमिटी नेमली गेली व तिनें रीतसर स्वातंत्र्याचे जाहीरनाम्याचा मसुदा करावा असें ठरलें. त्याप्रमाणें पहिल्या जुलैस या कमिटीनें आपला रिपोर्ट प्रसिद्ध केला. दुसऱ्या तारखेस रिचर्ड हेनरी ली याचा ठराव जशाचा तसा मंजूर

झाला, व पुढें दोन दिवस आणखी स्वातंत्र्याच्या ठरावावर वादविवाद होऊन तारीख चार जुलै १७७६ रोजी दुपारीं २ वाजतां कॉंग्रेसनें स्वातंत्र्याचा ठराव जगजाहीर केला, जुलै महिन्याचे चवथे तारखेस अमेरिकेंत मोठा उत्सव होतो व त्या दिवसास ' स्वातंत्र्यदिन ' असे ह्मणतात.

या स्वातंत्र्यदिनाच्या उत्सवानें दाही दिशा दणाणून गेल्या होत्या. फिलाडेलफिया येथील नागरिकांनीं ताबडतोब ब्रिटीश निशाण खालीं पाडलें व रस्त्यांत जाळून टाकिलें. विल्यम्स्बर्ग, चार्लेस्टन व सेव्हाना येथे मोठमोठ्या जयप्रदर्शक होळ्या पेटाविण्यांत आल्या व लोक या होळ्यांसमोर जमून, भाषणें करूं लागले व नागरिकांना उत्साह वाटेल अशी आश्वासने देऊं लागले. बॉस्टन येथील नगर मंदिरांत हा स्वातंत्र्याचा जाहीरनामा वाचून दाखविण्यांत आला. न्यू यॉर्क येथील तिसऱ्या जॉर्ज बादशहांचा पुतळा खालीं पाडण्यांत आला व त्याच्यावर बंदुकीच्या गोळ्या झाडण्यांत आल्या. वॉशिंगटननें वसाहती सैन्याच्या प्रत्येक तुकडीस स्वातंत्र्याचा जाहीरनामा वाचून दाखविण्याबद्दल फर्माविलें होतें.

स्वातंत्र्याचे जाहीरनाम्याचा मतितार्थः— ह्या नवीन जाहीरनाम्यांत काय काय सांगितले होतें तें पाहूं. ( १ ) प्रत्येक मनुष्याचे हक्क समान आहेत. ( २ ) प्रत्येक मनुष्यास जीवित सुरक्षित राखण्याचे, स्वातंत्र्याचे, आणि आपल्या सोईस येईल तो धंदा करून राहण्याचे मूलभूत हक्क आहेत. ( ३ ) मानवी राज्यव्यवस्था राजपुत्र किंवा राजे यांचे सुखसोई-करितां जन्मास आली नसून तिचा उद्देश फक्त लोकांचें कल्याण करणें येवढाच आहे. ( ४ ) ज्यावेळीं एकादी राज्यव्यवस्था स्वातंत्र्याचे आड येते, त्यावेळी त्या राजव्यवस्थेंत फेरफार करण्याचा किंवा ती अजिबात नष्ट करण्याचा अधिकार लोकांस आहे. ( ५ ) जॉर्ज बादशहा ( तिसरे ) यांनीं लोकांच्या स्वातंत्र्याचा घात केला व त्यामुळें ते प्रजेच्या रोषास पात्र आहेत. ( ६ ) इंग्लंडचे राजे व त्यांचें प्रधानमंडळ यांनीं चालविलेली जबरदस्ती शेंकडों उदाहरणांनीं सिद्ध करितां येण्यासारखी आहे. ( ७ ) वरचेवर वसाहतींनीं आपणावर होत असलेल्या जुलुमाबद्दल दाद मागितली



स्वातंत्र्याच्या जाहिरनाम्याचा ठराव कॉंग्रेसनें पास केला.

पान १५०.

आहे. ( ८ ) या सर्व मागण्या तुच्छता व तिरस्कार दाखवून फेटाळल्या गेल्या आहेत. ( ९ ) गुलामगिरींत खितपत पडण्याचें नाकारून आम्हांस तरवारीस घात घालणें भाग पडत आहे. ( १० ) म्हणून स्वातंत्र्य जाहीर करण्याचा आम्हांस पूर्ण अधिकार आहे व तो तसा असला पाहिजे. या आमच्या जाहीरनाम्याची अब्रु राखण्याकरितां कॉंग्रेसचा प्रत्येक सभासद जरूर पडल्यास आपले जीवित, मालमत्ता व यश याची आहुति द्यावयास तयार आहे.

कॉंग्रेसने स्वातंत्र्याचा जाहीरनामा काढण्यापूर्वींच लोकांच्या मनांची पाहिजे तितकी तयारी झाली होती व कांहीं ठराव त्यांनीं अमलांतच आणावयास सुरुवात केली होती. ब्रिटिश सत्तेचा जुलूम व निष्ठुरता यांना कंटाळून त्यांच्या मनांचा पूर्वीच निश्चय कायम झाला होता, व पूर्ण स्वातंत्र्याच्या उपभोगाकरितां सर्वच नागरिकांचीं मनें स्वातंत्र्योत्सुक झाल्यास नवल कसचे ? विशेषतः थॉमस पेन याचें (Commonsence) ( व्यवहारज्ञान ) नांवाचे चोपडे वाचून वाचकांचीं डोकीं भडकून गेलीं होतीं व राजसत्तेचा केव्हां नायनाट करूं असें त्यांस होऊन गेलें होतें. स्वातंत्र्याचा जाहीरनामा बाहेर पडताच प्रत्येक नागरिकास, ह्मणजे युनायटेड स्टेट्स् ऑफ अमेरिकेचे प्रजाजनास, मायदेशासाठीं प्राण, धन, किंवा यश अर्पण करण्याचा मोह झाला असल्यास आश्चर्य नाहीं.

आतां पहिला प्रश्न ह्मणजे एका मोठ्या राष्ट्राशीं लढाई करून स्वतंत्र राष्ट्रांच्या यादींत आपली जागा पटकावावयाची. प्रश्न कांहीं लहान सहान नव्हता. एका बलाढ्य राष्ट्राशीं प्रसंग पडला होता. जुलै महिन्याचे आरंभास जनरल हॉव यानें नऊ हजार सैन्य स्टॅटन बेटावर जमा केलें होतें. तेथें क्लिंटन व कॉर्नवालीस हे चार्लस्टनहून नुकतेच मार खाऊन आलेले त्यास मिळाले. जनरल हॉवचा भाऊ अडमिरल हॉव हाही इंग्लंडहून नुकताच येऊन दाखल झाला होता. त्यामुळें न्यू यॉर्क शहराचे आसपास सुमारें तीस हजार ब्रिटिश फौज जमा झाली होती. यापैकीं निम्म्याहून अधिक, फ्रेडरिक दि ग्रेटकडून भाडोत्री घेतलेलें जर्मन सैन्य होतें. बॉस्टिंग-

टनच्या सैन्याची या सैन्यावर कोणत्याही बाबतींत वरचढ होण्यासारखी नव्हती. एकतर संख्येंत तें फार कमी होते. त्यांना कवाइती शिक्षण किंवा शिस्तही वाखाणण्यासारखी नव्हती. अन्नपाण्याचा सांठा किंवा दारू-गोळाही बेताचाच जवळ होता, व लढाईचा अनुभव फारच थोड्यास होता.

स्वातंत्र्याचा जाहीरनामा बाहेर पडताच, इंग्रज लोकांस फार अचंबा वाटला. आतापर्यंत ब्रिटिश राज्यकर्त्यांचा अशी समजूत होती की, कांहीं आडदांड, आपमतलबी व निर्धन चळवळ्ये लोक मात्र नसती गडबड माजवीत आहेत, त्याना सहज चिरडून टाकता येईल व नंतर मोठमोठ्या शिक्षा फरमावता येतील पण आता पहावे तो सर्व राष्ट्रच उलटलेलें दिसले, व तेही बोंटल तो स्वार्थत्याग करावयास तयार झालेले पाहताच प्रधान मंडळाचें धाबे दणाणल्यास आश्चर्य कसलें ? युरोपांतील प्रत्येक देशांतील राज्य-कर्त्यांस व लोकांमही या स्वातंत्र्याचे ठरावाने चकित करून सोडले युरोपियन इतिहासांत याच्यासारखे दुसरे उदाहरण काठ पडलेले नव्हते. या अचानक गोष्टीने युरोप खडबडून जागे झाले व इंग्लंडचे मुत्सद्यास कांहा तडजोडीचा मार्ग निघतो की काय हे पाहण्याची किंचित् उशीराच कां होईना पण बुद्धि सुचली.

अमेरिकन लोकाशीं काही तडजोड करता आल्यास पहावी असे प्रधानमंडळाने ठरविले, पण अमेरिकन लोक तडजोडीस तयार होतील कीं नाही याबद्दल प्रधानमंडळास शंका होती. लॉर्ड हॉव व त्याचा भाऊ ॲडमिरल हॉव हे बेंजामिन फ्रँकलिन् इंग्लंडमध्ये असतांना त्याचे स्नेही झाले होते, त्यांनीं बेंजामिन फ्रॅंकलिन यास ब्रिटिश सरकार व अमेरिकन लोक यांचेमध्यें मध्यस्थी करण्याबद्दल विनाविलें. आता काल फिरल्यामुळे हॉव बंधू आपल्या देशातर्फे अमेरिकन लोकांशी तडजोडीची भाषा बोलण्यास एका पायावर तयार झाले होते. बेंजामिन फ्रॅंकलिनूवर आपलें वजन आहे अशा कल्पनेनें हॉव बंधू मनांत मांडे खात होते पण बेंजामिन फ्रॅंकलिन याचेकडून नम्र भाषेंतच पण सडेतोड उत्तर आलेलें पाहून त्यांची मति कुंठित झाली. आपण याउप्पर आमचे शत्रू आहांत असा फ्रँकलिनचे पत्राचा मतितार्थ होता.

त्यानंतर लॉर्ड हॉवनें जॉर्ज वाशिंगटन यास पत्र लिहिलें. त्या पत्रावर जॉर्ज वाशिंगटन याचे नांवावर त्याचा हुद्दा कमांडर इन् चीफ असा लिहिला नव्हता ह्मणून त्याने ते पत्र न स्वीकारतां परत केले. दुसऱ्या पत्रावर जॉर्ज वाशिंगटन इ. इ. इ. असा पत्ता लिहिला होता. इत्यादि इत्यादि शब्दाचा अर्थ कमांडर इन् चीफ असाही होऊं शकेल असें पत्र घेऊन आलेला जासूद ह्मणाला. पण तेंहा पत्र स्वीकारण्यांत आलें नाहीं. तुमचे सर्व अपराधांस क्षमा करून शांतता स्थापित करण्याचा अधिकार तुह्मास देण्यांत आला आहे असा हॉवकडून निरोप आला, पण आह्मी कसलाही गुन्हा केला नसल्यामुळे आपल्यापासून आह्मी क्षमेची बिलकुल अपेक्षा करीत नाहीं असा वाशिंगटनकडून रोखठोक जबाब मिळाला.

लॉंग आयलंड येथील लढाई—सामोपचाराच्या भाषेस अर्थात् वसाहतवाल्यांनी दाद दिली नाही त्याबरोबर लॉर्ड हॉव व ॲडमिरल हॉव या दोघांनी युद्धाची तयारी आरंभिली. तारीख २२ ऑगस्टला दहा हजार सैनिकांनिशीं ब्रिटिश लोकांनी लॉंग आयलंडवर प्रवेश केला. त्यावेळीं ब्रुकलिन बेटाजवळ सुमारे सात आठ हजार अमेरिकन सैन्य जमा झाले होते व तेथेंच लढाई जुंपली पण या लढाईचा काहीं एक निकाल लागला नाही. दोन्ही पक्षांकडे बरेंच नुकसान झालें पण काहीएक निकाल लागेना. अमेरिकन सैन्याची डावी बाजू जनरल पटनेम याजकडे होती. त्यानें कांहीं ठरीव ठिकाणची नाकेबंदी करावयाची ती केली नव्हती, त्यामुळें तेथून शत्रूस यावयास मार्ग मिळाला व त्याने त्याला घेरलें. या लढाईत अमेरिकन लोकांचे तीन सेनापती कैद झाले, व सुमारें एक हजार सैन्य निकामी झाले. वॉशिंगटनला ज्यावेळीं ही बातमी समजली त्यावेळी त्याची फार निराशा झाली, तो तांतडीनें ब्रुकलिन येथें गेला व स्वतः सैन्याचें आधिपत्य स्विकारून मोठ्या शिकस्तीनें त्यानें माघार घेऊन आपल्य सैन्याचा बचाव केला. त्यानें न्यू यॉर्ककडे परतण्याचें ठरविलें व तसें करणें अत्यंत दुर्घट होतें. सर्व रात्रभर उजाडण्याचे आंत सर्व सैन्य बोटीवर हळू हळू चढवून तो मोठ्या शिताफीनें पसार झाला.

सकाळीं उठून ब्रिटिश सेनापति पहातात तों कांहीं एक हालचाल दिसेना. कांहीं मोडक्या तोडक्या बंदुका हातीं लागल्या तेवढ्या घेऊन ब्रिटिश सैन्यास स्वस्थ बसावें लागलें. अमेरिकन सैन्यानें अगदीं सहज हातांवर तुरी दिल्यामुळें ब्रिटिश सेनापतीस डोके खाजवीत कांहीं काल स्वस्थ बसावें लागले.

लॉग आयलंडवर मार खावा लागल्यामुळे अमेरिकन सैन्याची वाताहत होते कीं काय अशी भीति वाटूं लागली सैन्यापैकीं बरेच लोक निकामी झाले होते ते घरीं गेले. दुसऱ्या कोणाची मुदत संपली होती ते जावयास सिद्ध झाले व नवीन भरती होण्याचें चिन्ह बिलकुल दिसेना. मोठी पंचाईत येऊन पडली पण अशा स्थितींतसुद्धां वॉशिंगटन याने अत्यंत परिश्रम करून सैन्यांत शक्य तितका बंदोबस्त राखण्याचा प्रयत्न केला.

आतांपर्यंत ब्रिटिश सैन्य न्यू यॉर्क शहरापासून अवघ्या तीन मैलावर येऊन ठेपले. वॉशिंगटन याने हारलेम हाइटसपाशीं आपला तळ दिला होता. तारीख पंधरा सप्तंबर रोजीं दोनही पक्षांचे लोक इतके जवळ येऊन भिडले कीं त्यांच्यांत थोडीशी चकमक झडली व त्यांत ब्रिटिश लोकांचे सुमारें शंभर सैनिक दगावले.

पुढें एक महिन्यानें जनरल हॉव यानें वेस्टचेस्टरनजीक आपला तळ दिला. त्याचे मनात वाशिंगटनचे सैन्याचे डावे बाजूवर हल्ला करून, पूर्वेकडील संस्थानांतून त्याला मिळत असलेली मदत बंद पडेल अशा तऱ्हेची जागा अडवून बसावें असें होतें पण हा त्याचा बेत वॉशिंगटनने ओळखला व हारलेम नदीचे कांठीं त्यानें ब्रिटिश फौजेशीं सामना दिला. हॉवनें केलेल्या तोफेचे भडिमारास वसाहतवाल्यांनीं योग्य प्रत्युत्तर दिलें. पुढें वॉशिंगटन यास मागें हटणेंच इष्ट वाटल्यावरून तो नार्थ कॅसलचे टेकाडाकडे वळला व जनरल हॉव हा न्यू यॉर्ककडे परतला.

लवकरच अमेरिकन सैन्य हडसन नदी ओलांडून फोर्टली नांवाचा किल्ला सर करून बसलें. त्याचवेळीं कर्नल मॅगो याचे हाताखालीं तीन हजार सैन्य असून तो फोर्ट वॉशिंगटन येथें दबा धरून बसला होता व जनरल ली चार हजार सैन्यानिशीं नार्थ कॅसल येथें तळ देऊन बसला होता.

यापुढें अमेरिकन सैन्यावर अनेक अरिष्टें कोसळलीं. ता. १६ नोव्हेंबर रोजीं फोर्ट वॉशिंगटन ब्रिटिश सैन्यानें हस्तगत केला. सर्व फौज कैद करून तिला न्यू यॉर्कचे तुरुंगांत डाबून टाकले. पुढें दोन दिवसांत लॉर्ड कार्नवालीस याने फोर्ट ली हा किल्लाही सर केला. आता फक्त वॉशिंगटन-जवळ तीन हजार सैन्यच राहिले होते. त्या सैन्यास घेऊन तो हडसन नदीतून नेवार्कपर्यंत गेला. कॉर्नवॉलिसचे सैन्यानें त्याचा पाठलाग केल्याने त्याला प्रिन्सटनपर्यंत पळून जावे लागले व पुढें डिलावेर नदीतून ट्रेन्टन् येथपर्यंत जावें लागलें. मुख्य सेनापतीच्या अंगीं असलेलें धैर्य व समयसूचकता जर नसती तर तें सर्व सैन्य बेपत्ता झालें असते अगर नाश पावलें असते.

दिसेबर महिन्याचे आठ तारखेस वॉशिंगटन डिलावेर नदीचे पलीकडे पोहोंचला. लार्ड कार्नवाल्लीस याचेजवळ नदी ओलांडण्यासारख्या नावा वगैरे नसल्यामुळे, पुढे हिवाळ्यांत नदी गोठून कठीण होईपर्यंत तो तसाच वाट पहात राहिला. ट्रेटन ही जागा फार महत्वाची होती, तेथें कॉर्नवालीसचे सैन्याने तळ दिला. नदी गोठतांच पलीकडे जाऊन, फिलाडेलफिया शहर काबीज करून तेथें असलेल्या सर्व अमेरिकन सैन्याचा पाडाव करून ब्रिटिश सत्ता पुन्हां स्थापन करण्याचा लॉर्ड कॉर्नवालीसचा विचार नक्की झाला होता. अमेरिकन लोकास या गोष्टीचा आगाऊच अंदाज आल्यामुळे त्यांनीं कॉंग्रेस फिलाडेलाफियाहून बाल्टिमोर येथें नेली.

मध्यंतरी ॲडमिरल पारकर याचे सैन्याने न्यू इंग्लंडचे किनाऱ्यावर भाडिमार केला. ज्या दिवशी वॉशिंगटननें डिलाबेर नदी ओलांडली त्याच दिवशीं ब्रिटिश सैन्याने ऱ्होड बेटावर गोळीबार केला, व ब्लॅकस्टोन नदींत अमेरिकन आरमार अडवून धरिलें. वॉशिंगटननें जनरल ली यास डिलावेर नदीचे पलीकडे आपल्यास येऊन मिळण्यास लिहिलें होतें, पण तो येऊन पोंचला नाहीं. वाटेंत त्याला ब्रिटिश घोडेस्वारांचे फलटणीनें पकडून न्यू यॉर्क येथें नेलें. त्याचे मागें जनरल सुलिव्हान यानें अमेरिकन सैन्य

ताब्यांत घेऊन तो वॉशिंगटन याचे सैन्यास येऊन मिळाला. एकंदर मिळून सुमारें दहा हजार सैन्य वॉशिंगटनजवळ होतें आणि तो प्रसंग तर अत्यंत आणीबाणीचा होता. वॉशिंगटन व त्याचे सैन्य जिवावर उदार होऊन येईल त्या दिव्यांतून पार पडण्यास सिद्ध झाले. वॉशिंगटनचें सैन्य ब्रिटिश सैन्याचे तोंडास तोंड देण्यासारखें नव्हतें, त्यामुळे वसाहतीत एक प्रकारची नैराश्याची छटा पसरत चालली होती. असल्या आणीबाणीच्या प्रसंगांनी वॉशिंगटनच्या चरित्रास उदात्त व उज्ज्वल स्वरूप आणले आहे. असल्या बिकट प्रसंगांतून पार पडणे म्हणजे त्याला नित्याची गोष्ट होऊन बसली होती, व माघार घेणें त्याला जन्मात ठाऊक नव्हते. त्यानें एक नवीनच बेत केला.

ब्रिटिश सैन्य जिकडे तिकडे पसरलेले होतें, युरोपातून भाडोत्री आणलेले सैन्य अस्ताव्यस्तपणें पडलेले असे. ब्रिटिश सैन्यात किंचित बेसावधगिरी उत्पन्न झाली होती, त्याला कारण मागील लढायात त्याला सहजासहजी विजय मिळाला होता व अमेरिकन सैन्याशीं अलीकडे मोठी चकमक झडलीच नव्हती. पोर्ट ट्रेंटन येथील ब्रिटिश छावणीवर वॉशिंगटननें डिलावेर नदी ओलांडून व सर्व अमेरिकन सैन्य एकत्र करून जोराचा मारा करण्याचा बेत केला.

अमेरिकन सैन्याचे तीन भाग पाडण्यात आले. एका भागाकडे ब्रिस्टोल येथें नदी उतरून आसपासचे ब्रिटिश सैन्यावर भडिमार करण्याचे काम सोपविण्यांत आले. दुसऱ्या भागास ट्रेंटनपलीकडे जाऊन तळ देण्यास सांगितलें होतें. हेतु हा की, शत्रूला त्या दिशेने पळून जाण्यास मार्ग सांपडूं नये. वाशिंगटन स्वतः चोवीसशें सैन्य व दोन निवडक सेनापती यांसह ट्रेंटनचे वरचे अंगास नऊ मैलांपाशीं डिलावेर नदी उतरून आला व अचानक ट्रेंटनवर छापा घालण्याचा त्याचा विचार होता. ख्रिस्टमसचे रात्रीं सर्व ब्रिटिश सैन्य बेसावध होतें व मजा करीत होतें, त्याचवेळीं वॉशिंगटननें छापा घालून मोठा विजय मिळविला.

## ब्रिटिश सैन्यावर अचानक छापा

त्यावेळीं डिलावेर नदी अर्धवट गोठलेल्या स्थितींत होती, त्यामुळें ती ओलांडणे अत्यंत बिकट असल्यामुळें शत्रूस विशेष हालचाल करितां येईना. दुसरे दिवशीं सकाळीं वॉशिंग्टनने ट्रेंटन हें शहर आपले ताब्यांत घेतलें, व तेथील फौज कैद करून दारूगोळा व लष्करी सामान काबीज केलें. या लढाईंत अमेरिकेचा एकही शिपाई दगावला नाहीं. ब्रिटिशाकडील थोडे लोक दगावले व काही जखमी झाले. सुमारें नऊशें ब्रिटिश शिपाई कैद झाले पण हें सर्व जर्मनीतून भाडोत्री आणलेलें सैन्य होते. या लढाईत बाराशें बंदुका व सहा तोफा आणि बराच दारूगोळा वॉशिंगटनला मिळाला.

या अचानक छाप्यामुळें बेसावध असलेले ब्रिटिश लष्कर सावध होऊन प्रिन्स्टन येथे एकत्र झाले. आपला बहुतेक विजय झाला असे समजून विलायतेस परत जात असलेल्या लार्ड कार्नवालीसला ही बातमी न्यू यॉर्क येथें समजली. तो तांतडीनें प्रिन्स्टन येथें परत आला व शत्रूने घेतलेली जागा परत मिळविण्याचे कामास लागला.

अशा रीतीनें स्वातंत्र्याचे लढाईचें पहिलें साल संपलें. अगदीं दहा दिवसांचे अगोदर जनरल हॉव हा आतां लढाई संपली व डिलावेर नदी किंचित् गोठतांच फिलाडेलफिया काबीज करून व इतर ठिकाणीं किरकोळ बंदोबस्त करून ब्रिटिश सत्तेचा सर्व वसाहतीवर विजय होऊन ब्रिटिश निशाण सर्व मुलूखभर फडकत राहील अशा सुखस्वप्नांत होता. बहुतेक काम आटोपून कार्नवालीस विलायतेस निघाला होता, त्यावेळीं हे अवचित आलेले विघ्न पाहून ते दोघेही हतबुद्ध झाले असल्यास नवल नाहीं लोकांच्या देशाभिमानानें विलक्षण उलट खाल्ल्यामुळे याउप्पर आपल्याला एकतरी ठाणे सुरक्षितपणे धरून बसतां येईल कीं नाही यासंबंधीं त्या दोघांस शंका वाटूं लागली.

नवीन वर्ष उजाडलें त्या दिवशीं वॉशिंगटन ट्रेंटन शहरीं पांच हजार सैन्यानिशीं तळ देऊन बसला होता. लॉर्ड कार्नवालीस उत्तम योद्धा असल्यामुळें तो सहजासहजीं वाशिंगटनचे सैन्यास हार जाईल असा प्रकार

नव्हता. तो प्रिन्स्टननजीक येऊन पोहोंचला व त्यानें एकदम अमेरिकन सैन्यावर हल्ला करण्याचें मनांत आणलें. ब्रिटिशांजवळ सैन्य भरपूर होतें व सामुग्रीही चांगली होती तारीख एक जानेवारी रोजीं दोन प्रहरीं दोन्ही पक्षांत लढाईस आरंभ झाला. वाशिंगटननें ताडले कीं या लढाईत जर पराभव झाला तर पळून जाण्याससुद्धां सुरक्षित जागा नाहीं. म्हणून त्यानें आसान पिकपर्यंत शिस्तीने मागे हटण्याचें ठरविले. सायंकाळीं कॉर्नवालीसनें प्रिन्स्टन शहर काबीज केलें. नंतर रात्र पडली म्हणून सकाळपर्यंत त्यानें मुक्काम केला. वॉशिंगटननें रातोरात तेरा मैल पुढें सरकून प्रिन्स्टन शहरावर हल्ला केला. सकाळीं उठून कॉर्नवालीसचे आज्ञेप्रमाणें ब्रिटिश लष्कर पुढील मुक्कामीं कूच करण्यास व वॉशिंगटनचे शिपाई प्रिन्स्टनमध्यें शिरण्यास एकच गाठ पडली. प्रिन्स्टन शहराचे सरहद्दीवर मोठी लढाई जुंपली. ब्रिटिश माऱ्याखालीं वॉशिंगटनचे सैन्य टेंकीस आलें पण त्यानें तसेंच नेटानें युद्ध चालविले. थोड्याच वेळांत युद्धाचा रंग पालटूं लागला व सुमारे चारशें शिपाई युद्धांत पडल्यामुळे ब्रिटिश लोक मागें हटूं लागले, अमेरिकन लोकांचेंही या लढाईत तितकेच नुकसान झालें होते. पण विजयश्रीनें त्यांनाच माळ घातली.

प्रत्यक्ष कॉर्नवालीसशीं गांठ असल्याने मिळालेल्या विजयाने वॉशिंगटन चढून गेला नाहीं. तर अधिक सावधपणे लढूं लागला. दुसरे दिवशी कॉर्नवालीसने फिरून जोराचा मारा केला तेव्हां अमेरिकन सैन्यानें त्याला बगल दिली व तें मॉरिसटाऊन येथें जाऊन बसलें. कॉर्नवालीस न्यू ब्रन्सविक येथे परतला. गेल्या दहा दिवसपर्यंत वसाहतवाल्याना बराच विजय मिळालेला पाहून न्यू जर्से येथील लोकांस धीर आला, व अधिक स्वयंसेवक लढण्यास तयार होऊं लागले. कॉर्नवालीसनें आपलें सैन्य न्यू ब्रन्सविक येथें एकत्र केलें.

उन्हाळ्याचे सुरुवातीस म्हणजे एप्रिल महिन्यांत ब्रिटिश सैन्यानें पीक्सहिल येथें हल्ला करून अमेरिकन लोकांची बरीच युद्धसामुग्री लांबविली.

ट्रायनची कनेक्टिकटवरील अमानुष स्वारी— तारीख २५ एप्रिल रोजीं जनरल ट्रायन या ब्रिटिश सेनापतीनें कनेक्टिकटवरील स्वारीस सुरुवात केली. ट्रायननें आपल्या स्वारींत इतका अमानुषपणा चालविला होता कीं, ब्रिटिश जनरल हॉव ह्यानें सुद्धां ट्रायनच्या अमानुष व क्रूर कृत्यांची फार निर्भत्सना केली, व त्याच्या कृत्यांनीं ब्रिटिश राजनीतीस काळिमा आणिला आहे असे ह्मटलें. ट्रायननें डॅनबरी, नारवॉक आणि फेअर फील्ड ही गांवें बेचिराख केली, टाप्पान येथील एका अमेरिकन सैन्याचे तुकडीची त्यानें कत्तल करून प्रत्येक शिपायास ठार मारलें, व त्याचप्रमाणें वायन येथील दुसरी सैनिकांची टोळी तडजोडीचे बोलणे करण्यास तयार असताना देखील तींतील सर्वांना ठार मारलें. वाटेल तेथे जाळपोळ व लूट करून त्याने धुमाकूळ मांडला होता. त्याच्या या अमानुष छळांतून बेनिडिक्ट आर्नोल्डसारखे देशभक्त सुटून आल्यामुळें त्यांच्यावर कांहीं विशेष दैवी कृपा आहे असें लोक समजूं लागल्यास आश्चर्य नाहीं.

सांपडतील तितकीं घरें व धर्मशाळा जाळून व नागरिकांचा सर्व मार्गांनीं छळ व उपमर्द करून कनेक्टिकट प्रांतांतील एकूण एक गांवें उध्वस्त करण्याचा व लुटण्याचा ट्रायनने निश्चयच केला होता. या अमानुष छळास तोंड देण्याकरितां सहाशें लोकांचे अमेरिकन टोळीनें निश्चय केला. बेनेडिक्ट आर्नोल्ड व वूस्टर या पुढाऱ्यांचे अंमलाखालीं त्यांनीं ट्रायनचा डॅनबरी येथे प्रतिकार करण्याचें ठरविलें. अमेरिकन स्वयंसेवकांची टोळी संतापानें इतकी बेहोष झाली होती कीं अवघ्या चारशें लोकांसह तिनें ट्रायनचे सैन्याचे पिछाडीस हल्ला करून चाळीस लोक गारद केले.

ट्रायन लढाईचे भानगडींत न पडतां पुढेंच चालला होता पण पुढच्या बाजूनें बेनेडिक्ट आर्नोल्डचे लोकांनीं त्याच्यावर हल्ला केला त्यामुळें त्याला लढाईला तोंड देणें भाग पडलें.

यावेळीं आर्नोल्डचीही परिस्थिति चमत्कारिक झाली होती. त्याला मागें किंवा पुढेंही पळण्यास वाव राहिला नाहीं, तो धैर्यानें तसाच लढत

राहिला, इतक्यांत त्याचा सहकारी बूस्टर हा लढाईंत पडल्याची बातमी त्याला समजली, तरीही तो डगमगला नाहीं, बूस्टरचेही लोक आपल्या पाठीशीं घेऊन तो शत्रूवर तुटून पडला. समोरून गोळयांचा वर्षाव चालू होता. आर्नोल्डच्या घोड्यास अनेक जखमा होऊन तो जायबंदी झाला तरी आर्नोल्डला एकही गोळी लागली नव्हती व तो पायींच लढत होता. इतक्यांत एका जबरदस्त शिपायाने आर्नोल्डचे हातांस धरून, तुह्मी आमचे कैदी आहांत असें तो ह्मणाला. आर्नोल्डने चलाखी करून बंदुकीचा दस्ता त्या शिपायाचे छातीस लगावून तो जंगलात पसार झाला, तो पुढें कित्येक दिवस सांपडला नाहीं.

दोन्हीकडील पक्षांची या लढाईत मनस्वी प्राणहानि झाली. पुढें थोडेच दिवसांनीं बेनेडिक्ट आर्नोल्ड ह्यानें सुमारें पांचशें लोकांसह ट्रायनचे सैन्यावर चाल केली व त्याला असे सतावून सोडले कीं त्याचे तीनशें शिपाई ठार झाले व बराच दारूगोळा अमेरिकन सैन्याचे हातीं पडला व ट्रायनचे सैन्यास पळ काढून जावें लागलें.

तारीख २२ मे रोजीं अमेरिकन सैन्यातर्फे कर्नल मीग्ज हा लॉग आयलंड ओलांडून लॉंग आयलंडावरील ब्रिटिश फौजेवर चालून गेला व तेथील सर्व फलटण त्यानें कैद केली व बराचसा दारूगोळा व लढाऊ सामान लांबविलें.

नवीन वर्षाचे सुरुवातीपासूनच वॉशिंगटनचे मनांत हडसन नदीवर आपले सर्व लष्कर एकत्र करण्याचें होतें. त्याने बेनेडिक्ट आर्नोल्ड याचे हातांखालीं सैन्यास शिस्त व कवाईत शिकविण्याचे काम दिले मे महिन्याचे सुरुवातीस वॉशिंगटनें ब्रिटिश कपापासून दहा मैलांवर तळ दिला, जनरल हॉवनें त्याला तेथून धुडकावून लावण्याचा प्रयत्न केला पण तो साध्य झाला नाहीं. नेहमीं चकमकी झडत पण शेवटीं ब्रिटिशांना मागें हटावे लागले व न्यूजर्से सोडून शेवटीं स्टॅटन आयलंडपाशीं जाऊन त्यांनी तळ दिला.

या वेळीं अमेरिकन कॉंग्रेस बाल्टिमोरहून पुन्हां फिलाडेलफिया येथें आणण्यांत आली. सर्व देशभर एक प्रकारचा आत्मविश्वास

फैलावलेला आढळून येत होता. शत्रूला समरांगणावर जरी अजून चारी मुंड्या चीत करण्यांत आले नव्हते तरी तो मागें हटत होता हें समाधान कांही कमी नव्हतें. देशभक्त राष्ट्रीय निशाणाखालीं जमा होऊं लागले होते पण भेकड होते, त्यांना आपलें कसें होईल याचीच चिंता लागून राहिली होती. खुद्द फिलाडेलफिया येथेंही भेकड लोकांची संख्या कांही कमी नव्हती. ब्रिटिश लोकांची पिच्छेहाट होण्याचे अगोदर दोनच महिने राजनिष्ठ लोकानी मिळून तिसऱ्या जॉर्ज बादशहास आयुरारोग्य मिळावें ह्मणून ईशप्रार्थना केली होती पण आतां सर्वच पारडें फिरलें होते. आज तर स्वातंत्र्याच्या जाहीरनाम्याचा प्रथम वाढदिवस होता व सर्व शहरभर मोठ्या अभिमानाने स्वातंत्र्योत्सव साजरा होत होता.

फ्रान्स देशाची नवीन राष्ट्राबद्दल सहानुभूति–अमेरिकन कांग्रेसपुढें आतां एक नवीनच प्रश्न प्रामुख्याने आला होता. तो ह्मणजे परराष्ट्रीय संबंधाचा. इतर युरोपियन राष्ट्रांनीं अमेरिकेचे स्वातंत्र्य मान्य केल्याशिवाय व सहानुभूति दाखविल्याशिवाय अमेरिकेची विशेष प्रगति होणार नाहीं हे सभासद जाणून होते स्वातंत्र्य जाहीर होऊन एक वर्ष होऊन गेलें, अद्यापि अमेरिकन लोक ब्रिटिश राजसत्तेस हार नेलेले नव्हते इतकेंच नाहीं तर, एक दोन वसाहतींतून त्यांनी ब्रिटिशांना पार हाकलून दिलें होतें. या गोष्टीचा इतर राष्ट्रांच्या मनांवर परिणाम झाल्यावांचून राहिला नव्हता. अगदी स्वातंत्र्याचे जाहीरनाम्याचे प्रथम दिवसापासून फ्रेंच लोकांची अमेरिकन लोकांबद्दल फार सहानुभूति होती. यावेळीं इंग्लंड व फ्रान्स या देशामध्ये शांततेचे वातावरण होते तरी सुद्धा नवीन उदय पावणाऱ्या राष्ट्राबद्दलची फ्रान्सचा सहानुभूति झांकली जाण्याइतकी अल्प नव्हती. फ्रान्सचे प्रधान मंडळास ब्रिटिशाशी लढाई उकरून काढावयाची नव्हती, तरीसुद्धां इंग्रजांचे प्रत्येक अपजयाबरोबर त्याचा आनंद वृद्धिंगत होई. पण पुढे पुढें तर फ्रेंच लोक उघड मदत करण्यास तयार झाले. तुह्मांस लढाई वगैरे चालविण्याकरितां कर्ज पाहिजे असल्यास आह्मी देऊं असें फ्रेंच प्रधान मंडळानें अमेरिकन लोकांस कळविलें. आह्मी तुह्मांस

हत्यारे वगैरे पाहिजे असल्यास पुरवठा करूं असेंही सांगितलें. इ. स. १७७७ सालीं फ्रेंच राष्ट्रानें चोरून मारून किंवा उघड रीतीने मिळून एकंदर २० हजार बंदुका व हजार पिपें बंदुकींची दारू पुरविली.

यावेळीं फ्रान्स देशांत सुद्धां प्रजासत्ताक राज्याची इष्टता लोकांना पटूं लागली होती व त्या कल्पनेला चालना मिळावी ह्मणूनच त्यांना अमेरिकेस मदत करण्याची स्फूर्ति आली असावी असें दिसते. जिलबर्ट मोटिअर मार्किस ऑफ लाफाएट याला तर अशी प्रबल इच्छा उत्पन्न झाली कीं स्वतःच एका गलबतावर बसून फ्रेंच आरमारी खात्याची नजर चुकवून अमेरिकन लोकांचे मतदीकरितां तो निघाला. त्याला बॅरन डी काल्ब व इतर कांहीं स्नेहीही येऊन मिळाले. व त्याची बोट इ. स. १७७७ चे एप्रिल महिन्यांत साउथ कॅरेलिना येथें पोहोचली. तो एक सामान्य शिपाई ह्मणून नोकरीस राहिला पण पुढे लवकरच त्याला मेजर जनरलचा हुद्दा मिळाला.

आतां लष्करी दृष्टीने ब्रिटिश ऑफिसरांना अधिक परिणामकारक मार्ग शोधून वसाहतवाल्याची गळचेपी केली पाहिजे हें उघड दिसत होते. जवळच्या कानडाचे हद्दींतील राजनिष्ठ नागरिकांच्या सान्निध्याचा फायदा घेणें त्यांना प्राप्त होतें, तेथून सेंट लॉरेन्समधून जहाजाच्या साह्याने वाटेल तिकडे आरमारी हल्ले करणे विशेष सोपे होते.

जनरल बर्गाइन यानें कानडात, कॅनेडियन हेसियन व इंडियन लोकांचें सुमारे दहा हजार सैन्य जय्यत तयार केलें. त्याचा विचार उत्तरेचे बाजूने आलबानी व न्यू यॉर्कवर जंगी हल्ला करून न्यू इंग्लंडचा मध्यवर्ती व दाक्षिणेकडील वसाहतींचा संबंध तोडून टाकावा व त्याना एकटे पाहून ठोकावें असा होता. तारीख एक जून रोजी ही स्वारी लेक चॅम्लेनपर्यंत येऊन पोचली व तारीख १६ जून रोजी ब्रिटिश सैन्यानें क्राऊन पाईंट सर केला, व तारीख पांच जुलै रोजी टिकोंडेरोगा किल्ला ब्रिटिश सैन्यानें परत घेतला. तेथील तीन हजार अमेरिकन सैन्य पळून गेलें पण त्यानेंच पुढे थोड्या अंतरावर ब्रिटिश सैन्यास रोखून धरलें. दुसऱ्या दिवशी ब्रिटिश सैन्याने व्हाइटहॉल हें ठिकाण घेतले, व अमेरिकन लोकांचा दारूगोळा सर केला.

अशा रीतीनें ब्रिटिश सैन्याचा ठिकठिकाणीं विजय होत चालला. टिकोंडेरोगाचा किल्ला जो वसाहतवाल्यांनी महत्प्रयासानें मिळविला होता तोही हातचा गेला, तरी सुद्धां त्याचे धैर्य खचलें नाहीं. ते ब्रिटिश सैन्यावर चोरून मारून हल्ले करून त्यांला चैन पडूं देत नसत. त्यामुळे ब्रिटिश सैन्य बरेच जेरीस आलें होते. तारीख दहा जुलै १७७७ रोजीं अमेरिकन सेनापति कर्नल बार्टन याने जनरल प्रेस्कॉट याजवर ऱ्होड आयलंड येथे मोठा हल्ला केला, प्रेस्कॉट नजीकच्या एका शेतांत रहात असे व हल्ला अचानक झाल्यामुळें त्याचे सैन्याची मुळीच तयारी नव्हती. कर्नल बार्टन निवडक चाळीस लोकांनिशी जनरल प्रेस्कॉट रहात असे तेथून अगदीं थोड्या अंतरावर दबा धरून बसला. रात्रीं अचानक त्या घरावर छापा घालून त्यानें जनरल प्रेस्कॉट यास कैद केले व त्याला घेऊन तो बोटीवर चढला. त्याने हे काम इतक्या गुपचूप व झटपट केले की ब्रिटिश लढाऊ जहाजांचे अगदी जवळून त्याची बोट गेली तरी कोणास पत्ता लागला नाहीं. कांग्रेसने बार्टनच्या शौर्याबद्दल त्याला एक मानाची तरवार बक्षीस दिली.

बेनिंगटनची लढाई—तारीख तीस जुलै रोजीं जनरल बर्गाईननें फोर्ट एडवर्ड सर केला. पण येथे त्याचे जवळची शिधासामुग्री संपत आल्यामुळे, त्याने दोन फलटणी शत्रूचे गोटात शिरून तेथून पाहिजे ती सामुग्री परत आणण्याकरितां पाठविल्या. जनरल फिलिप शूलर या अमेरिकन सेनापतीची व त्यांची बेनिंगटन येथे गांठ पडली. व मोठी लढाई जुंपली. त्यावेळी वसाहती सैन्य इतक्या निकराने लढले कीं शत्रूस लेक्सिंटन व बंकरहिलच्या लढाईची आठवण आली शिधासामुग्री तर राहोच पण जीव बचाऊन परत जाता जातां ब्रिटिश सैन्याची तिरपीट उडाली, व त्यांचे आठशे लोक जायबंदी झाले. अशा तऱ्हेने अमेरिकन लोकांनीं ब्रिटिश लोकांवर जंगी विजय मिळविल्यामुळें वसाहतवाल्यांच्या उत्साहास पारावार नाहीसा झाला. हे नवीन राष्ट्र विजयोत्सवाने दुमदुमून गेले.

फोर्ट शूलरवर जनरल सेंट लेजर यास ब्रिटिश सेनापतीने पाठविलें होते, त्याने फोर्ट शूलर सर केला होता. तेथे जनरल हार्किमर नांवाच्या

अमेरिकन अधिकाऱ्यानें स्थानिक सैन्य जमा करून हल्ला परतविण्याचा प्रयत्न चालविला पण त्यास यश आलें नाहीं. याच सुमारास बेनेडिक्ट आर्नोल्ड हा प्रकट झाला. त्याचेबरोबर फार थोडे पण निवडक लोक होते, व तेवढ्यांचे सहाय्याने फोर्ट शूल्डर शत्रूकडून परत मिळविण्याचा निर्धार त्यानें केला होता. एका अर्धवट मनुष्यास पकडून त्याने कैदी करून ठेवले व त्याचे मनावर आपलेपाशी फार मोठे सैन्य आहे ही गोष्ट बिंबविली. नंतर कांही निमित्ताने तो ब्रिटिश कॅपाकडे पळून जाईल अशा बेतानेच त्याला मुक्त करण्यांत आलें. तो जो गेला तो थेट ब्रिटिश छावणींत तेथे त्याने बेनेडिक्ट आर्नोल्ड हजारो सैन्य घेऊन छावणीकडे चालून येत असल्याचे सांगितले. बेनडिक्ट आर्नोल्डचा तडाखा ब्रिटिश ऑफिसरास माहीत होता. शिवाय त्याच्यासंबंधीं अद्‌भुत गोष्टी प्रसिद्ध असल्यामुळे इंडियन सैन्य घाबरलें व त्याने पळ काढण्यास सुरुवात केली. त्यामुळे इतर ब्रिटिश सैन्यासही माघार घ्यावी लागली.

लवकरच फोर्ट एडवर्ड येथील कँपांत बिटिशांच्या मुख्य सेनापती–लाही पराजयाची बातमी समजली.

जवळची शिधासामुग्री संपून गेल्यामुळे व दोन ठिकाणीं लोक शिधा सामुग्री लुटून आणण्याकरितां पाठविले ते मार खाऊन परत आल्यामुळे जनरल बर्गोइन् यास कॅनडाहून सर्व सामुग्री येईपर्यंत म्हणजे एक महिनाभर स्वस्थ बसावे लागलें. सर्व ठिकाणाहून विजयाच्या बातम्या येऊं लागल्यामुळे अमेरिकन सैन्यासही किंचित् धैर्य आले व त्याचा नवीन सैन्यभरतीवर उत्कृष्ट परिणाम होऊं लागला. जिकडून तिकडून खंदे वीर आपापल्या सेना घेऊन जनरल शूलरच्या निशाणाखालीं दाखल होऊं लागले. न्यू इंग्लंडतर्फे जनरल लिंकन आपले सैन्य घेऊन आला. दक्षिणेकडून कर्नल मॉर्गन आला, जनरल गेट्स उत्तरेकडून आला. हे सर्व खंदे वीर होते व त्यांनीं स्वातंत्र्याचे लढाईत अनेक पराक्रम केलेले होते.

अगोदरपासूनच जनरल बॅर्गोइन् यास पराभवाचीं स्वप्नें पडूं लागलीं होतीं. एक दणदणीत लढाई करून शत्रूस जेरीस तरी आणलें पाहिजे नाहीं तर शत्रूस पाठ दाखवून पळून तरी गेले पाहिजे याखेरीज त्याला

गत्यंतर उरलें नव्हते. तो हडसन नदी ओलांडून साराटोगा येथें तळ देऊन राहिला होता. वसाहतवाल्यांचें सैन्य तेथपर्यंत जाऊन भिडलें, व लढाईल तोंड लागलें. मध्यरात्रीपर्यंत घनघोर युद्ध झाले पण अमुक पक्षाचा जय झाला असे नक्की होईना. अपजयापेक्षां बरोबरी पतकरली या न्यायाने अमेरिकनांस ही गोष्ट इष्टच होती. पण बर्गाइनजवळचा अन्नपाण्याचा सांठा अचानक संपला, त्यामुळे त्याचे भाडोत्री सैन्य ताबड-तोब त्याला सोडून गेलें. उलटपक्षी अमेरिकन सैन्यांत भरती होत होती व त्याला वाढती मदत मिळत होती. बर्गाइनच्या हलाखीच्या स्थितीची बातमी ब्रिटिश छावणांत पोचतांच न्यूयॉर्कहून ब्रिटिश मुख्य सेनापति क्लिंटन याने बर्गाइन यास वाचविण्याची पराकाष्ठा केली. पण वेळींच त्याला मदत पोंचली नाहीं. सरतेशेवटीं निराश होऊन बर्गाइनने शेवटचा निकराचा हल्ला केला, त्यांत त्याचे अत्यंत जिव्हा-ळ्याचे अधिकारी व निवडक असे सातशे लोक कामी आले. बर्गाइनचा अगदीं उजवा हात असा ब्रिटिश जनरल फ्रेजिअर हा या युद्धांत ठार झाला व त्याच्या हाताखालचे लोकांनींहि पळ काढला. अमेरिकन बाजूने जनरल आर्नोल्ड हा लढत होता, त्याला पूर्ण जय मिळाला.

बर्गाइन यास परत फिरण्यावांचून गत्यंतर नव्हते, तो परत सारा-टोगा येथे गेला. येथे गेट्स व लिंकन या अमेरिकन योद्ध्यांशी त्याला तोंड द्यावें लागले. आतां शरण जाण्याखेरीज दुसरा उपाय बॅगाईन यास राहिला नाही. बर्गाइन यानें गेट्सनें काढलेल्या तहनाम्यावर सही केली व तो अमेरिकन सैन्याचें स्वाधीन झाला. या लढाईत सबंध ब्रिटिश लष्कर म्हणजे पांचहजार आठशे शिपाई कैद करण्यात आलें. त्यांत सहा पार्लमेंटचें मेंबर्स होते. बेचाळीस पितळी तोफा हातीं लागल्या. पांचहजार बंदुका व अनेकविध लढाऊ सामान अमेरिकनांचे हातीं लागलें. या लढाईनें ब्रिटिश सत्तेस जोराचा, निश्चित स्वरूपाचा व शेवटचा धक्का बसला.

शत्रु पक्षाचे सेनापतींस जनरल गेट्सनें मोठ्या इतमामानें शेता-वरील आपले घरीं नेलें, व त्यांचे दर्जास उचित असाच या सन्मान्य

कैद्यांचा बंदोबस्त ठेवला, व अशारीतीनें आपला मोठेपणा जगाचे निदर्शनास आणून दिला.

रणक्षेत्राचे दुसऱ्या बाजूसही अमेरिकन लोकांनी आपली अब्रू चांगली संभाळली होती. जनरल हॉव याने न्यूयॉर्कहून बरोबर १८ हजार सैन्य घेऊन फिलाडेलफिया शहरावर चाल केली· तो जमिनीवरील मार्ग सोडून डिलावेर नदीतून येत होता. डिलावेर नदींत अमेरिकनांनी मारा करण्याची तयारी केली होती, त्यामुळे पुन्हां बेत बदलून तो चेसापेकी नदीतून जमिनीच्या मार्गाने फिलाडेलफियाकडे येऊं लागला. वाशिगटनने विल्मीगटन येथे जाऊन आघाडीचे ठाणे दिले. तेथे त्यानें बारा हजार सैन्य जमा केले. जनरल हॉव याचे सैन्यापेक्षां आपलें सैन्य लढाईच्या कामात कच्चे आहे हे त्याला ठाऊक होते पण लढल्या वांचून गत्यंतरच नव्हते, कारण मुख्य राजधानीवरच शत्रु चाल करून येत होता.

ब्रँडीवाईनची लढाई—चेसापेकी नदीतून एल्कनदीच्या मार्गे मेरी लँड-मध्ये जनरल हॉवचें सैन्य उतरलें, व तेथून ते फिलाडेलफियाकडे जमिनीचे मार्गे चालले. मध्येच मार्गावर ब्रँडीवाईन नावाची लहान नदी होती तिचे काठी तळ देऊन वॉशिंगटनने ब्रिटिश सैन्याचा मार्ग रोखून धरला. ब्रिटिश सैन्य ब्रँडीवाइन नदी उतरून जाण्याचा प्रयत्न करूं लागतांच, अमेरिकन सैन्यानें हल्ला सुरू केला. पण हा वेळपावेतों बरेच ब्रिटिश सैन्य पुढे निघून गेल्यामुळे, अमेरिकन लोकांना चेस्टरपर्यंत रातोरात पुढें जावे लागले. या धांवपळींत अमेरिकन लोकाचें बरेच सैन्य दगावले व जनरल लाफाएट यास जबर जखम झाली. काऊंट पुलास्की या योद्ध्यानें जे कौशल्य दाखविले त्याबद्दल कॉंग्रेसने त्यास शाबासकी देऊन ब्रिगेडियर नेमिले. वाशिंगटनूनें नंतर थोडी माघार घेऊन श्वेलस्किल पर्वत ओलांडून तो जर्मनटाऊनपर्यंत पोहोंचला. तारीख पंधरा सप्टेंबर रोजी त्यानें हॉवच्या सैन्याशीं फिरून सामना दिला. आतां लढाईस अगदीं जोर चढणार तोंच जोराचा पाऊस आला. बंदुकीची दारू भिजल्यामुळें गोळीबार

करतां येणें अशक्य झाले. हॉवचें सैन्य फिलाडेलफियाकडे कूच करून गेलें व त्याने तें शहर अनायासें काबीज केलें.

फिलाडेलफिया शहर हातचें गेल्यामुळें कॉंग्रेसने आपलें ठाणें प्रथम लॅंकेस्टर येथें आणि नंतर यॉर्क येथे नेले अद्यापि वॉशिंगटनचे मनानें फिला-डेलफिया परत काबीज करून, प्रिन्स्टन व ट्रेंटन येथील लढ्यांप्रमाणें ब्रिटिशांना नामोहरम करण्याचे होते. तारीख तीन आक्टोबर रोजी त्याने जर्मन टाऊन नांवाच्या फिलाडेलफिया शहराच्या एका भागावर हल्ला केला. पण त्यात त्यास यावें तसे यश आले नाहीं, व प्राणहानीहि बरीच झाली-ब्रिटिशांकडीलही पांचशेवर लोक प्राणास मुकले. त्यांनाही फिलाडेलफिया मध्ये राहण्याचें धोक्याचे वाटत होते. कारण डिलावेर नदीवर अद्यापि अमे-रिकन लोकाचा ताबा होता, तेथून जलमार्गे हल्ले करणे सोपे होतें. ब्रिटिश लोकानी फोर्ट मर्सर नांवाच्या डिलावेर नदीतील किल्लयावर हल्ला केला पण अमेरिकन लोकांनीं त्यांना परतून लाविले, नंतर ब्रिटिशानी मडआयलंड नांवाच्या किल्लयावर हल्ला केला पण तेथेंही त्यांना यश मिळालें नाहीं. ते पुन्हां फोर्ट मर्सर येथे परतून फोर्टमर्सर त्यानी मोठ्या शिकस्तीने आपल्या ताब्यांत घेतला व डिलावर नदी जनरल हॉवच्या पूर्ण ताब्यात आली.

अशारीतीनें पराभव झाल्यामुळे वॉशिंगटन श्वेलस्किल पर्वताचे पलीकडे व्हाइटमार्श नांवाचे ठिकाण होते तेथे जाऊन बसला. येथें त्याचे सैन्याचे अन्नपाण्यावाचून फार हाल होऊं लागले. थंडीही विलक्षण असल्यामुळे लोक फार त्रासून गेले, वसाहतीकडून जितक्या जलद मदत यावी तितकी आली नाही.. वॉशिंगटन अडचणात आहे अशी बातमी लागतांच त्याचेवर जोराचा हल्ला करण्याचे जनरल हॉव यानें ठरविलें. फिलाडेलफिया येथे ज्या घरांत जनरल हॉव याचे ऑफिस होंते तें घर लिडिया डॅरा नांवाच्या बाईचे होते. जनरल हॉव याचे लढाईसंबंधीं खलबत चाललें असतां या बाईने, बरोबर बातमी काढली व कांही कामानिमित्त बाहेरगांवीं जात आहे असें सांगून ती घोड्यावर स्वार झाली व ताबड-तोब तिनें वॉशिंगटनचे कॅंपांत येऊन ब्रिटिश लोक चाल करून येत आहेत म्हणून बातमी दिली. जनरल हॉव जों वॉशिंगटनचे कॅंपवर चालून

जातो, तो त्यास जिकडे तिकडे तोफा रोंखून शत्रू जय्यत आहे असे आढळून आले, त्यामुळे अचानक हल्ल्याचा त्याचा बेत फसून हॉवला परत फिलाडेलफिया गांठावीं लागली.

श्वेल स्किल नदीचे उजवेतीरी व्हॅली फोर्ज नांवाच्या ठिकाणीं वॉशिंगटनने तळ दिला. आतां हिंवाळा जबरदस्त पडला होता. अन्नसामुग्री पुरीशी नव्हती. कपडेलत्ते व बूटजोडे यांची वाण पडूं लागली, त्या देशभक्त सैन्याच्या बचावाकरितां व सुखसोई करिता वॉशिंगटनने पराकाष्टा केली. लाकडांच्या ठोकळयांच्या झोपड्या ताबडतोब बाधण्यात आल्या व शक्य तितकी सैन्याची सोय लावण्यात आली पण हिंवाळाच जबरदस्त, व शिवाय तीन चार महिने टिकणारा, त्यामुळें त्याला फारसे यश आलें नाहीं. हे दिवस त्याच्या आयुष्यांत अत्यंत आणबाणाचे गेले एका मागून एक याप्रमाणे पराभव हात गेल्यामुळे लोकांच्या मनातील त्याच्याविषयींचा आदर कमी होऊं लागला होता, कांग्रेसमध्येही त्याच्याविरुद्ध ठराव आले, व कांग्रेसनेही त्याला द्यावे तितके उत्तेजन दिले नाही, यामुळे त्याची दुर्दशा झाली. उलटपक्षी उत्तरेच्या बाजूस जनरल गेट्स हा लढत होता व त्याची बरीच सरशी होत होती. ज्या लोकांनी वॉशिंगटनला मदत करावयाला हवी होती त्यांचा वॉशिंगटनवरील विश्वास ढळूं लागला. पण त्याच्या सैन्याचा त्याच्यावर अढळ विश्वास होता व ते शेवटपर्यंत त्याला चिकटून राहिलें. हें अशुभ वातावरण फार वेळ टिकून राहिले नाही. अपयशाचे कृष्णमेघ हळू हळू वितळून अमेरिकन राष्ट्राच्या उदयाने त्याची कीर्ति पुन्हां उज्वल झाली.

फ्रान्स देशाला या नवोदित राष्ट्राबद्दल फार आदर वाटूं लागला होता व त्याला वाटेल ती मदत करण्यास फ्रान्स एका पायावर तयार होतें हें मागेंच सांगितलें आहे. अमेरिकन लोकांस इंग्रज व फ्रेंच यांचेमधील वैर कायमच होतें हें माहीत होतें. सोळाव्या लुईचें दरबारीं इ. स. १७७६ पासूनच अमेरिकन लोकांचा वकील होता. त्याचे नांव सिलास डीन असें होतें. फ्रेंच राजाला गादीवर बसून नुकतींच तीनचार वर्षे झालीं होतीं, तरी सुद्धां सिलास डीननें, लढाई चालविण्यास लागणारी

सामुग्री अमेरिकेस मिळावी म्हणून फ्रेंच प्रधानमंडळाकडून वचन घेतलें होतें, व त्याप्रमाणे इ. स. १७७७ च्या पावसाळ्यांत एक जहाज भरून, सुमारें दोन लक्ष डॉलर किंमतीच्या बंदुका, व इतर लढाऊ सामान अमेरिकेस रवाना झालें होते, तसेंच बॅरन स्टॅायबेन नावाच्या सरदारासही मदतीस पाठविले होते. बॅरन स्टॅायबेन अत्यंत वाकबगार मनुष्य असल्यामुळे कांग्रेसने त्याला सैन्यावर इन्स्पेक्टर जनरल हा हुद्दा दिला. त्याला लढाईच्या कामाचा अनुभवही दांडगा होता.

सिलास डीननंतर काँग्रेसनें आर्थरली व बेंजामिन फ्रँकलिन यांस फ्रेंच राष्ट्राबरोबर दोस्तीचा तह करण्यासाठी व त्यांचेपासून प्रत्यक्ष सहाय्य मिळविण्यासाठीं पाठविले होते. ते अशावेळीं फ्रान्सला पोहोचले कीं त्यावेळीं वॉशिंगटनचा बरेच वेळ पराभव होऊन अमेरिकन लोकांची पीछेहाट होत होती. अशावेळीं उघड तह करणे म्हणचे ब्रिटिशांबरोबर उघड युद्धाचे आव्हान स्वीकारणे होय अशी फ्रेंच प्रधानमंडळास भीति वाटली. खासगी रीतीने फ्रान्स अमेरिकेला मदत करीतच होते.

पण अशा आणीबाणीचे वेळी फ्रान्समध्ये राहून मोठ्या कौशल्यानें व धिमेपणाने आपल्याला इच्छित असा फ्रान्सबरोबर उघड तह बेंजामिन फ्रॅंकलिन या महात्म्याने घडवून आणला व आपलें राजनीतिपटुत्व व अचाट बुद्धिमत्ता जगाचे निदर्शनास आणली. अथांग बुद्धिवैभव, भौतिक शास्त्रांतील पारंगतता, व दरबारी थाटाची प्रौढ वागणूक यामुळे फ्रेंच दरबारांत तो सर्वांना फार प्रिय झाला होता. सहज विनोद, व मार्मिकता या गुणांमुळें फ्रेंच लोक त्याच्यावर खूष होते. मानवी क्लेशांचें निवारण करण्याची त्याची तात्परता व औदार्य यांच्यामुळे त्यावेळीं तो सर्व जगालाच प्रिय वाटत होता. अशा या धीरोदात्त पुरुषानें फ्रेंच लोकांचें हृदय आकर्षित केलें असल्यास नवल कसलें ? सुमारे एक वर्ष होतें न होतें तोंच जनरल बर्गाईन याचा पराभव होऊन त्याला अमेरिकन लोकांनीं पकडल्याची ज्या वेळीं बातमी आली, त्यावेळी फ्रेंच लोकांस आनंद झाला. फ्रेंच खजिन्यावरील मुख्य अधिकारी यानेंही अमेरिकेंत कांहीं दूत पाठवून खास हकीगत आणविली होती, तीवरून आतां अमेरिकेस अधिक मदत द्यावयास व

उघड तह करावयास हरकत नाही अशी त्याची खात्री झाली, व त्याप्रमाणें तारीख ६ फेब्रुवारी १७७८ रोजीं फ्रेंच राष्ट्राशीं उघड दोस्तीचा तह झाला. या तहान्वयें, फ्रान्सनें युनाटेड स्टेटस् ऑफ अमेरिका हे स्वतंत्र राष्ट्र असल्याचें मान्य केलें; व त्याशीं मित्रत्वाचे नात्यानें वागण्याचे कबूल केलें. या तहानें आपल्या शत्रूंची संख्या कमी करण्याकरितां म्हणून तरी इंग्लंडला अमेरिकेशीं सलोखा करावा लागेल हें उघड झालें होतें या सर्व खटपटीचें श्रेय बेंजामिन फँकलिन यासच निःसंशय दिले पाहिजे.

तो आतां बराच वृद्ध झाला होता. कारण आतां त्याच्या वयाचीं ञ्याहत्तर वर्षे पूर्ण झालीं होतीं. बेंजामिन फ्रॅंकलिनचा जन्म बॉस्टन शहरीं इ. स. १७०६ साली झाला त्याचे वडिलांचा साबू व मेणबत्त्या तयार करण्याचा एक कारखाना होता. बेंजामिन आपले वयाचे बारावे वर्षीच आपले वडील भावाचे हाताखालीं छापखान्याचे काम शिकण्याकरितां गेला. इ. स. १७२३ साली त्याला फिलाडेल्फिया येथे एका छापखान्यांत नोकरी लागली व तेथे तो लवकरच मोठ्या योग्यतेस चढला. इंग्लंडला जाऊन लंडन येथें त्याने वर्तमानपत्राचे धंद्याची माहिती घेतली व परत फिलाडेल्फिया येथें येऊन त्यानें पूअररिचर्डस आलमनाक हे पुस्तक प्रसिद्ध केलें, व पहिलें फिरते वाचनालय स्थापन केले. त्याचा भौतिकशास्त्राचा अभ्यासही दांडगा होता. त्यानेच, आकाशातील वीज व यंत्रानें उत्पन्न केलेली वीज ही दोन्ही तत्त्वत एकच आहेत ही गोष्ट सिद्ध केली युनायटेडस्टेटस्‌करिता स्वतंत्र राज्यघटना, इ. स. १७५५ सालींच ह्मणजे राज्यक्रांति होण्याचे अगोदर बावीस वर्षे त्याने लिहून ठेविली होती. त्यावरूनच त्याचें धोरण, बुद्धिमत्ता व अचाट कर्तबगारी दिसून येते. इंग्लंडमध्यें त्याचे अनेक जिवलग मित्र होते. तो स्पष्टवक्ता होता तरी फार प्रेमळ असे, व प्रेमळपणामुळेंच त्यानें आपल्या शत्रूंचें हृदयसुद्धां आपल्याकडे ओढून घेतले होतें खुद्द ब्रिटिश पार्लमेंटमध्यें बेंजामिन फ्रँक्लिनचे गुणावर लुब्ध होऊन, त्याचे कार्यास मदत करणारे अनेक सभासद होते त्यानें आपला वृद्धापकालही अमेरिकन राष्ट्रघटनेला मजबुती आणण्यांत खर्च केला.

कॉंग्रेसनें ताबडतोब फ्रेंच लोकांबरोबर झालेल्या तहाला मान्यता दिली. इ. स. १७७८ च्या एप्रिल महिन्यांत काउंट डी एस्टॉगबरोबर एक मोठें आरमार देऊन फ्रान्सनें त्याला अमेरिकेंत पाठविले होते. आतां इंग्लंड व फ्रान्स या दोन्ही देशांनी लढाईची तयारी जोरांत चालविली. या सुमारास इंग्लंड नांवापुरते स्वामित्व राखून अमेरिकन लोकांबरोबर वाटेल त्या अटीवर तह करण्यास तयार झालें होतें. लॉर्ड नॉर्थ त्यावेळचे प्रधान, यांनी दोन बिले पार्लमेंटपुढे आणली होतीं, त्यांत अमेरिकन वसाहतवाले जें जे मागतील ते ते ताबडतोब त्यांना देऊन टाकून, शांतता प्रस्थापित करण्याचा बेत करा असे होते त्यांस राजाचीही संमति मिळविली व त्याप्रमाणे तह करण्याकरितां अमेरिकेस वकीलही पाठविण्यांत आले. पण कांग्रेसने पहिला अट अशी घातली की, जर अमेरिकन राष्ट्राचे पूर्ण स्वातंत्र्य प्रथम मान्य करीत असाल, तर पुढें तुम्ही काय ह्मणतां त्याचा विचार करण्यात येईल. आमचे नवीन प्रजासत्ताक राज्य दुसऱ्या कोणाचेही स्वामित्व मान्य करण्यास तयार नाही. तिसरा जॉर्ज व त्याचें प्रधानमंडळ यांचा हटवादीपणाच अखेर अमेरिकन राष्ट्राच्या स्वातंत्र्यास पर्यायानें कारण झाला असें ह्मणावे लागतें.

परस्पर राष्ट्रांत तडजोडीचे बोलणे चालू झाल्यामुळे इ स. १७७८ च्या पहिल्या सहा महिन्यांत विशेष चकमकी झडल्या नाहीत ॲडमिरल हॉव याचे आरमार डिलावेर नदींत पडून होतें. काऊंट डी एस्टॅग याचें आरमार येत असल्याची वर्दी लागतांच ॲडमिरल हॉव आपला भाऊ जनरल हॉव याचे मदतीकरिता डिलावेर नदी सोडून न्यू यॉर्कजवळ येऊन राहिला. आतां फ्रेंच भडिमाराला तोंड देण्यासाठीं ह्मणून, फिलाडेलफिया शहर सोडून न्यू यॉर्क येथेंच लष्करी तळ देऊन राहणें इष्ट आहे असें जनरल हॉव यास वाटल्याने, त्यानें फिलाडेलफिया शहर सोडून दिले व तो न्यू जर्सीचे मार्गानें निघाला. वाशिंगटननें ताबडतोब फिलाडेलफिया शहर हस्तगत केलें. व शत्रूचा पाठलागही चालविला.

त्यानंतर मनमथ येथील लढाईत जनरल ली व वॉशिंगटन यांचेमध्यें कांहीं मतभेद होऊन जगरल ली यास कोर्ट मार्शल करून एक वर्षपर्यंत सस्पेंड करण्यांत आलें, त्यानंतर जनरल ली हा पुन्हा समरांगणांत उतरलाच नाहीं. दुर्दैवेंकरून स्वातंत्र्य मिळण्यापूर्वींच त्याचा अंत झाला. त्यावेळच्या अमेरिकन स्त्रिया सुद्धां किती स्वाभिमानपूर्ण होत्या हें मेरी पिचर या स्त्रीचे उदाहरणावरून समजून येईल. ती आपल्या पतीबरोबर अनेक लढायांतून निभावून आली होती. क्रिटन येथे तिचा पराक्रम विशेष दिसून आला, मनमथच्या लढाईंत ती जवळच्या ओढ्यांतून पाणी भरून आणून तृषार्त सैनिकांस पाजीत होती, व बंदुकीचे दारूने हात काळे झालेल्या, व वर चरकणाऱ्या उन्हानें थकून जर्जर झालेल्या सैनिकांस धीर देऊन शांत करीत होती. एक बादलीभर पाणी घेऊन ती सैन्याकडे येत आहे इतक्यांत तिची नजर आपल्या पतीकडे गेली, तो गोळी लागून खाली पडत आहे असे तिनें पाहिले. तिनें प्रसंगाकडे लक्ष्य देऊन कांही एक शोक करीत न बसतां चटकन पतीच्या हातांतील बंदूक घेऊन ती लढूं लागली व सर्व लढाई संपेपर्यंत एकसारखी लढत राहिली. लढाई संपतांच तिला वॉशिंग-टनला भेटविण्यांत आलें. वॉशिंगटनने तिला सार्जंटचा हुद्दा दिला व तहाह-यात पेनशन देऊन तिचा गौरव केला.

मनमथचे लढाईनंतर ब्रिटिश सैन्य न्यू यॉर्ककडे वळले व वॉशिंग-टननें त्याचा पाठलाग केला, व तो व्हाइट प्लेनस् नामक जागीं तळ देऊन बसला. आतांपर्यंत काऊंट डी एस्टॅंग हा फ्रान्सहून मोठें आरमार बरोबर घेऊन अमेरिकेस मदत करण्यास निघाला होता, तो न्यू यार्कपाशीं येऊन पोहचला. पण न्यू यार्क बंदराची नाकेबंदी झाली असल्यामुळें तो ऱ्होड बेटाकडे वळला. न्यू पोर्टवर हल्ला करण्यासाठीं डी एस्टॅंगबरोबर जनरल सुली व्हान यास पाठविण्यांत आलें होतें. तारीख नऊ ऑगस्ट रोजीं एस्टॅंगचे सैन्यास जनरल हॉव यांचें आरमार दृष्टीस पडलें. एस्टॅंगने ताबडतोब त्याचेवर चाल केली पण इतक्यांत एक एवढें मोठें वादळ झालें कीं, त्यानें दोन्हीं पक्षांचें फार मोठें नुकसान झालें. आपलें आरमाराचें

डागडुजीकरितां एस्टॅग हा बॉस्टन येथें गेला, व हॉव हा न्यू यॉर्क येथे परतला. त्यानंतर सुलॉव्हाननें न्यूपोर्टवर हल्ला केला पण त्यास मागे परतावे लागलें.

इ. स. १७७८ चें सबंध वर्ष बारीक सारीक चकमकी व कत्तली यानी व्यापिलें, पण मोठी अशी लढाई कोठें झाली नाहीं. या चकमकींत सरहद्दीवरील अमेरिकन लोकांनी जो पराक्रम दाखविला व जो मोठा आत्मयज्ञ केला तो अपूर्व आहे. इंडियन लोकांची तर कांहीं कांहीं लोकांनीं अशी खोडकी जिरविली की पुन्हां त्यांनीं वर तोंड काढलें नाहीं. या कामीं ब्रॅडी व वेट्झेल वगैरे मंडळींनी जो पराक्रम केला तो अवर्णनीय होय.

जॉन ब्रॅडी नांवाचा एक खंदा वसाहती–पुढारी सरहद्दीवरून प्रवास करीत असतां त्याला इंडियन लोकांनी गोळी घालून ठार केलें. त्याच्या जेम्स नामक मुलाने आपल्या तीन सोबत्यांसह इंडियन लोकांवर सूड उगविण्याचा निश्चय केला व त्यांनीं इंडियन टोळ्यांवर हल्ले करण्यास सुरुवात केली, व पुष्कळ इंडियन लोकांचा नाश केला. सरतेशेवटी इंडियन लोकांचे तडाख्यांत ते सापडले व झाडाला बांधून इंडियन लोकांनी त्यांना गोळ्या घालून ठार मारिले. पुढें जेम्सचा भाऊ सॅम्युअल यानें या कृत्याचा सूड घेण्याचे ठरविले व अनेक वर्षे त्याने इतकीं धाडसाची कृत्ये केली व इतक्या अडचणीतून तो पार पडला कीं त्याचेपुढें प्रथम अमेरिकेंत उतरलेल्या पुढाऱ्याचे आयुष्य फार सुखावह होते असे ह्मणावे लागल.

वेटझेल बंधूंचे पराक्रमही असेच अगाध आहेत. वेटझेल बंधूंचा पिता जॉन वेटझेल हा मूळच्या डच वसाहतवाल्यांपैकीं होता, त्याने स्वतः राहण्यास ओहाओ व्हॅलीमध्ये एक झोपडी बांधली व भोंवतालचें जंगल साफ करून शेतीसाठी जागा तयार करण्याचे नादांत तो असतां इंडियन लोकांनीं टेहळणी ठेवून त्याचा खून केला. जॉन स्वतः जरी शांत वृत्तीचा माणूस होता त्याला पांच मुलगे होते. ते बापाच्या वधानें इतके चिडून गेले की त्यांनी इंडियन लोकांचा सत्यानाश करावयाची दारुण प्रतिज्ञा केली. त्यांच्यापैकी वडील बंधु मार्टिन याला इंडियन लोकांनीं कैद केलें. त्याने कांहीं एक गडबड न करितां तो स्वाधीन झाला व

इंडियन लोकांचे सांगण्याप्रमाणें वागण्याचे कबूल करून तो त्यांचा गुलाम बनला. त्याचे मनांतून इंडियन लोकांच्या सर्व हालचाली व ठाव ठिकाणें समजावून घ्यावयाचें असल्यामुळें ही उत्तम संधीच त्याला लाभली होती. पुढें त्याने गुप्तपणानें सुमारें वीस इंडियन लोक ठार मारले व उघडपणे तो आपल्या लोकांस येऊन मिळाला व त्यांचा म्होरक्या बनला. पुढें त्या बंधू पैकीं प्रत्येकजण इंडियन लोकांच्या निरनिराळ्या टोळ्यांत शिरून त्यांनी गुप्तपणे अनेक इंडियन ठार करून आपल्या पित्याचे वधाचा सूड उगवला. सर्व बंधूंपैकी धाकटा ल्युविस याने तर इ. स. १७८८ साली, जनरल हॅरमार हा इंडियन लोकांशीं तह करण्याचा घाट घालीत असतां, त्याला विरोध केला व असें प्रतिपादिले कीं इंडियन लोकांचा निःपातच केला पाहिजे. त्यांच्याशीं तडजोडीचा तह कसला करावयाचा? यासंबंधी पूर्ण विचार करण्याकरितां जनरल हॅरमार यानें फोर्ट हॅरमार येथे एक सभा बोलाविली होती, त्यांत कांहीं प्रमुख इंडियन लोकांसही बोलाविले होते. ल्युविस वेटझेल यानें सभेस जाणाऱ्या एका इंडियनास फसवून दुसरीकडे नेऊन ठार मारिलें. त्याबरोबर त्याला पकडून कैद करून आणण्याबद्दल वॉरंट सुटलें. बरेच लोक त्याचे पाळतीवर राहून त्यांनीं त्याला तो एका मित्राचे घरीं झोंपीं गेला असता पकडले. व त्याला मोठमोठ्या दोरखंडांनीं बांधून ज. हॅरमार याचे हवालीं केले तेथे त्याला मोठ्या बंदोबस्ताने कैदेत ठेवण्यांत आलें. वेटझेलने प्रथम कांही दिवस कांही गडबड केली नाहीं. नंतर त्याने व्यायाम घेण्यासाठी हळूच वरिष्ठांची परवानगी घेतली. फक्त हातकड्या घालून व्यायाम घेत असतां एकेदिवशी पहारेवाले पहारा करीत असतां त्याने धैर्याने पोबारा केला. पहारेवाल्यांनीं गोळ्या झाडल्या पण तो त्यातून निभावला. तो दाट जंगलांत शिरला व तेथून ओहाओ नदी पोहून आपल्या एका मित्राकडे जाऊन राहिला. त्याचे मित्रानें त्या बेड्या काढून टाकिल्या. फिरून त्याने इंडियन लोकांना ठार मारण्याचे आपले आवडत्या धंद्यास सुरुवात केली. त्यामुळें पुन्हां त्याला पकडण्यांत आले व त्यास फांसावर लटकाविण्यांत यावयाचें होते पण त्याचे शौर्याचा लोकमतावर असा

विलक्षण परिणाम झाला होता कीं, लोक त्याला फांसावर चढविण्याचे फार विरुद्ध होते. त्यामुळें त्याची सुटका झाली, तो इ. स. १८०८ सालीं मरण पावला.

इ. स. १७७९ चे हिंवाळयात अमेरिकन सैन्यानें न्यू जर्सेमध्यें मिडल ब्रूक येथें तळ दिला. जॉर्ज वाशिंगटनचे सैन्यांतील एकूणएक शिपाई हवालदिल व नाखूष झाले होते. बिचाऱ्यांना पोटभर खायलाही मिळत नसे व पगारही नाही अशी त्यांची स्थिति झाली होती. सैन्यात बेदिली उत्पन्न झाली म्हणजे मोठ्या शिकस्तीने वॉशिंगटन सैनिकांची समजूत करी. पण असे फार वेळ निभावेल अशी परिस्थिति नव्हती.

जून महिन्याचे आरंभी जनरल ट्रायन यानें अडीच हजार सैन्य बरोबर घेऊन कनेक्टिकटमधील न्यू हॅवन शहरावर हल्ला केला व ते ताब्यांत घेतले व त्याला आग लावून देण्यात आली. त्यानंतर त्यानें ईस्ट हॅवन व फेअरफील्ड नांवाची गावे सर केलीं व त्या सर्वास आगी लावण्यांत आल्या. हीं गांवे जळत असतां जनरल ट्रायन समोरील एका टेकडीवर आराम खुर्चीवर पडून मनापासून हंसत, ती मौज पहात होता असे सांगतात.

त्याच सुमारास सस्कीहानामधील इंडियन लोकांनी फार त्रास देण्यास सुरुवात केल्यामुळे त्यांचेवर स्वारी करणें आवश्यक झाले. जनरल सुलेव्हान यास या स्वारीवर पाठविण्यांत आले. या इंडियन लोकांस ब्रिटिश लोकांची मदत होत होती. अमेरिकन सैन्याने त्यांचा लवकरच पाडाव केला. व त्यांस पळतां भुई थोडी झाली सुमारें चाळीस इंडियन लोकांची खेडी जाळण्यात आली व सस्कीहाना व गेनेसी नद्यांमधील सर्व मुलुख उध्वस्त करून टाकण्यांत आला.

दक्षिणेकडील वसाहतीत देशद्रोही लोकांचा भरणा अधिक असल्या-मुळे फार त्रास होई. हे लोक अज्ञानी लोकास थापा मारून लहान लहान टोळ्या करीत व त्याना वसाहतवाल्या लोकांबरोबरच लढण्यास उद्युक्त करीत. दक्षिणेत ज्यावेळीं युद्ध सुरू झाले व ब्रिटिश सैन्याने फोर्ट सनबरी

व ऑगस्टा हीं ठाणीं घेतलीं त्यावेळीं फार बिकट परिस्थिति उत्पन्न झाली. कर्नल बॉइड नांवाच्या गृहस्थानें वसाहती सैन्याची एक टोळी वसाहतीं-विरुद्ध लढण्यास तयार करून तो ऑगस्टा येथें ब्रिटिश सैन्यास मिळण्यास जात होता, पण वाटेंत त्याला कर्नल अँडरसन नांवाच्या अमेरिकन सेनापतीनें गांठून त्याच्या सैन्याची धूळधाण उडविली. पुढें दुसऱ्या लढाईत जनरल बॉइड हा मारला गेला व त्याचे सुमारे पाऊणशें लोक अमेरिकन सैन्याचे हातीं सापडले त्यांचेपैकी पांच लोकांना देशद्रोहाबद्दल फासावर लटकविण्यात आले

मोठ्या पराक्रमाने जॉर्जियापैकी अर्धा भाग अमेरिकन सैन्याने शत्रूपासून बचावून वेगळा केला होता. पुढे जनरल ॲश याचे आधिपत्त्या-खालीं लढाई सुरू झाली. ब्रिटिश जनरल कॅंबेल याने त्याला थोपवून धरले. मागचे बाजूने त्याच वेळी जनरल प्रेव्होस्ट याने हल्ला चढविल्यामुळे अमेरिकन सैन्याचा पूर्ण पराभव होऊन जॉर्जिया प्रांत पुन्हां ब्रिटिश लोकांच्या ताब्यांत गेला.

सुदैवानें एक गोष्ट झाली की या लढाईत अमेरिकन सैन्याने पळ काढल्यामुळे, ब्रिटिश लोकाचे हातीं कैद झणून कांही सैन्य मिळाले नाहीं. हें अमेरिकन सैन्य चार्लेस्टन येथील सैन्याचा अधिपति जनरल लिंकन नांवाचा होता त्याने एकत्र करून सुमारे पांच हजार सैन्यानिशीं ऑगस्टा सर करण्याकरिता तो चाल करून गेला. तेथे त्याची व जनरल प्रेव्होस्ट याची गांठ पडली पण कडक उन्हाळयामुळे पुढे चार महिन्या-पर्यंत दोन्हीही पक्षांस लढाई चालवितां आली नाही.

इ. स. १७७९ चे साल संपले तरी लढाईचा निश्चित निकाल लागेना. फ्रेंच सैन्याचा व्हावा तसा उपयोग झाला नाहीं व दिवसेंदिवस बिकट परिस्थिति उत्पन्न होऊं लागली राष्ट्रीय सरकारच्या खजिन्यांतील शिल्लक तुटत चालली. सैन्याच्या खाण्यापिण्याची सोय काय लावावयाची व पगार कोठून द्यावयाचे हा मोठाच प्रश्न येऊन पडला. बरें शत्रू तरी टेंकीस येईल ह्मणावें तर तेंही चिन्ह दिसेना. ब्रिटिश सरकारनें आपल्या

सैन्यास कसलीही वाण पडूं दिली नाहीं व दिवसेंदिवस त्याची चलतीच चालली असल्याचें स्पष्ट दिसून येऊं लागलें. नाहीं म्हणायला आतां ब्रिटिश सरकारचें लक्ष फ्रान्सकडेही लागल्यामुळें कदाचित् अमेरिकन लढाईकडे त्याचें लक्ष तितकेसें टिकणार नाहीं असें मानावयाला जागा झाली होती पण प्रत्यक्ष तसा अनुभव यावयास कांहीं काल तग धरून बसणें आवश्यक होते. आतांपर्यंत ब्रिटिश सैन्य एक लक्ष वीस हजारपर्यंत झालें होतें. व लढाईचा खर्च तीन कोटी पौंडांचे आसपास आला होता. पराजयाचे कृष्ण-मेघांनीं तेराही वसाहतींवर अभ्र धरलें होतें व स्वातंत्र्याचा सूर्योदय केव्हां होईल यासंबंधीं निश्चित अनुमान बांधतां येण्यासारखें नव्हतें.

इ. स. १७८० चा हिंवाळा अधिकच कडक पडला. त्यावेळी जनरल वॉशिंगटन हा मॉरिस टाऊन येथें रहात होता व जवळपासच केंबाल पर्वताचे पायथ्याशीं त्याचें सैन्य तळ देऊन राहिलें होतें. बेसुमार थंडीमुळें समोरील ब्रिटिश छावणीकडे नजर लावून पहाण्यापलीकडे कांहींएक करितां येण्यासारखें नव्हतें. वेळप्रसंगीं अन्नासाठीं शेजारच्या शेतांवर जाऊन धान्य मागून आणावें लागे. अशा वेळीं सैन्यांत बंड होण्यास कितीसा अवकाश ? पण वाशिंगटनच्या सैन्याची त्याच्या वर इतकी दृढ निष्ठा होती कीं तसा प्रसंग सुदैवानें केव्हांच आला नाहीं.

कार्यकारण भाव काय असेल तो असो पण एक गोष्ट दिवसेंदिवस स्पष्ट दिसून येत होती, ती ही कीं; ब्रिटिश सैन्याची संख्या, लढाईची तयारी व तीवर होणारा खर्च हीं सर्व पाहिलीं असतां ज्या मानानें त्याचा अमेरिकेंत विजय व्हावयास पाहिजे होता त्या मानानें तो मुळींच होत नव्हता. हेसिमान सैन्य बोलून चालून जर्मनींतून भाड्यानें आणलेलें. पण खुद्द ब्रिटिश सैन्यानें तरी मनापासून लढावें ? पण तसें कांहीं होत नसे हें खास. अमेरिकन लोकांनीं स्वातंत्र्य मिळविल्यास कांहीं हरकत नाहीं असें तर त्याला वाटलें नसेल ना ? कित्येक वेळ हें सर्व सैन्य कांहीं एक न करितां स्वस्थच बसे हिंवाळ्यांत चार महिने तर सर्व कारभार बंदच राही. मुख्य सेनापति जनरल हॉवसंबंधीं म्हटलें तर तो युद्ध सुरूं होण्यापूर्वी

अमेरिकन लोकांस घ्या स्वातंत्र्य म्हणणारांपैकीं होता व लढाई करूं नये अशा मताचा होता, इतकें असून त्यालाच सेनापति कां नेमलें हें तरी मोठें गूढच आहे. जनरल हॉव हा एक मोठा वशिल्याचा गृहस्थ होता यांत शंका नाहीं. अनौरसपणें कां होईना त्याचा संबंध थेट इंग्लंडचे राजघराण्यापर्यंत पोंचत होता.

इ. स. १७८० सालच्या जुलै महिन्यांत फ्रेंच आरमाराचा अधिकारी ॲडमिरल डी टर्नें हा एक मोठा गलबतांचा ताडा घेऊन न्यूपोर्ट येथे दाखल झाला. त्याचे बरोबर काऊंट रोशांबो या लष्करी अधिकाऱ्याचे हातांखालीं सहाहजार सैन्यही होते. अशा तऱ्हेची दोस्त राष्ट्राची मोठी कुमक येताच अमेरिकन लोकांस मोठा उत्साह चढला. लढाई मोठ्या प्रमाणावर चालू झाली व आतां आपला खास जय होणार अशा समजुतींने वसाहती सैन्यात अधिक भरती होऊं लागली व पूर्वी दाखल झालेल्या लोकांचाही विश्वास दुणावला. सप्टेंबर महिन्यांत जॉर्ज वॉशिंगटन व रोशाबो याची मुलाखत झाली व त्यांचें पुढील चढाईचे धोरणासंबंधी बोलणें झाले.

दक्षिणेकडील प्रांतांतली स्थिति समाधानकारक नव्हतीच, कारण, वसाहती सैन्याचे लहान मोठे हल्ले संख्याबलामुळें ब्रिटिश सैन्य परतवून लावी व शिवाय देशद्रोही वसाहतवाल्यांच्या प्रयत्नामुळें, आपसांतील दुही वाढविण्याचे व वसाहतवाल्यांविरुद्ध लढण्याचे प्रयत्न होऊं लागले. या वर्षी साउथ कॅरोलिनामध्यें तर देशद्रोही वसाहतवाल्यांचे टोळ्यांनीं फारच गडबड उडवून दिली. त्याच वेळी ॲडमिरल आरबथनॉट हा ब्रिटिश अधिकारी एक मोठा जहाजांचा तांडा घेऊन आला. व त्याने चार्लेसटनसमोर आपला तळ दिला. त्याचेबरोबर सर हेनरी क्लिंटन व सुमारें पांच हजार ब्रिटिश फौज होती.

चार्लेसटनचें संरक्षण करणें फार दुरापास्त होतें, कारण त्या शहराचे रक्षणार्थ फक्त चौदाशें फौज त्या शहराचा मुख्य अधिकारी जनरल लिंकन याजपाशीं होती. ब्रिटिश फौज जमिनीवर उतरून तिनें चार्लेसटन शहर माऱ्याखालीं राहील अशा बेतानें तळ दिला.

त्यानंतर जनरल लिंकन याला दुसरें सातशे व्हर्जीनियन सैन्य येऊन मिळालें. चार्लेस्टनला जमिनीकडून व समुद्राकडून दोन्ही बाजूंनीं वेढा पडला. नॉर्थ कूपर नदीचे बाजूस रस्ता खुला राखण्यासाठी जनरल ऑगर-बरोबर तीनशें सैन्य देऊन लिंकनने त्याला तिकडे पाठविले. त्यावर ब्रिटिश घोडेस्वारांच्या एका टोळीने त्याला उधळून लाविले. व चार्लेस्टनचे बचावाची कांहींएक तजवीज होण्याचा मार्ग दिसेना. तारीख १२ मे १८८० रोजी चार्लेस्टन शहर शरण आले व लिकनचे सर्व सैन्य कैद झाले.

अजूनही कर्नल टॉर्ल्टन, — ब्रिटिश घोडेस्वारांचा कप्तान हा आसपासचा मुलूख उध्वस्त करून टाकीत होता. चार्ल्स्टनमधील विजयामुळे ब्रिटिश सेनेस व इंग्लंडांतील प्रधान मंडळास एक प्रकारे उत्तेजन मिळाले, व लढाई सुरूं ठेवण्यास दम आला. सर हेनरी क्लिंटन व लॉर्ड कॉर्नवालीस हे दोघे झालेल्या विजयामुळें खूष होऊन गेले. पण पुढे लवकरच त्यांना असे आढळून आले की, देशाभिमानाचे वारें अमेरिकेतून पूर्णपणें नाहींसें झालें नाहीं.

थॉमस समटर न फ्रॅन्सिस मेरिअन हे दोघे वीर आतां समरांगणावर चमकूं लागले. त्यांनी थोडेसे स्वयंसेवक जमा करून ब्रिटिश लोकांच्या लहान सहान छावण्यांवर छापे घालण्याचें काम सुरूं ठेविले सुप्रसिद्ध लढवय्या ॲडयू जॅक्सन हा यावेळीं स्वयंसेवकांत दाखल झाला. त्यावेळी त्याचे वय अवघे तेरा वर्षाचे होते. मेरिअनची टोळी ह्मणजे पंधरा वीस तरुणांचे एक पथक होते. व त्यांत कित्येक नीग्रो मुलगेही सामील झाले होत. त्याच्यांत पुढें अनेक तरुण येऊन मिळाले. त्यांचेजवळ दारूगाळा व शिधासामुग्री अशी विशेष नव्हती. पण त्याचा उत्साह विशेष होता. सुसज्ज अशा शत्रुजवळ सर्व शिधासामुग्री व दारूगोळा असल्यामुळे त्या साठ्यावरच या मंडळींची सर्व मदार होती असें ह्मटलें असतां वावगे होणार नाहीं. या निर्भय तरुणांच्या तरवारीची गाड कोठल्या वेळेस पडेल, याचा नियम नसल्यामुळें शत्रुपक्षाकडील लहान लहान टोळ्यांची भीतीनें गाळण उडे. ही वानरसेना पुढें इतकी

प्रबल झाली कीं, तिनें लॉर्ड कार्नवालीसच्या इतस्ततः पसरलेल्या सैन्याच्या एकेका बाजूस चोरटे हल्ले करून त्याला अत्यंत त्रास दिला.

यानंतर वॉशिंग्टननें कॅरोलिना येथील लढाईवर जनरल गेट्स यास पाठविलें. त्याच्यावर कॉर्नवालीस चाल करून गेला. त्या दोघांची सँडर्सक्रीक येथे गांठ पडून, तेथें मोठें घनघोर युद्ध झालें. सुमारें एक हजार अमेरिकन सैन्य गारद झालें, आणि सुप्रसिद्ध योद्धा बॅरन डी काल्ब हा या युद्धांत पडला. या सर्व युद्धाचा आढावा घेतां वॉशिंग्टन यास असें आढळून आलें कीं, गेट्सचे हातून व्हावी तशी कामगिरी झाली नाहीं म्हणून त्याचे जागीं जनरल ग्रीन याची नेमणूक झाली.

रणक्षेत्राचे दुसरे भागांत म्हणजे फिशींग क्रीकनजीक जनरल कार्लटन या ब्रिटिश सेनापतीनें कर्नल समटर याचा पूर्ण पराभव केला. व ब्रिटिश सेनेचें नांव राखिलें. परंतु अद्यापि मेरिअन हा रणक्षेत्रावर धिंगाणा घालून ब्रिटिश सैन्यास त्रास देत होताच. इकडे ब्रिटिशांस राजनिष्ठ असलेले वसाहतवाले कर्नल फर्ग्युसन याचे सैन्याशीं सहकार्य करून लढाऊ वसाहतवाल्यांचे प्रयत्न फसविण्याचा खटाटोप करीत होतेच.

फर्ग्युसन, वसाहतवाल्यांचा मुलूख उध्वस्त करीत करीत ' किंग्ज माऊंटन ' नांवाचे ठिकाणीं आला, तेथें त्याची अमेरिकन सेनापति कँबेल याशीं गांठ पडली. कँबेलजवळ निवडक एक हजार घोडेस्वार होते; त्यांनीं शौर्याची पराकाष्ठा करून फर्ग्युसन यास व त्याचे तीनशें लोकांस ठार केलें. उरलेले आठशें लोक वसाहतवाल्यांस बिनहरकत शरण आले. त्यांचा कोणत्याही प्रकारें छळ किंवा अपमान करण्यांत आला नाहीं. पण तरुण वसाहतवाल्यांचें रक्त सळसळत होतें. आपल्यांतीलच वसाहतवाले शत्रुपक्षास सामील होतात ही गोष्ट त्यांना खपली नाहीं. शत्रु पक्षाकडील कैद्यांत जेवढे वसाहतवाले सांपडले त्यांना त्यांनीं बाजूस काढिलें; व त्यांचेपैकीं दहा लोकांस तेथल्या तेथें फासावर लटकाविलें.



# स्वातंत्र्ययुद्धाची अखेर

## प्रकरण ९ वें



या सुमारास वसाहतवाल्यांचे एकंदर परिस्थितीचा आढावा घेतला तर असें दिसून येईल कीं, त्यांचेजवळ पैसा बिलकूल नव्हता इतकेंच नव्हे तर, नवीन कर्ज उभारण्याची पत सुद्धां राहिली नव्हती. त्यांनी कागदी नोटा काढून पाहिल्या पण त्यांची किंमत फार खालीं पडूं लागली. इ. स. १७८० सालीं या नोटांची किंमत शेंकडा दोन टक्के सुद्धां राहिली नाहीं. त्यामुळें स्थिर अशा चलनी नाण्यांचे अभावीं व्यापार व उद्योगधंदे गारठल्याप्रमाणें झाले. अशा आणीबाणीचे वेळीं रॉबर्ट मॉरिस व मोठमोठे राष्ट्रभक्त व्यापारी पुढें येऊन, त्यांनीं आपलें सर्वस्व राष्ट्राचे हवालीं करून वेळ निभावून नेली. वसाहतींतिल मातृ-संघानें शिपाई लोकांकरितां पुष्कळ कपडे तयार करून आपला वेळ सत्कारणीं लावण्याचें ठरविलें होतें. ‘ स्वातंत्र्य किंवा मृत्यु ’ हेच ध्येय आतां बहुतेक स्त्रियांचे अंगीं बाणल्यामुळें, जिकडे जिकडे सैन्याचा तळ पडे तेथील तेथील स्त्रिया अन्न, वस्त्र व कपडा-लत्ता सैन्यास पुरविण्यास आनंदानें पुढें येत. वसाहतींतील स्त्रियांनीं केलेल्या अलोट स्वार्थत्यागाचा उत्कृष्ट परिणाम त्यांचे बंधू, पुत्र व जनक यांचेवर होऊन स्वातंत्र्याचा दिन लवकरच उगवला.

बेनिडिक्ट ॲर्नोल्डचा अधःपात — ज्या बेनिडिक्ट ॲर्नोल्डनें लढाईत अतुल पराक्रम गाजवून अमेरिकन लोकांचें हृदय आपल्याकडे ओढून घेतलें होतें, ज्याचें नांव ऐकून शत्रूपक्षाची गाळण उडे, शेकडों गोळ्या लागून घोडा ठार झाला तरी जो लढतच होता, व ज्याला एकही गोळी लागली नाहीं, आणि ह्मणूनच ज्याच्या अंगीं कांहीं दैवी शक्ति आहे असा भोळ्या लोकांमध्यें समज पसरला होता, त्याच्या दैवाची

विचित्र लीला ऐकून कोणीही सहृदय मनुष्य बुचकळयांतच पडेल. बेमिस हाइटस्च्या लढाईंतलि अतुल पराक्रमाबद्दल ज्याला मेजर जनरलचा हुद्दा मिळाला, फिलाडेलफियासारख्या राजधानीचे संरक्षण करण्याचा मान ज्याला मिळाला, त्याचाच पुढें नैतिक अधःपात झालेला पाहून वसाहत-वाल्यांचे मनास फार दुःख झालें व त्यांचेमध्यें कांहीं काल औदासन्यि पसरले. बेनिडिक्ट अॅर्नोल्डचे एका उमरावाचे मुलीवर मन बसलें, व फिला-डेलफिया येथे त्याचा विवाह झाला. पुढें बऱ्या बऱ्या लोकांत त्याला आमंत्रणे येऊं लागलीं. त्या लोकांमध्यें बरेच राजनिष्ठ व्यापारी व इतर गृहस्थ होते. त्याची रहाणी चैनीची बनली व खर्च न निभावल्यामुळे आणि व्यसनपिणामुळे तो कर्जबाजारी झाला. सैन्याच्या खर्चाचें खाते त्याच्याकडे असल्यामुळें त्याने पैशाची पुष्कळ अफरातफर केली, त्याच्यावर लष्करी खटला भरण्यांत आला. व त्यांत त्याला थोडी शिक्षा झाली.

त्याच्या सुदैवानें त्याला पुन्हां लष्करी हुद्दा मिळाला व त्याची वेस्ट पॉईटचा किल्लेदार ह्मणून नेमणूक झाली व तेथील दारूगोळयाचे कोठार व लष्करी सामानाची कोठी त्याचे ताब्यांत आली. पूर्वी झालेल्या शिक्षेचे दिवसापासूनच वसाहत सरकार व वसाहतवाले यांच्याबद्दल त्याचे मनांत तेढ उत्पन्न झाली होती व तो सुडाचा विचार करीत होता. किल्ला ताब्यांत येतांच ब्रिटिश जनरल सर हेनरी क्लिंटन याच्याशी त्याने पत्र-व्यवहार सुरूं केला. एक मोठी रक्कम घेऊन कांहीं एक हालचाल न करितां ब्रिटिश सैन्य हड्सन नदींतून वेस्ट पॉईटपर्यंत येतांच तो किल्ला त्याचे हवालीं करण्याचें बेनिडिक्ट अर्नोल्ड यानें वचन दिलें.

नक्की व्यवस्था करण्याकरितां सर हेनरी क्लिंटन याने जॉन अॅड्री नांवाचे गृहस्थास बेनिडिक्ट अर्नोल्डकडे पाठविलें. दहा हजार पौंड लाच घेऊन वेस्ट पॉईंट किल्ला कशा रीतीनें शत्रूचे हवालीं करावयाचा याचा विचार करण्यासाठीं दोघेही रात्रीं एका जंगलांत गुप्तपणें जमले. रात्र-भर विचार करून अॅड्री परत हडसन नदींतील आपले बोटीकडे फिरला. पण ही बोट वसाहती गोलंदाजांनीं अगोदर नदींतून लोटून दुसरीकडे नेऊन ठेविली होती. अमेरिकन हद्दींतून पलीकडे जाण्याचा पासपोर्ट जरी अॅड्री-

जवळ होता व त्यावर अर्नोल्डची खास सही होती, तरी दोनतीन सैनिकांस त्याचा संशय आल्यावरून, त्यांनी ॲड्री याची झडती घेतली, व त्या झडतींत हा करारनामा बाहेर पडला. त्या सैनिकांनी ॲड्री यास नजीकच्या ठाण्यावर नेऊन ठाणेदाराच्या हवाली केले. पण या ठाणेदारानें मूर्खपणानें सर्व हकीकत आर्नोल्डलाच कळविली

आर्नोल्डच्या कानी आपल्या फितुराचा परिस्फोट झाला ही बातमी पडतांच, त्यानें घाईघाईने आपल्या पत्नीस कांही मजकूर सांगितला. व तो तसाच हडसन नदीकडे पळून गेला, व एका बोटींत बसून पसार झाला. दुर्दैवानें ॲड्री हा मात्र वसाहतवाल्याच्या हाती लागला. लढाईचे कायद्या-प्रमाणें फितुरी करण्याचे प्रयत्नाबद्दल, ' मी शिपाईगडी आहे, मला गोळी घालून ठार मारा ' असे तो विनवीत असताना देखील त्याला फांशीं देण्यांत आले. बेनिडिक्ट अर्नोल्ड मात्र आपले शत्रु पक्षास मिळाला.

अशा तऱ्हेनें इ. स. १७८० चें साल संपवून नवीन वर्ष उजाडले. स्वातंत्र्याच्या संपादनासाठी केलेल्या खटाटोपापासून कांहीं निश्चित लाभ होईलच अशी अजून खात्री वाटेना. शिवाय बेनिडिक्ट अर्नोल्डच्या कथेने कोणत्या वेळीं कोण फितूर होईल याविषयी बेभरंवसा वाटूं लागला होता, अशावेळी नवीन आशेचे किरण क्षितिजावर चमकूं लागले. फ्रान्स देशाप्रमाणे हालंडलाही अमेरिकन स्वातंत्र्ययुद्धाबद्दल सहानुभूति वाटूं लागली होती. व त्याचेकडून थोडी का होईना निश्चित मदत येऊं लागली होती. बेंजामिन फ्रॅंकलिनने ज्याप्रमाणे फ्रेंच राष्ट्राकडून व्यापारी तह घडवून आणिला होता, तशाच प्रकारचा व्यापारी तह हालंडशीं-ही घडवून आणण्याचा प्रयत्न वसाहतींतर्फे चालू होता. ब्रिटिश वकि-लांच्या नजरेस वसाहतवाल्यांची ही कारवाई आली होती. पण खुद्द हालंडच बळकट असल्यामुळें या माहितीचा कांहीं उपयोग झाला नाहीं. ब्रिटिश वकिलांनीं हालंडला धमकावण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. व शवटीं तारीख वीस डिसेंबर रोजीं त्यांनीं हालंडशीं युद्धच जाहीर केलें.

इंग्लंडनें हालंडशीं युद्ध जाहीर केलें या गोष्टीचा अमेरिकन चळवळी-वर जितका लवकर परिणाम व्हावयास पाहिजे होता, तितका लवकर तो

झाला नाहीं याचें कारण वसाहतवाल्यांची स्थिति दिवसेंदिवस खालावत चालली हाती हें होय. वसाहत-सैन्यांत असंतोष उत्पन्न झाला. व सैनिकांनीं बंड करण्याचा बेत केला. बिचाऱ्यांनीं कितीतरी दिवस थंडीवाऱ्यांत अन्न-पाण्यावांचून कंठले व पुढें त्यांना दम निघेना. ब्रिटिश सेनापति सर हेन्री क्लिंटन यानेंही फितुरीचो कारवाई सुरूच ठेवली होती. इ. स. १७८१ सालच्या जानेवारी महिन्याच्या पहिले तारखेस वसाहती सैन्य बंड कर-ण्याचे इरादानें मोकाट सुटलें. व त्यानें फिलाडेलफियावर आपला मोर्चा वळविला. प्रिन्स्टननजीक त्याला सर हेनरी क्लिंटनचे लोक मिळाले. व त्यांनीं वसाहतवाल्या सैन्यानें पुन्हां ब्रिटिशांविरुद्ध लढूं नये, या अटीवर त्याला मदत करण्याचें व पैसा वगैरे देण्याचें आश्वासन दिलें. पण उलट, बंड करण्यास निघालेल्या या वसाहती सैन्यास हेनरी क्लिंटनच्याच लोकांच्या देशद्रोहीपणाबद्दल राग येऊन त्यांनाच पकडून त्यानें जनरल वायन याज-कडे आणिलें व हेर समजून त्यांना फासावर लटकाविण्यांत आलें. या वसा-हती सैन्याचे सत्कृत्याबद्दल कॉंग्रेसनें त्याला बक्षिसें दिली, तींही या स्वाभि-मानी सैन्यानें नाकारिली. कॉंग्रेसनें लढाईचे कामीं जी हेळसांड चालविली होती तिला मात्र वरील प्रकारानें आळा बसला व वॉशिंग्टनला त्याबद्दल किंचित् बरें वाटलें.

वसाहतवाल्या सैन्यानें वरीलप्रमाणें जी शिस्त मोडली त्यामुळे फार वाईट परिणाम झाला. लहान सहान कारणावरून संप करण्यास इतर ठिकाणचे सैनिकांस उत्तेजन मिळाल्याप्रमाणे झालें. जानेवारीचे मध्यास पॉमटन् येथील न्यू जर्से ब्रिगेडनें काहीं कारणावरून हत्यारें खालीं ठेविलीं. वॉशिंग्टननें या प्रकाराचा कायम बंदोबस्त करण्याचें ठरविलें. त्यानें दुसरी-कडून पांचशें सैन्य एकदम बोलावून या सैन्यास निःशस्त्र केलें व त्याचे-पैकीं बारा पुढाऱ्यांस पकडलें व त्यांचेच हातून त्यांच्यापैकीं दोघांस फांसावर लटकाविण्याचें काम करून घेतलें. त्यामुळें त्याची सर्व सैन्यावर उत्तम जरब बसली.

या प्रकारानंतर वॉशिंग्टननें कॉंग्रेसला सैन्यांतील लोकांच्या खाण्या-पिण्याचा व कपड्यांचा बंदोबस्त उत्तम राखून सैन्यांत उत्पन्न होणाऱ्या असंतोषास आळा घालण्याबद्दल आग्रहाचीं पत्रें लिहिलीं, व नंतर कॉंग्रेसनें स्वदेशाकरितां प्राण देण्यासही तयार झालेल्या आपल्या वसाहत बंधूंबद्दल योग्य ती खबरदारी घेण्याचें आश्वासन दिलें.

रॉबर्ट मॉरिस, ज्यानें आपले सर्वस्व लढाईचे खर्चाकरितां अर्पण केलें होतें, त्याला कॉंग्रेसनें खजिन्याचा अधिकारी नेमलें, व त्याच्याच देख-रेखीखालीं ' बॅक ऑफ नॉर्थ अमेरिका ' ही संस्था चालू केली. परराष्ट्रीय कर्ज आतांच देऊन टाकणें शक्य नव्हते, पण एकंदरींत सर्व कर्जाबद्दल हमी घेणारे लायख देशभक्त व श्रीमंत गृहस्थ पुढें आल्यामुळें तितकी ओढाताण झाली नाहीं.

बेनेडिक्ट अर्नोल्ड न्यू यॉर्क येथें पोहोचतांच त्याला दहा हजार पौंड बक्षीस म्हणून ब्रिटिश सेनापतीकडून मिळाले. इतकेंच नव्हे तर, ब्रिगेडियर जनरलचा हुद्दा ब्रिटिश सेनेंत मिळाला. त्याचे हातांखालीं कांहीं जहाजें मिळालीं व १६०० सैन्यही मिळालें. व्हर्जीनियावर स्वारी करण्याकरितां त्याला पाठविण्यांत आलें. वॉशिंग्टन व मेजर ली या दोघांनीं आर्नोल्ड यास पकडण्याची फार खटपट केली. एकदां त्यांनीं सैन्यांतील जॉन चॅपे यास बळेंच पळून जाऊन शत्रूस फितूर होण्याचें सोंग करून अर्नोल्डपर्यंत पोहो-चण्यास सांगितले, जॉन चॅपे याचे बरोबर दुसरे तीन निवडक लोक देण्यांत आले होते. त्यांनीं योग्य तो बहाणा करून अर्नोल्ड यास फसवून अमेरिकन हद्दींतून आणण्याचा पुरता कावा केला होता. पण ऐनवेळीं अर्नोल्ड यास दुसरीकडे स्वारी करण्याचा हुकूम मिळाल्यामुळें तो बेत फिसकटला. अर्नोल्डनें ' जेम्स ' नदी ओलांडून व्हर्जीनियावर ह्मणजे आपल्याच जाति-बांधवांवर हल्ला केला. त्याला स्वारीवर पाठविण्यांत उपयुक्ततेपेक्षां वसाह-तवाल्यांस हिणवून त्यांचा तेजोभंग करण्याचा हेतु प्रमुख होता. देशभक्त अर्नोल्ड व शीलभ्रष्ट राष्ट्रद्रोही अर्नोल्ड यामध्यें फरकही दिसून येऊं लागला. आतां त्याचे अंगीं पराक्रमापेक्षां सूडाची बुद्धीच जास्त परिणत झाली होती. मानसिक दौर्बल्य व हिणकस मनोवृत्ति त्याचे कृत्यांत पुरेपूर

दिसून येऊं लागली. जाईल तेथें आगी लावीत सुटणें, स्वकीयांचा अनवश्यक छळ करणें, शेती व खाजगी मालमत्ता विनाकारण उध्वस्त करणें अशी शूर पुरुषांस अनुचित कृति त्याचे हातून होऊं लागली व मानवी अधःपाताचा तो मूर्तिमंत पुतळाच आहे की काय, असा वसाहतवाल्यांचा त्याचेविषयीं ग्रह होऊं लागला. एकंदरीत त्याच्या दुष्ट कृत्यांनीं त्याची तात्कालिक कां होईना चलतीच चालल्याप्रमाणे दिसूं लागलें. बराचसा मुलूख बेचिराख केल्यानंतर त्याने हॅमटन रोड्सनजीक पोर्ट्समाऊथ येथें तळ दिला. मुलूख उध्वस्त करून वसाहतवाल्यावर दरारा बसविण्याचे त्याच्या कामावर खूष होऊन हेन्री क्लिंटन याने आर्नोल्डचे मदतीस जनरल फिलिप्स यास दोन हजार सैन्य बरोबर देऊन पाठविले. त्या दोघांनीं व्हर्जीनियांतील अत्यंत सुपीक भागात शिरून पिकांची व मालाची भयंकर नासाडी आरंभिली, जिकडे तिकडे आग लावीत ते शिरले. आपल्या बरोबर जनरल फिलिप्स यास पाठविण्यांत व त्यालाच मुख्य अधिकार देण्यांत सर हेनरी क्लिंटन यानें आपणावर जितका विश्वास दाखवावा तितका दाखविला नाहीं याचे अर्नोल्ड यास फार वैषम्य वाटत होते. पण लवकरच जनरल फिलिप्स यास मृत्यु आल्यामुळें थोडे दिवस तरी बेनिडिक्ट आर्नोल्ड हा व्हर्जीनियात ब्रिटिश सेनेचा मुख्य अधिकारी म्हणून वावरला खरा. तारीख २० मे रोजीं लॉर्ड कॉर्नवालीस पीटर्सबर्ग येथें येऊन पोहोंचला व त्याने अर्नोल्ड यास रजा दिली, त्यानंतर अर्नोल्ड यास दुसरें कमिशन मिळाले. त्यानें आपले रहाते गांव न्यू लंडन इकडे मोर्चा वळविला. वाटेंत फोर्ट ग्रीसवोल्ड किल्ल्यावर हल्ला करून त्यानें तो सर केला, व कर्नल लिडयार्ड नांवाच्या त्या किल्ल्याच्या रक्षकास व त्याचेबरोबरचे सत्तर लोकांस ते शरण आले असतांही, ठार मारण्यांत आलें. त्यानंतर त्या शहरांतील एकूण एक इमारतींस आग लावण्यांत आली. गावांतील मुख्य चर्चचे टॉवरवर बसून आर्नोल्ड सर्व प्रकार पहात होता. गावांत कत्तल चालू असतांच घोड्यावरून फिरून त्यानें सर्व प्रकार अवलोकन केला. गावांत कत्तल चालू असतांना एका तरुणीनें आप बापाच्या वधाचा सूड म्हणून त्याचेवर बंदूक झाडली, पण नेम चुकल्यामुळे



एका शूर कुमारिकेनें पितृवधाचा सूड घेण्याकरितां बेनिडिक्ट आर्नोल्डवर गोळी झाडली.

पान १८६.

अर्नोल्ड जिवानिशीं वांचला. त्यानें त्या तरुणीच्या शौर्याची तारीफ केली. व तिला कांहीं एक शिक्षा न करितां जळत्या गावांतून तो तसाच परत फिरला.

सॅंडर्स क्रीकचे लढाईत अमेरिकन लोकांचा पराभव झाल्यानंतर अमेरिकन सैन्याचें आधिपत्य जनरल ग्रीन याजकडे देण्यांत आलें. नॉर्थ कॅरोलिनामधील शार्लोटी या गांवाजवळ त्याने सैन्य जमविण्यास सुरुवात केली, त्यावेळीं जनरल डॅनियल मॉर्गन नांवाचा योद्धा तरुण असून फार प्रसिद्धीस आला होता. त्याला ग्रीननें मदतीस घेतलें, व ब्रिटिश सैन्यावर हल्ले करण्यास प्रारंभ केला. व कौपेन येथे ब्रिटिश सेनापति टार्लेटन याचा पूर्णपणे पराभव केला. टॉर्लेटनचे पराभवानंतर कॉर्नवालिस यास चिंता वाटूं लागली व त्याने ताबडतोब डॅनियल मॉर्गनचा पाठलाग केला. दुसरी चकमक यारकिन येथे झाली. तेथें कॉर्नवालिस यास बराच वेळ अडकून पडावें लागले पण लढाईत निश्चित निकाल कोणाचेच बाजूनें झाला नाहीं.

इ. स. १७८१ च्या मे महिन्यांत लॉर्ड कॉर्नवॉलिस व्हर्जीनियाकडे वळला. व त्यानें तेथील सैन्याचे स्वतः आधिपत्य स्वीकारिलें. अर्नोल्डनें जेम्स व्हॅलीचा पुरा नायनाट केला होता. वॉशिंग्टननें व्हर्जीनियाचा बंदोबस्त मार्क्विस लाफायेटकडे सोपविला होता. पण त्याचेजवळ पुरेसें सैन्य नसलेमुळें त्याला कॉर्नवॉलिसचे सैन्यावर हल्ला करण्याचें धैर्य होईना. तारीख ६ जुलै रोजीं लाफायेटचे सैन्याची ग्रीन्स स्प्रिंग्ज येथें ब्रिटिश सैन्याशीं अचानक गांठ पडली. आयत्यावेळीं माघार घेतल्यास संपूर्ण नाश होईल हें जाणून लाफायेटच्या सैन्यानें एकदम कॉर्नवॉलिस सैन्यावर तुटून पडण्यास सुरुवात केली. अचानक हल्ला आल्यामुळें शत्रूपाशीं किती सैन्य आहे याचा कॉर्नवॉलिस याला अंदाज बांधतां आला नाहीं. त्यानें तेथून शिस्तीनें माघार घेतली. अमेरिकन सैन्याचें अंगांत पाठलाग करण्याची ताकद नव्हतीच.

त्यानंतर कॉर्नवॉलिस पोर्ट्समाऊथ येथें जाऊन बसला, पण त्यास यॉर्कटाऊन येथें जाण्याबद्दल सर हेनरी क्लिंटन याचा हुकूम झाल्यामुळें यॉर्क नदी व चेसापीक नदी यांचे संगमानजीक जाऊन त्यानें तळ दिल

लाफाएटनें जलदी करून कॉर्नवालीसचे सैन्यापासून फक्त आठ मैलांचे अंतरावर आपलें सैन्य आणून भिडविलें. ताबडतोब त्यानें, आपलें सैन्य तेथें आणून शत्रूस एक सपाट्यानें तडाखा लगावण्याचा आपला मनोदय वॉशिंगटनूला कळविला. काऊंट डी ग्रासे याचें आरमार अमेरिकन आरमारास मदत करण्याकरितां निघालें होतें व तें लवकरच चेसापीक नदींत यावयाचें होतें. यॉर्क नदींत याचवेळीं कोणी तरी आपले आरमार आणील तर फार बहार होणार होती. म्हणजे शत्रूस जमिनीचे बाजूस सैन्यानें व नदीचे बाजूनें आरमारानें कोंडून पुरा विजय मिळविण्याची लाफायेटची योजना होती.

वॉशिंग्टननें आपल्या युद्धकौशल्याची सर्व जगास पूर्ण साक्ष पटवून दिली. त्याचें लक्ष जरी व्हर्जीनियाकडे लागलें होते, व तेथें कॉर्नवॉलिसला पुरें कोंडतां येईल हें त्याला माहीत होतें तरी न्यू यॉर्कजवळ सर हेनरी क्लिंटन याचें जबरदस्त सैन्य असल्यामुळें शत्रूचा पूर्ण पराभव करणें शक्य झालें नसतें. त्यानें एक योजना केली आपलें सर्व सैन्य एकवटून आपण न्यू यॉर्कवर जोराचा हल्ला करणार असल्याचा बाहणा करून त्याने त्याप्रमाणें हालचाली करण्याचें काम चालू केलें सर हेनरी क्लिंटन याचें लक्ष वॉशिंग्टनचे हालचालीकडे लागतांच त्यानें न्यू यॉर्ककडे आपलें सर्व सैन्य नेऊन जोराची लढाईची तयारी चालविली. थोडेसें सैन्य न्यू यॉर्कचे आसपास खोट्या हालचालीकरितां ठेवून थेट वॉशिंगटन व्हर्जीनियाकडे निघाला. विल्यमबर्ग येथे त्यानें मार्क्विस लाफायेटची गांठ घेतली व लढाईचा सर्व बेत समजून घेतला. तेथेंच त्याला समजलें कीं, काऊंट डी ग्रास्से यांचे वीस जहाजांचे आरमाराचा तांडा चेसापीक व यॉर्क नद्यांचे तोंडाशीं दबा धरून अगोदरच बसला आहे. म्हणजे यावेळीं वसाहतवाल्यांस कॉर्नवॉलिस पाहिजे तशा अगदीं माऱ्याचे ठिकाणीं सांपडला होता. याच वेळीं काऊंट डीबरास हा आठ जहाजें व दहा मालबोटी इकडून तिकडे नेण्यासाठीं यार्क नदींत येऊन बसला होता. त्याचे जवळ यार्कटाऊनचे वेढ्याला उपयोगी पडतील अशा पुष्कळ तोफा पण होत्या.



स्वातंत्र्याच्या युद्धाची समाप्ती - लॉर्ड कॉर्नवालीस शरण येतो.

पान १८९.

सप्टेंबर महिन्याचे पांच तारखेस ब्रिटिश ॲडमिरल ग्रेव्हज् यानें काऊंट डी ग्रास याचे आरमारावर हल्ला केला. पण या लढाईत ब्रिटिश आरमाराचें जबरदस्त नुकसान झालें व तें न्यू यॉर्क बंदरांत जाऊन स्वस्थ बसलें. तारीख २८ सप्टेंबर रोजीं वसाहती सैन्यानें कॉर्नवालीसचे सैन्याचे अगदीं जवळ तळ दिला. व खंदक वगैरे खणून वेढ्याचें काम चालूं झालें. तारीख ६ ऑक्टोबर रोजीं शत्रूपासून अवघ्या सहाशे यार्डपर्यंत खंदकाची रांग पुढे गेली व तेथून शत्रूवर एकसारखा तोफांचा भडिमार सुरूं झाला. तारीख ११ आक्टोबरपर्यंत वसाहती सैन्य फक्त तीनशें यार्डावर येऊन ठेपलें व तोफांचा जोराचा भडिमार कॉर्नवालीसचें सैन्यावर सुरूं झाला. पुढील दोन तीन दिवसांत कॉर्नवॉलिसचे सैन्यानें वेढ्यांतून बाहेर पडण्यासाठीं जोराचे हल्ले चढविले पण उपयोग झाला नाहीं. ता. १७ ऑक्टोबर रोजीं लॉर्ड कॉर्नवालीसकडून शरणचिठ्ठी आली. तारीख अठरा रोजीं तहाच्या अटी निश्चित करून नंतर भडिमार बंद करण्यांत आला. तारीख १९ रोजीं दोन प्रहरीं मेजर जनरल ओहॅरा, फ्रेंच व अमेरिकन ऑफिसरासमोर सात हजार दोनशें सत्तेचाळीस ब्रिटिश व हेसिअन शिपाई हत्यारें स्वाधीन करण्याकरितां घेऊन आला. तेथें त्यांनीं ब्रिटिश निशाण वसाहती ऑफिसरांचे ताब्यांत दिलें. व सर्वजण कैदी झाले. लार्ड कॉर्नवॉलीस यानें आजारीपणाचें ढोंग केलें होतें, पण त्याचीं हत्यारेंसुद्धां जनरल लिंकन यानें काढून घेतलीं. खुद्द वॉशिंग्टनलाहीं या महायोद्धयाचा पराभव झालेला पहाण्यांत आनंद वाटेना, त्याचप्रमाणें आठशेंचाळीस आरमारी फौज वसाहतवाल्यांस शरण आली; व पंचाहत्तर हजार पितळी तोफा आणि एकतीस लोखंडी तोफा या वेढ्यांत मिळाल्या. अशा रीतीनें लॉर्ड कॉर्नवॉलिस शरण आल्यापासून ब्रिटिश सत्तेला अमेरिकेंत जोराचा धक्का बसून ती कायमची नष्ट झाली.

तारीख तेवीस ऑक्टोबर १७८१ रोजीं लॉर्ड कॉर्नवालीस आपल्या सर्व सैन्यासह शरण आला. व सर्व युद्ध संपलें अशी बातमी फिलाडेलफिया येथें येऊन पोहोंचली. थोड्याच वेळांत सर्व फिलाडेलफिया शहर विजयोत्सवानें दुमदुमून गेलें. " सर्व माणसांचा दर्जा जन्मतः एकसारखाच आहे " असें तत्व ज्या शहरानें पृथ्वीचे पाठीवर प्रथमतःच प्रतिपादन

केलें त्या बंधुप्रीतीच्या फिलाडेलफिया शहरांत प्रथम विजयोत्सव व्हावा हें उचितच होय. दुसरे दिवशीं सकाळींच कॉंग्रेसचें खास अधिवेशन झालें, कॉंग्रेसचे सदस्यांस सेनापति जॉर्ज वॉशिंग्टनकडून आलेला खलिता वाचून दाखविण्यांत आला. त्यांत विनयपूर्ण शद्बांत शत्रूच्या पराजयाची संपूर्ण हकीकत निवेदन केली होती. सर्व सभासदांस आनंदाश्रू आवरेनात. सद्गदित अंतःकरणानें व अश्रुपूर्ण नयनांनीं ते डच् लूथर्न चर्चमध्ये परमेश्वराच्या प्रार्थनेसाठीं जमले. दोन प्रहरीं तेथेच मोठ्या थाटानें आभारप्रदर्शन झाले. देशाच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोकापर्यंत प्रजासत्ताक राज्याच्या जयजयकाराच्या आरोळ्या ऐकूं येऊं लागल्या. अगदी म्हातारे कोतारेसुद्धां दास्यविमोचनाच्या आनंदाने बेहोष होऊन नाचता बागडतांना दिसूं लागले. कारण आतां ब्रिटिश सत्तेची अमेरिकेंतून पुरी हकालपट्टी होणार हे निश्चितच झाले होते.

शरण आलेल्या ब्रिटिश फौजेस ' पेन्सिलव्हॅनिया ' मधील ' लॅकस्टर ' गावीं नेण्यात आलें होतें. तह पूर्ण होण्यावर तिची सुटका अवलंबून होती. वॉशिंग्टन हडसन नदीवरील न्यू जर्से येथील कॅपांत जाऊन राहिला. कॉर्नवॉलिसच्या सैन्याच्या पराभवाची बातमी ऐकून यूरोपांतील बहुतेक राष्ट्रांच्या प्रजाजनांस आनंद झाला. खुद्द इंग्लंडचे राजास व प्रधान मंडळास या पराभवानें फार वाईट वाटलें व ते साहजिकच होतें. पण त्यांतल्यात्यांत कांहीं ब्रिटिश प्रजाजनांस सुद्धां अमेरिकेबद्दल नैसर्गिक सहानुभूति असल्यामुळें दुःख झालें नाहीं. हे जेव्हां राजाचे व प्रधान मंडळाचे नजरेस आलें, त्यावेळीं मात्र त्यांच्या दुःखावर डागण्या बसल्याप्रमाणें झालें. अमेरिकेच्या विजयाबद्दल खुद्द इंग्लंडांत सुद्धां, बऱ्याच उदार मतवादी लोकांस सहानुभूति वाटत होती.

अमेरिकेतलि पराभवानें इंग्लंडांतील प्रधानमंडळाची संख्या ताबडतोब कमी होऊं लागली व लवकरच मुख्य प्रधान लॉर्ड नॉर्थ व त्याचे सहकारी मित्र यांना राजीनामा देणें भाग पडलें. नवीन प्रधानमंडळ आस्तित्वांत आलें त्यांत, अमेरिकेच्या स्वातंत्र्याच्याविरुद्ध कोणी नव्हतें, व असून

उपयोगही नव्हता. लढाईच्या खर्चामुळें टेंकीस आलेल्या प्रधानमंडळाला भीक नको पण कुत्रा आवर असें होऊन गेलें होतें.

इ. स. १७८२ चें मे महिन्यांत अमेरिकेतील मुख्य सेनापति सर हेनरी क्लिंटन यांस परत बोलाविण्यांत आलें. नवीन सेनापति गाय् कार्लेटन हे अमेरिकन स्वातंत्र्याच्या आड येणारे नसल्यामुळें त्यांची नेमणूक सहजच झाली.

जॉर्ज वॉशिंग्टनचे धोरण उदार व शांतपणाचें होते. आणि जरी न्यू यॉर्कचे आसपास कांही झटापटी होत होत्या तरी तिकडे लक्ष न देतां त्याने सामोपचाराने वागून नवीन कटकटी उत्पन्न होऊं दिल्या नाहीत. या संक्रमणाचे कालींही त्याच्या अभिजात थोरपणास व खानदानीच्या मनोवृत्तीस न शोभण्यासारखें एकही कृत्य त्याच हातून घडले नाही.

आपल्यास अनुकूल असा तह लवकरच घडवून आणण्यासाठीं कॉंग्रेसने जोराची खटपट चालविली. जून महिन्यात रिचर्ड ऑस्वॉल्ड यास ब्रिटिश पार्लमेंटनें पॅरिस येथे वसाहतींचे वकील सर बेंजामिन फ्रॅकलिन व जे यांच्याशीं तहाच्या वाटाघाटींसाठी पाठविले. त्याच सुमारास हालंडचे दरबारीं, अमेरिकन वकील जॉन ॲडॅम्स हाही पॅरिस येथें दाखल झाला. तारीख तीस नोव्हेंबर १७८२ पर्यंत तहाच्या वाटाघाटीचा नक्की खर्डा तयार होऊन त्यावर ब्रिटिशांतर्फे ऑसवॉल्ड यानें सही केली. व बेंजामिन फ्रॅंकलिन, जे, व ॲडाम्स यांनीं युनायटेड स्टेट्सतर्फे सह्या केल्या.

इ. स. १७८३ चे एप्रिल माहिन्यांत कॉंग्रेसनें ऑसवॉल्ड-फ्रॅंकलिनचे तहास मान्यता दिली, परंतु पुढे बरेच दिवस तहाचा जाहिरनामा बाहेर पडला नाहीं. त्याचें मुख्य कारण असे की, अंतरराष्ट्रीय राजकारणाचे गुंतागुंतीमुळें इंग्रज मुत्सद्यांचें लक्ष चलबिचल झालें होतें. आतां इंग्रज मुत्सद्यांस वाटूं लागलें कीं, फ्रान्स आयत्या वेळीं अमेरिकनांचे मदतीस धावून गेल्यामुळे आपला पराजय झाला. झाली ती गोष्ट होऊन गेली, पण आतां अमेरिकेशीं तेढ धरून तरी काय उपयोग ? फ्रेंच लोकांबरोबर अमेरिकनांचे स्नेह-संबंध राहणें नैसर्गिक आहे, पण आपणही खटपट करून त्यांना प्यार व्हावें व हळू हळू फ्रान्सशीं असलेल्या त्यांच्या मैत्रींत फूट

पाडावी अशा तऱ्हेची स्पर्धाजनक वृत्ति त्यावेळच्या प्रधानमंडळाच्या अंगीं बाणली होती.

कांहीं झालें तरी आपण ब्रिटिश व अमेरिकन एका रक्ताचे आहोंत व आपली भाषाही एक आहे. मतभेदामुळें लढाई झाली तरी तेवढ्या पुरतीच. कांहीं झाले तरी इंग्लंड हा अमेरिकनांचा मायदेश आहे अशा तऱ्हेची साखर वसाहतींतून पेरण्याची खटपट सुरूं झाली. उद्योगधंदे व व्यापारास परत लवकरच दोन्ही देशांमधे सुरुवात व्हावी अशा तऱ्हेची आतुरता ब्रिटिश अधिकाऱ्यांकडून दाखविण्यांत येऊं लागली.

फ्रेंच लोकांसंबंधाचे अमेरिकन लोकांचें प्रेम सहजासहजीं कमी होण्यासारखे नव्हते. नफेबाजी, जुलूमजबरदस्ती आणि अन्याय यांच्या पासून अमेरिकन लोकांचा फार छळ झाला होता. लढाई संपतां संपतां ब्रिटिश लोकांनीं जाळपोळ व नासधूस केलेलीं शेतें अजून अमेरिकन लोकांचे नजरेआड झालीं नव्हतीं, त्यामुळें ब्रिटिशांचे साखरपेरणीचे कामी त्यांना लवकरच यश येणें शक्य नव्हतें. तशांतून आतां इंग्लंड व फ्रान्स यांमध्ये प्रत्यक्ष लढाई सुरूं झाल्यामुळें तहाचें काम मागें पडत चाललें होतें. शेवटीं तारीख ३ सप्टेंबर १७८३ रोजीं लढाईत पडलेल्या सर्व राष्ट्रां- मध्यें मिळूनच तह झाला. त्या दिवशीं पॅरिस येथें इंग्लंड, फ्रान्स, हालंड, स्पेन व युनायटेड स्टेटस येथील वकिलांनीं तहनाम्यावर सह्या केल्या व कायम शांततेचा तह घडून आला. त्याच दिवशीं युनायटेड स्टेटसला कायम स्वातंत्र्य मिळालें असें मानिलें पाहिजे.

इ. स. १७८३ चा तह या नवीन राष्ट्रास समाधानकारक झाला असें म्हटलें पाहिजे. त्यांत त्यांला पूर्ण स्वातंत्र्यहि मिळालें. या तहांत ग्रेट- ब्रिटननें स्पेनला फ्लॉरिडा प्रांत परत दिला. मिसिसिपीचे पूर्वेकडील सर्व मुलूख व दक्षिणेकडे फक्त मेक्सिकोपर्यंतचा सर्व मुलूख युनायटेड स्टेट्सला मिळाला. मिसिसिपी नदींतून व ग्रेटलेक्स मधून नौकानयनाचा हक्कही युनायटेड स्टेट्सला मिळाला. सेंट लॉरेन्स नदीवरील पूर्ण ताबा, कानडाचा सर्व प्रांत आणि नोव्हास्कोशिया हीं ब्रिटिशांकडेच असावींत असें ठरलें.

ब्रिटिश लोकांनी अमेरिकन किनारा हळूं हळूं खाली करून देण्यास सुरुवात केली. इ. स. १७८३ साली सर गाय् कार्लेटन याला न्यू यार्क खाली करून देण्याबद्दल नोटीस मिळाली. या महत्वाचे हालचालीची तयारी होण्यास सुमारें तीन महिने लागले. तारीख २५ नोव्हेंबर रोजी ब्रिटिशांनी आपले बिऱ्हाडबाजले न्यू यॉर्क शहरांतून कायमचे उचलले. व त्यांचे जहाजांची शिडें अगदीं लहान लहान दिसूं लागली. न्यू यॉर्क शहराचे इमारतीचे छपरांवरून, खिडक्यांतून व गोद्यांतून डोकावून पाहणाऱ्या प्रेक्षकाना शत्रू परततानां पाहून, त्यांनीं केलेल्या मर्कटलीला, जाळपोळ, जुलूम-जबरदस्ती व प्राणनाश यांची फिरून आठवण झाली असेल, व ' इडा पिडा टळो व तुमचे पुनरागमन कधींही न होवो ' असा त्यांनी आशीर्वाद दिला असेल ! तारीख १४ डिसेंबर १७८२ रोजी चार्लसटन ब्रिटिशांनीं खाली करून दिलें. अशा तऱ्हेने त्या दिवशी फ्लॉरिडापासून तो तहत पेनोब स्कॉट पर्यंत एकूणएक अमेरिकन किनाऱ्यावरून ब्रिटिशांनी कायमचे काळे केले व अतःपर कोणी आपल्यास धाकदपटशा दाखवील, त्रास देईल अगर फूट पाडून आपणांस गुलामगिरीत राबवील अशी भीति उरली नाही.

आठ वर्षांच्या अविश्रान्त श्रमाचें बीज आज स्वातंत्र्याचे रूपानें पदरीं पडल्यामुळे व इतर राष्ट्रांच्या बरोबर आपणांस वागतां येईल या मोहक कल्पनेनें सर्व लोक खुष झाले होते. तारीख ४ डिसेंबर रोजीं, ज्यावेळी वॉशिंग्टन विश्रांति घेण्याकरितां म्हणून घरी जावयास निघाला त्यावेळीं त्याचे इष्ट मित्रास भडभडून आलें, त्यावेळीं वॉशिंग्टनला मुळींच बोलवेना. त्याचा कंठ भरून आला. सद्गदित अंतःकरणानें कसेतरी चार शब्द तो बोलला. आणि त्याची नाव सुरू झाली. आतां त्याचे वयास बावन्नावें वर्ष लागलें होतें. लढाईचे कटकटीनें त्याचा जीव बेजार झाला होता. व अकाली वार्धक्याची छटा त्याचे चेहेऱ्यावर दिसून येत होती. त्याच्या एकनिष्ठपणामुळेंच त्याचे अतिशय हाल झाले होते. आज सहा वर्षांनंतर तो परत आपले माऊंट व्हर्नान येथील ' रीं परत जात होता.

निघण्याचे दिवशी त्याने आपले सैन्याशीं व एकूण एक अधिकाऱ्यांशीं हस्तांदोलन केलें. त्याच्याबरोबर ज्या वीरानीं अनेक हाल सोशीले होते त्यांना या वेळीं रडूं कोसळले. त्यानंतर तो पायींच ' व्हाइट हॉल ' नगर मंदिराकडे गेला. त्याचेबरोबर नागरिकांचे थवेच्या थवे चालत होते. त्यानंतर ॲनॉपॉलिस येथें कॉंग्रेस भरली होती, तेथें तो हजर झाला. आठ वर्षे खर्च केलेल्या सर्व पैशाचा हिशेब अगदीं पैन पै चोख ठेवला होता, तो त्यानें कॉंग्रेसला सादर केला. निघतांना त्याचे रस्त्यावर वृद्ध वृद्ध नागरिक त्याला आशिर्वाद देण्यास उभे होते, ते धावून पुढे आले. लहान लहान मुले त्याचा जयजयकार करून ओरडूं लागलीं. तरुण कुमारिकांनीं त्याचे रस्त्यावर फुलेंही पसरून ठेविलेलीं होतीं.

निघण्याचे दिवशीं म्हणजे तारीख तेवीस डिसेंबर रोजी त्यानें ॲनॉपॉलीस येथें कॉंग्रेससमोर सविस्तर हकीकतीचें भाषण केलें. त्याचें भाषण अत्यंत हृदयस्पर्शी व विद्वत्तापूर्ण होतें, तरी पण त्यांत त्याच्या विनयशील स्वभावाची ओळख पूर्णपणें पटत होती. त्या दिवशीं त्यानें अमेरिकन सैन्याचा सेनानायक या हुद्याची तलवार खालीं ठेविली. त्यावेळचा प्रेसिडेंट मिफ्फिन यानें त्याचे यशोवर्णनात्मक यथोचित भाषण करून त्याचा मोठा गौरव केला. व शांतपणें कांहीं दिवस पूर्ण विश्रांति घेण्याकरितां या भाग्यशाली वीरास मोकळें केलें. गेल्याच वर्षी या वीरास अमेरिकेचा राजा करावें अशी जोराची चळवळ सुरूं झाली होती, पण त्या थोर गृहस्थास संयुक्त संस्थानांचा राजा होण्यापेक्षां साधारण नागरिक राहण्यांतच अधिक अभिमान वाटत होता.

युद्धस्य कथा रम्या, ही गोष्ट खरी आहे. लढाईच्या हकिकती सामाजिक प्रगतीच्या मंद इतिहासापेक्षां अधिक मनोरंजक वाटतात ही गोष्ट जरी खरी आहे तरी गेल्या आठ वर्षांत अमेरिकेच्या सामाजिक जविनांत कसेकसें फरक घडून आले याचें अवलोकन केल्या शिवाय पुढील कालांत घडलेल्या गोष्टींवर नीट प्रकाश पडणार नाहीं. अमेरिका आतां स्वतंत्र देश झाला होता. ज्या महाभागांनीं या लढ्यांत प्रवेश केला होता त्यांना लढ्यांत पडतांना पुढें नक्की काय

घटना करावी लागेल याचा मुळीच अंदाज नव्हता असे ह्मटलें तर अतिशयोक्ति होणार नाहीं. सुरुवातीस तर अडवणूक करून ब्रिटिश लोकांस जेरीस आणूं, व ते लवकरच ह्मणजे वर्ष सहा महिन्याचे आत आपल्या मागण्या मान्य करितील व आपल्यास ब्रिटिश साम्राज्याखालीं सुखानें व समाधानानें राहतां येईल असाच पुढाऱ्याचा कयास होता. एक दोन दूरदृष्टि गृहस्थां शिवाय पूर्ण स्वातंत्र्याचा दिवस उगवेल अशी प्रथम कोणास कल्पनाही नव्हती. तेरा वसाहतींत मिळून एकंदर मुलूख तरी कितीसा होता ? पण पुढें थेट मिसिसिपीपर्यंतचा व दक्षिणेकडे मेक्सिको पर्यंतचा मुलूख ताब्यात आल्यामुळे पुढाऱ्याच्या चित्तवृत्ती किंचित-काल भांबावल्यासारख्या झाल्यास आश्चर्य मानण्यासारखें काहीं नव्हते. व अशा अनिश्चित राज्यपद्धतीत ५--६ वर्षे या नवीन राष्ट्रास काढावीं लागलीं. व त्याच कालांत नवीन सुकर अशी राज्यघटना तयार करावी लागली. लढाईच्या वेळीं खवळलेल्या मनोवृत्तींच्या एकतानतेनें जरी तात्पुरतें ऐक्य वसाहतींत झाले होतें, तरी एकंदर वसाहतींची घटनाच युरोपांतील निरनिराळ्या लोकांची बनलेली होती व त्यांच्यांत धार्मिक मतांचें बंड फार होतें. त्यामुळें लढाईनंतरच्या शांततेच्या कालांत त्यांची दिलजमाई होणें कांहींसें कठिण झाळें. त्यांच्यांत विचारवंत असे पुढारी व उदार धोरणाचे मुत्सद्दी नसते तर मिळालेल्या स्वातंत्र्याचा त्यांना मतभिन्नत्वामुळें उपभोग घेतां आला असता कीं, नाहीं हा मोठा जबरदस्त प्रश्न होता. आपलीं स्वतःचीं मतें बाजूस ठेवून सुद्धां पुष्कळांनीं सार्वजनिक प्रश्नांवर सार्वजनिक मता-धिक्याचा स्वीकार करतांना अलोट स्वार्थत्याग दाखविला. त्यामुळें लढाई-नंतर ६।७ वर्षांनीं तरी त्यांचें एकमत होऊन त्यांना आपला अध्यक्ष नेमतां आला, व त्याचे ठायीं अतुलशक्ति निर्माण करितां आली.

या सात वर्षांमध्यें अनेक सामाजिक व व्यापारी उलाढाली घडून राष्ट्रीय जीवनांत विलक्षण फरक पडला. ज्या कॉंटिनेंटल कॉंग्रेसनें लढाईच्या वेळीं सर्व राज्याचीं सूत्रें हातीं घेतलीं ती तर आयत्यावेळीं बोलाविलेली एक लोकसभा होती, तिला पूर्वीचा इतिहासही नव्हता व अनुभवाची तर

गोष्टच काढावयास यको. तिच्या हाती सत्ताही बेताबाताचीच होती, त्यामुळे प्रत्येक बाबतीत मोठा गोंधळ उडे व त्याचा सामाजिक जीवनावर अनिष्ट परिणाम घडूं लागला.

वसाहतींच्या काळीं लोकांमधील सुबत्ताही ब्रिटनला दिलेल्या कच्च्या मालाच्या अदलाबदलीत त्याचेकडून मिळणाऱ्या पक्क्या मालावर अवलंबून होती. याच अदलाबदलींत वसाहत वाल्यांना शेतीचीं आऊतें, कामकरी लोकांचीं हत्यारे, उद्योगधंद्यास लागणारे सामान, इतकेंच नव्हे तर कपडालत्ता बूटजोडे व इतर नित्य उपयोगाच्या सर्वच वस्तू मिळत. ब्रिटिश भाडवल- वालेही अनेक निमित्ताने व फायद्याच्या आशेने नव्या देशांत आपलें भांडवल आणून ओतीत होते. व या पैसेवाल्या लोकाच्या अनुकरणानें व नैसर्गिक सुबत्तेनें देशांत चैनीची राहणी सुरू होत होती. लढाइ सुरू होतांच ही चैनीची राहणी बंद पडली. चोरून मारून शत्रूशी व्यापार होत होता, पण ब्रिटिश जहाजांनीं इतर देशांतून येणाऱ्या जहाजांवर नियंत्रण ठेवल्यामुळे देशांत तयार मालाचा पुरवठा होईनासा झाला. देशाच्या या टोकापासून त्या टोंकापर्यंत सर्वच ठिकाणीं लढाई सुरूं असल्यामुळे धान्य व निर्वाहाचे नित्य पदार्थ पिकवितांना शेतकरी लोकांस अडथळा येऊं लागला. केव्हां शत्रूचे लोक येऊन लुटालूट करितील किंवा स्वतः- च्याच सैन्याचा तळ येऊन पडल्यामुले त्याला आयत्या वेळीं कसली गरज लागेल याचा अंदाज बांधतां न आल्यामुळें जमिनीचे उत्पन्न घटत चाललें, त्यांतही युरोपांतून येणाऱ्या शेतीच्या आउतांचा तुटवडा भासूं लागला. त्यामुळे सर्व लोक हवालदिल झाले निश्चित अशी चलनी नाण्यांची पद्धत नसल्यामुळें व दररोज चलनाचा भाव खालीवर होत चालल्यामुळें व्यापाऱ्यांस आपण करीत असलेल्या व्यापारांत फायदा होईल कीं तोटा होईल यासंबधीं अंदाज बांधतां येईना. त्यामुळें बेभरंवसा उत्पन्न होऊन व्यापारही संपुष्टांत येत चालला. नाण्याचा भाव घसरत चालल्यामुळें कर्जाची देवघेव बंद झाली. कित्येक वेळीं कर्जफेडीचें काम घटलेल्या बाजारभावामुळें अत्यंत मुलभ होऊन जाई. सरकारी कर्जे- रोखे ज्या सावकारांनीं खरेदी केले त्यांना फार मोठ्या ठोकरा लागल्या,

त्यामुळे सरकारी कर्जरोख्यांस कोणी विचारीना. ब्रिटिश लोकांशीं राजनिष्ठ असलेल्या लोकांची हकालपट्टी होऊ लागल्यामुळें वसाहतींतील महत्वाचे नागरिकांची संख्या घटूं लागली. या गटांत मोठमोठे सरकारी नोकर, व्यापारी सावकार, धंदेवाले व विद्वान लोकही होते. राजनिष्ठेची बाब सोडून दिली तरी सामाजिक दृष्टीनें त्यांचा उपयोग निःसंशय मोठा होता या सर्व कारणांमुळें कलहास सुरुवात होतांच सर्व जनसमूहाची स्थिति कष्टमय होऊन गेली. ज्यांनी या लढाईची तयारी केली त्यांना या गोष्टीची कल्पना नव्हती असेंही नाहीं. त्यांनीं ब्रिटिशाच्या आर्थिक, राजकीय आणि न्याय यासंबंधींच्या जुलमातून बाहेर निघाल्याखेरीज आपली सर्वांगीण उन्नति होणार नाहीं ही गोष्ट पुरी ताडल्यामुळे वाटेल तो स्वार्थत्याग करण्यास ते तयार झाले होते, इतकेंच.

ज्यावेळीं तंटा सुरू झाला त्याचे अगोदर तेराही वसाहती ह्मणजे ब्रिटिश राज्याचे निरानिराळे प्रांतच असल्यामुळे, या वसाहतींना स्वतःचे पतीवर कर्ज काढतां येत नसे, कागदी नोटांचा प्रसार करतां येत नसे, आणि वसाहतींतील व परराष्ट्रांशीं होणाऱ्या व्यापाऱ्यांचें नियंत्रणही करतां येत नसे. ब्रिटन करील तो कायदा, ब्रिटनचा फायदा तोच वसाहतींचा फायदा ! ब्रिटिश लोकांना ज्या मालाची गरज लागेल तोच माल वसाहतींनी पिकवावा, त्यांच्या जहाजांतून ते देतील त्या किंमतीस इंग्लंडांत पाठवावा व पैशांच्या मोबदलल्यांत त्यांचाच माल ते सांगतील त्या किंमतींत खरेदी करावा. हा जुलूम वसाहतवाल्याना सहन होण्यासारखा नव्हता. आज निर्वाहाच्या एका पदार्थावर कर बसव तर उद्यां दुसऱ्या पदार्थावर कर बसव अशा तऱ्हेने कराची वाढ होत चालली. पण ते बसविण्यांत वसाहतवाल्यांचे मत कोणीच विचारीना. कपडा तयार करूं नका; टोप्या तयार करूं नका; कातड्याचे जिन्नस तयार करूं नका; लोखंड बनवा पण तें आह्मांस देऊन आमच्याकडून त्यांची हत्यारें विकत घ्या अशा तऱ्हेतऱ्हेच्या नानाविध जुलुमास कंटाळून त्यांनी अर्ज-विनंत्या केल्या; डेप्युटेशन्स पाठविलीं; पण सनदशीर प्रयत्नास बिलकुल यश न आल्यामुळे शेवटीं त्यांना हत्यार हातीं घ्यावें लागले. व भावी कालात होणाऱ्या हालअपेष्टेची नीट कल्पना असून सुद्धां तिकडे डोळेझांक करावी लागली.

ब्रिटिश अंमलाखालींच संकुचित स्वातंत्र्याची वसाहतवाल्यांची मागणी होती, पण त्यांच्या सुदैवाने पूर्ण स्वातंत्र्य त्यांना लाभल्यामुळे त्यांच्यावर तात्पुरती मोठीच जबाबदारी येऊन पडली. स्वातंत्र्य युद्धांत राजाची, गव्हर्नरांची, बोर्ड ऑफ ट्रेडची सर्वांची सत्ता झुगारून, शेतकरी हाच राज्याचा खराखुरा घटक बनला व त्याचेच तंत्राने राज्यकारभार सुरू झाला. कुलीनतेच्या, प्रतिष्ठितपणाच्या व आनुवंशिक श्रेष्ठपणाच्या भ्रामक कल्पना नष्ट होऊन कर्तबगारी ही एकच मोठेपणाची खूण ठरली.

वसाहतीचा विजय होण्यास काय कारणे घडली हे तरी मोठेच गूढ आहे. खुद्द तेराही वसाहतवाल्यांना आपल्याला असा निःसंशय विजय मिळेल अशी केव्हांही पूर्ण खात्री वाटत नव्हती. इंग्लंडची शक्ति किती अपरिमित होती हे वसाहती पूर्ण जाणून होत्या. ब्रिटिश सैनिक संख्याबलाने वसाहती सैन्यापेक्षां किती तरी पटीने अधिक होते; त्यांच्याजवळ हत्यारे पहिल्या प्रतीची. सैन्यांत शिस्त उत्तम; त्यांना असंतोष कधी माहीत नाहीत नाहीं, ब्रिटिश अधिकाऱ्यास अनुभव दांडगा, जगाच्या एकूण एक पृष्ठभागावर त्यांचीं कांही तरी कुलंगडी चाललेलींच होती ब्रिटिश राजघराणे अतिशय जुनाट असल्यामुळें त्याच्या सत्तेची पाळेमुळे अगदी खोल गेली होती. ती सहजासहजी कशीं उपटून निघाली या प्रश्नास समर्पक असें उत्तर अद्यापही सांपडलें नाही.

उलटपक्षी अमेरिकन राष्ट्राचे सर्वच कांही अजब! तेराही वसाहतींचे परस्परांशीं संबंध बेताबाताचे, दळणवळणही फार कमी, आयत्यावेळी बोलाविलेल्या लोकसभेवर लढाई चालविण्याचा व राज्यकारभाराचा बोजा पडलेला, मुख्य अधिकाऱ्यास विशेष अधिकार नव्हता, पैशाची सदाच अडचण, लढाईच्या साहित्याची वाण, पगाराची टंचाई, अशा परिस्थितींत 'आंधळ्यांच्या गाई देव राखतो' या न्यायानेंच, पृथ्वीवरील अत्यंत बलाढ्य राष्ट्राविरुद्ध असतांना दुर्बल राष्ट्राला यश यावें हा अजब चमत्कार नव्हे काय ? अशा वेळीं त्या राष्ट्राचे प्रजाजनांस आपल्यावर ईश्वरी कृपा आहे असें वाटल्यास त्यांत गौण असें काय आहे ?

## ९ वें ) स्त्रियांची स्वातंत्र्य युद्धांतील कामगिरी

स्वातंत्र्याचे युद्धांत स्त्रियांनीं फार मोठी कामगिरी केली आहे. ही कामगिरी त्रिविध प्रकारची आहे. शेती करणे, कपडे तयार करणें, रुग्ण-शुश्रूषा करणे या कामापासून तों बातम्या काढणें व प्रत्यक्ष लढाईत भाग घेणें, येथपर्यंत सर्व कामें लढाईचे काळांत स्त्रियांनी केलीं आहेत. परकीय मालावरील बहिष्काराचे चळवळीत फार मोठ्या प्रमाणांत त्यांनी कार्य केलें. प्रत्येक घरीं ब्रिटिश माल वापरावयाचा नाहीं हा निश्चय स्त्रियांनीं स्वतः पाळला होता, व पुरुषमंडळींसही या कामी आग्रहानें सहाय्य देणे भाग पाडिले होते. तत्कालीन युरोपीय राष्ट्रांपेक्षां अमेरिकन स्त्रियांची परिस्थिति निराळी होती. त्या परिस्थितीनेच त्यांना पुरुषाचे बरोबरीस आयुष्यांतील बहुतेक व्यवसायांमध्ये स्थान दिले होते. घरच्या पुरुषांचे बरोबरीने काम उरकण्याची ताकद व संवय त्यांना असल्यामुळें, गृहराज्यांत त्यांचा दर्जा तत्कालीन युरोपीय स्त्रियांपेक्षां मोठा होता. त्या काली अमेरिकेत प्रवास केलेला एक फ्रेंच गृहस्थ अमेरिकन स्त्रियांसंबंधीं लिहितांना म्हणतो, " युनायटेड स्टेट्समध्ये पुरुष वर्ग स्त्रियांसंबंधी फाजील दाक्षिण्य दर्शवीत नाही तरी त्यांचे ठाई पुरुषांचेविषयी पूर्ण आदरबुद्धि असलेली दिसून येते. स्त्रियांनी अंगावर घेतलेली कामे त्या पार पाडतील यासंबंधी पुरुष वर्गात विश्वास दिसून येतो; व त्यांचे स्वातंत्र्यासंबंधी एक प्रकारची पृथबुद्धि पुरुषवर्गात वास करीत असतांना दृष्टीस पडते. " असा विशिष्ट एक दोन खंडांमधील स्त्रियांमध्यें कां उत्पन्न झाला हें सहज समजून घेण्यासारखें आहे. युनायटेड स्टेट्समध्यें कोणतीहि मोठी चळवळ अगर घटना स्त्रियांचे मदतीवाचून पार पडलेली दिसत नाहीं. मुलांचे शिक्षण असो; आरोग्य खाते असो; कोणतीही औद्योगिक अथवा सामाजिक चळवळ असो, मद्यपानबंदी अथवा गुलामगिरीच्या व्यापाराची बंदी असो; सर्व चळवळींत अमेरिकन स्त्रियांनीं आपली योग्य जबाबदारी पार पाडली आहे. आणि या सर्व गोष्टी घडण्यास कारण काय तें या नवीन खंडाच्या इतिहासावरूनच सहज समजून येणार आहे.

वसाहतींचे प्रारंभाचे कालीं ज्या ज्या वेळीं अमेरिकन स्त्रियांना आपल्या वडिलांबरोबर, बंधूंबरोबर, पतिबरोबर अथवा मुलांबरोबर राहणें भाग पडे, त्या त्या वेळीं त्यांना सतत आत्मसंरक्षणाची विद्या शिकणें भाग पडे. तरवार–बंदुकीसारखीं हत्यारें वापरण्याचा त्यांना पुष्कळ सराव असे. पति किंवा दुसरा कोणी संरक्षक बरोबर नसतां ज्या ज्या वेळीं इंडियन लोकांच्या टोळयाकडून हल्ले होत त्या त्या वेळीं स्वसंरक्षण करण्याची जबाबदारी स्त्रियांवरच पडे, त्याचप्रमाणें हिंस्र पशूंपासून बचाव करणे त्यांना भाग पडे, हिंवाळयाच्या कडक थंडींत कुटुंब पोसण्या-साठी कष्ट करणे त्यांना भाग पडे. वसाहतींच्या संस्थापकांचेही काम हलके सलकें नसे. त्याना घरें बांधावीं लागत, झाडें तोडावी लागत; शिकार व शेती करावी लागे, निर्वाहाच्या एकंदर वस्तू स्वतः करण्याचे काम पडे, जोडे शिवणे, कपडा तयार करणे, अन्न शिजवणें, कपडे धुणें हरएक कामे त्यांना करावी लागत. आपल्या पतीचा संसार सुखी करण्यासाठी वसाहती स्त्रियांनीं हरएक प्रकारची घस सोसल्यामुळे त्याचा कौटुंबिक व सामाजिक दर्जाही वाढला. अमेरिकन स्त्री जशी सहचारिणी होती तशी सहकारिणही बनली. त्यामुळेंच अमेरिकन स्त्रियांमध्ये स्वातंत्र्यवृत्तीचा कल अधिक दिसून येतो. स्वतंत्रपणे मोठमोठीं शेतें पिकविण्याऱ्या व उद्योगधंदे चालविणाऱ्या अनेक स्त्रियांचीं उदाहरणें अमेरिकन इतिहासांत दिसून येतात. विशेषतः अमेरिकेंत नीळ पिकविण्याचे आणि रेशीम तयार करण्याचे धंद्यास प्रथम अमेरिकेंतलि स्त्रियांनीच सुरुवात केली. इतक्या सर्व चळवळी अमेरिकन स्त्रिया स्वतः करीत म्हणून त्या फटकळ किंवा उच्छृंखल असतील असें म्हणावें तर तसें मुळींच नाहीं. सुगृहिणी व उत्तम माता होण्यांत त्यांना अभिमान वाटतो. गृह, पति व मुलें यांच्या ठाईचा अमेरिकन स्त्रियांचा आदर कोणत्याही रीतीनें कमी न होतां तो वाढतच गेला आहे.

स्वातंत्र्याच्या लढाईत गुंतलेल्या प्रत्येक सैनिकाची बायको, मुलगी अथवा बहीण कोणीना कोणी तरी युद्ध चालू रहावें म्हणून प्रत्यक्ष काम करून मदत देत असे. जेम्स ओटिस याची बहीण व जेम्स वॉरन याची

बायको मर्सीवॉरन ही निरनिराळीं नाटकें व फार्स लिहून उपरोधिक भाषेंत न्यू यॉर्कसारख्या ठिकाणीं नाटकांतून वगैरे देशभक्त लोकांची चेष्टा चाले, तीस उत्तरें देत होती. तिच्या लेखांचा फारच प्रसार झाला व जागृतीचें काम उत्तम झाले. वर्तमान पत्रें व मासिकें यातही पुष्कळ अमेरिकन स्त्रिया लेख लिहून स्वातंत्र्याची घोषणा चालू ठेवीत होत्या. त्या कालचा एकंदर आयुष्यक्रम परदेशांतून येणाऱ्या तयार वस्तूंचे अभावी कंठणे फार कठीण गोष्ट झाली होती तरी सुद्धां आयुष्यांतील गरजा कमी करून व अत्यंत मोठ्या प्रमाणावर उद्योग करून राष्ट्रीय संसाराच्या व युद्ध करीत असलेल्या सैनिकवर्गाच्या एकूण एक गरजा भागविण्याचा त्यानीं प्रयत्न केला. वस्त्रप्रावर्णाचे बाबतींत तर एकूण एक गरजा त्यांनीं भागविल्या, लढाई चालू होती तोंपर्यंत देशाच्या या टोंकापासून तो त्या टोंकापर्यंत, चरक्यांचा मंजुळ नाद व मागांचा खडखडाट ऐकूं येत होता.

त्या वेळेचा पत्रव्यवहार वाचला म्हणजे शेतीवरील पेरणीकापणीचीं कामें स्त्रिया संभाळीत होत्या हे स्पष्ट दिसून येतें, संसारांत वापरलेली कथलाचीं–जस्ताची भांडीं त्यांनीं बंदुकीच्या गोळया करण्याकरितां काढून दिली. विलायती चैनीच्या एकूणएक जिनसांस फाटा दिला. स्वदेशांतच सर्व जिनसा तयार करून घेऊन त्यावर आपली गरज भागविण्याचा निर्धार केला, व सैन्याच्या गरजा भागण्याकरितां दारोदार हिंडून पैसा व इतर जरूरीच्या वस्तू त्यांनी जमा केल्या आणि सैन्यास पुरविल्या.

कित्येक वेळ स्त्रियांना ब्रिटिश सैन्याच्या लुटालुटीच्या कार्यक्रमास व जाळपोळीच्या उद्योगांस योग्य उत्तर द्यावें लागे. कॅथरीन श्युलर नांवाच्या बाईनें ब्रिटिश शिपाई आपल्या शेतांत उतरून फराळ करीत बसले आहेत, हें पाहतांच शेतांतील उभ्या पिकास आग लावून दिली, व अशा रीतीनें आपला स्वाभिमान दाखविला. नासधूस झालेलीं शेते व घरें पुन्हां दुरुस्त करून ठाकठीक करणें हाही एक उद्योग त्यावेळीं स्त्रियांना करणें भाग पडे. शिस्तीचे बाबतींतही त्यांचें उदाहरण घेण्यासारखें होतें. त्यांनीं निरनिराळ्या कमिट्या स्थापिल्या. त्यांचें काम सर्व ठिकाणीं फिरून, व्यापाऱ्यांना

नफेबाजी बंद करण्याबद्दल व ब्रिटिश वस्तूंची विक्री न करण्याबद्दल ताकीद देण्याचें होतें. एक वेळ स्त्रिया एका चहाचे दुकानांत घुसल्या, तेथील व्यापाऱ्यास तो ऐकत नाहींसे पाहून, त्यांनी धुडकावून हुसकून दिलें व स्वतःच मनांत येईल त्या किमतीस त्याचा चहा विकूं लागल्या. फॉल-माउथ येथील एका हॉटेलांत शिरून जॉन ॲडाम्स तेथील मालकिणीस ह्मणाला, ' एकादा गृहस्थानें जकात चुकवून चहा आणला असला, तर तो पिणे तरी रास्त आहे की नाहीं ! " ती बाई ह्मणाली, " नाही. नाहीं. कोणताच चहा पिणे योग्य नाही। आह्मी सर्वांनीच तो सोडला आहे, व तुह्मासही तो येथे शिजवून मिळणार नाही. तुह्मांस एक पेलाभर कॉफी देते पाहिजे असेल तर ! "

व्हर्नीजीया वसाहतीतील ॲमिलिया नांवाचे गांवी तरुण मुलींनी संघ स्थापन केला होता, व असा नियम केला होता कीं, जो तरुण अमेरि-कन सैन्यांत दाखल होऊन पुरेशी वर्षे देशाची नोकरी करणार नाहीं त्याच्याशी विवाहाची गोष्ट सुद्धां काढावयाची नाही मग तो कितीही श्रीमंत किंवा विद्वान असो !

लढाईच्या प्रथमवर्षी फिलाडेलफिया येथील एका बाईनें एक पत्र लिहिले आहे त्यांतील मजकूर खालील प्रमाणे आहे. – " मी काय केलें आहे ते तुला कळविते. माझ्या एकुलत्याएक बंधूस मी लढाईवर पाठविलें आहे. त्याच्यासाठीं मी प्रार्थना करीत असते कीं ' आमच्या घराण्यास साजेल असाच पराक्रम त्याचे हातून होवो. ' मला जरी वीस पुत्र असते तरी त्या सर्वांना मी लढाईवर पाठविले असतें घरांतील, व जेवणाचा खर्च मी शक्य तितका कमी ठेवला आहे. गेल्या क्रिस्टमसपासून तर मी चहाला शिवलेच नाहीं. मला घालायला एकादा सुंदर झगा किंवा टोपी सुद्धां मी ठेविली नाहीं. माझ्या आयुष्यांत मी एका गोष्टीकडे बिलकुल लक्ष्य दिलें नव्हतें. मला विणायला येत नव्हतें, पण आतां मी सैनिकांकरितां अमेरि-कन लोंकरीपासून पायमोजे विणत असते, व अशा रीतीनें लोकोपयोगी कृत्यांस मी अल्पस्वल्प मदत करिते. ' मरण फक्त एकदांच येतें ' आणि

तें स्वातंत्र्यांत आलेले बरे, गुलाम ह्मणून कंठावयाच्या आयुष्याला कवडिचिही किमत नाहीं, मला लिहावयाला आनंद वाटतो कीं, माझ्या इतर अमेरिकन मैत्रिणींचीं ही अशींच मते बनत चाललीं आहेत. मातृभूमीचे प्रेमाखातर आह्मा सर्वांनीच जत्रा, मेजवान्या व इतर करमणुकीचे प्रकार बंद ठेविले आहेत, चहा पिणे व इतर श्रीमंती चोचले आह्मी सोडून दिले आहेत. आह्मा स्त्रियांचीं जर मते अशी होत चाललीं आहेत, तर आमच्या पुरुष वर्गाचे मनात कसल्या कल्पना प्रज्वलित झाल्या असतील बरें? स्वातंत्र्याकरितां मरण आले तरी हटावयाचें नाही असा त्याचा एक विचार झाला आहे. ”

खुद्द मुख्य सेनापतीची पत्नी मार्था वॉशिंग्टन, जखमी झालेल्या शिपायांच्या खस्ता खात रात्रंदिवस खपत असे. ॲडिंग्टन ब्रूस नामक लेखकानें, मिसेस ट्रूपे नांवाची बाई तिला भेटावयास गेली होती त्यासंबंधी लिहिले आहेः—

“ आह्मांपैकीं पुष्कळ बायांस लेडी वॅशिंग्टन यास भेटण्याची इच्छा होती. एवढ्या मोठ्याची पत्नी तेव्हां तिला भेटण्यास जातांना अर्थात् नीटनेटका पोषाक करून जाणे इष्ट असे आह्मी ठरविले. व त्याप्रमाणे जावयास निघालो. लेडी वॉशिंग्टनची व आमची ओळख करून देण्यांत आली, पण आश्चर्याची गोष्ट ! त्या बाई एक झगा घालून विणकाम करीत बसल्या होत्या. त्यांनीं आमचे योग्य आदरातिथ्य केलें. पण तें करितांना सुद्धां विणकामाचा त्यांचा हात थांबलेला नव्हता. आह्मीं नटून मुरडून भेटावयास गेलेल्या स्वस्थ बसून होतो, व इकडे तर ही थोर स्त्री सैनिकाकरितां पायमोजे विणीत बसली होती, त्यामुळे आमचें मन आह्मास खाऊं लागले. इतकेच नव्हे तर, दोनप्रहरीं आमचे मन न दुखवितां त्या सहज प्रेमळपणे ह्मणाल्या, “ या अशा आणीबाणीचे वेळी, थोरामोठ्यांनीं अत्यंत उद्यमशील बनून इतर स्त्रियांस उत्तम उदाहरण घालून दिलें पाहिजे. इंग्लंडशीं लढाई चालू असेपर्यंत, ज्या प्रेमाच्या माणसांपासून आमचा उगम आहे, त्या आमच्या पुरुषवर्गास लढाईवर सुखांत ठेवण्याकरितां, आह्मीं कसूर करतां

कामा नये. ज्या वस्तू आम्हांस तयार करितां येत नाहींत त्या वापरण्याचा मोह आवरून त्यांपासून स्वातंत्र्य मिळविलें पाहिजे. आमचे पिते, पति व पुत्र देशाभिमानाची ज्योत प्रज्वलित करीत आहेत, तर आम्ही उद्योगधंद्याची ज्योत प्रज्वलित केली पाहिजे." वरील सर्व विवेचनावरून देशांत चाललेल्या एकूणएक गोष्टींची स्त्रियांस त्यावेळी माहिती होती ही गोष्ट निर्विवाद दिसून येते.

अमेरिकेविरुद्ध लोकमत तयार करण्याचे ब्रिटिश प्रयत्न—

शत्रूचा पाडाव करण्याच्या ज्या अनेक युक्त्या आहेत, त्यात शत्रूची निंदा करीत सुटणें व त्याच्यासंबंधी खोट्यानाट्या बातम्या पसरविणे, या युक्तीचाही अवलंब योग्य प्रमाणांत वसाहतवाल्यांविरुद्ध केला जात होता. या युक्तीचा आद्यजनक कोण याचा निश्चित निकाल इतिहासकार लावतील तेव्हां लावोत पण दोनशे–अडीचशे वर्षापासूत तरी टोरी वर्तमानपत्रें या युक्तीचा अवलंब करीत आलीं आहेत. स्वातंत्र्य युद्धाचे आरंभीं आरंभीं भ्रामक बातम्या छापण्याचा व वसाहतवाल्यांची दिशाभूल करण्याच्या प्रयत्नांचा उपक्रम टोरी वर्तमानपत्रांनीं सुरू केला होता. मोठमोठ्या शहरांतून, नाटक–तमाशातून देशाभिमानी लोकांची व स्वदेशीच्या उपक्रमाची चेष्टा करण्यात येऊं लागली होती, नाटकांतील पदेही इच्छित हेतूने बनविण्यांत येत.

" स्वातंत्र्याचे लढाईमुळें, जुनी सामाजिक व्यवस्थेची घडी बिघडून सबगोलंकार मातला आहे. जुने आचारविचार नष्ट झाले आहेत. हें सर्व ईश्वरी नियमांचे विरुद्ध वर्तन आहे. ज्या समतेचा पुरस्कार होत आहे ती तत्वतःच चूक आहे, व असत्य आहे तीमुळें सरकारसंबंधीं प्रजेचा योग्य तो आदर राहणार नाहीं. राज्यकर्ते हे केवळ मनुष्यप्राणीच आहेत व ते प्रजेचे नोकर आहेत अशीं तत्वें प्रतिपादन करण्यामुळें राजसत्तेचा अपमान व अनादर होत आहे" वगैरे अनेक प्रलाप टोरी वर्तमानपत्रांनीं काढण्यास सुरुवात केली होती. कित्येकवेळ पाद्री लोकांस सामील करून

घेऊन त्यांचे तोडून आपल्यास पाहिजे ते उद्‌गार ब्रिटिश अधिकारी काढवीत. जोनाथन बूचर नांवाचा पाद्री प्रतिपादन करी कीं, खुद्द परमेश्वरानेंच मनुष्यप्राण्यावर राज्य करण्याकरितां राजे लोकांना उत्पन्न केले आहे. त्यांचे सत्तेविरुद्ध ब्र काढणें म्हणजे परमेश्वराचा उपमर्द होय. पवित्र शास्त्रास ही गोष्ट बिलकूल सम्मत नाहीं वगैरे वगैरे.

त्यानंतर ज्यावेळी प्रत्यक्ष स्वातंत्र्याचे लढाईस सुरुवात झाली, त्यावेळीं ही पत्रे म्हणूं लागलीं; " कांहीं बदमाष व कपटी लोकांनी बंडाची कल्पना काढून, बहुजन समाजाच्या अज्ञानाचा ते फायदा घेत आहेत. " " बंडखोर लोक मनुष्य मात्राची दिशाभूल करून, त्यांना खड्यांत पाडण्याचा प्रयत्न करीत आहेत. " " कृष्णकृत्ये करणारे पाजी लोक, अप्रसिद्ध पोटभरू वकील, नादार दुकानदार, गुन्हेगार व छपवून माल विकणारे, नीच, दरवडेखोर, मानवी समाजांतलि कचरा, गाळ " वगैरे वगैरे शेलकी शेलकी विशेषणे त्यावेळचे वर्तमान पत्रांत देशभक्तांविरुद्ध प्रसिद्ध होत. सुप्रसिद्ध देशभक्त सुलिव्हान जो स्वातंत्र्याच्या जाहीरनाम्यांत प्रमुख होता, त्याबद्दल न्यू यॉर्क गॅझेटमध्ये खालील अर्थाची कविता तारीख २३ मे १७७८ सालीं आली होती. ' दशसहस्र, अतिनीच लोकांमध्यें सुलिव्हान तूं महानीच मनुष्य आहेस, बहुतक सर्व वसाहतींत तूं खलाशी, शेतकरी, वकील, कोणत्याना कोणत्या तरी मिषानें फिरून आला आहेस, बहुतेक वसाहत तुझीच आहे व त्यांत तूंच अट्टल बदमाष शोभतोस. ' वगैरे.

' जोनाथन ओडेल ' वॉशिंग्टनबद्दल खालील कवित्व करितो. ' एक अमानुष कार्य तूं अंगावर घेतले आहेस. तें राजा, देश व कायदा या सर्वांविरुद्ध आहे. तूं चोरी केलीस, खोट्या गोष्टीस उत्तेजन दिलेंस, सारासार विचाराचा अतिक्रम केलास, अत्यंत पवित्र बंधनें तोडलींस, तुझ्याच हातानें अनेक भगिनींस तूं वैधव्यांत लोटलेंस, व वृद्ध पित्यांना पुत्रशोक करावयास लाविलें आहेस, हिरव्या कुरणावर आतां गाई चरतांना दिसेनाश्या झाल्या आहेत, शहरें उध्वस्त होऊन पडलीं आहेत; हें सर्व तुझ्यामुळेच झालें, वॉशिंग्टन, विधवा व पोरकी मुलें याचा जाब तुला विचारीत आहेत ! '

# स्वातंत्र्य युद्धाची अखेर

थॉमस पेनला त्यांनीं ' भाडोत्री ' ग्रंथकार म्हटले. लढ्यांत भाग घेणाऱ्या एकूण एक अधिकाऱ्यांस त्यांनीं कांहींना कांहीं अपशब्द बहाल केला. वॉशिंग्टला त्यांनीं ' भिकारड्या लोकांचा प्रमुख, भुकेने खंगलेला व व खरजुला, इजिप्तमधील एकूणएक उवा त्याच्या झग्यांत भरलेल्या आहेत. गॉथ व हूनस लोकांचा सेनापति, जंगली व खेडवळ लोकांचा म्होरक्या, भटे-शिंपी व जोडेशिवे यांचे सैन्यावरील मुख्य अधिकारी, कीटक, सिंहाच्या गुहेतील उंदीर-' वगैरे अनेक नामाभिधानें दिलीं आहेत. वंडखोरांची विशेषणें,:—' राजद्रोह महत्वाकांक्षा, ढोंगीपणा, कपट, खोटेपणा, परनिंदा, दंगाधोपा, क्रूरता, लुच्चेगिरी, असूया, छळ, धर्मभोळेपणा, ' एकूण काय इंग्रजी भाषेंतील कोणताही अपशब्द प्रतिस्पर्ध्यास लावण्यास प्रामाणिक इंग्रजी पत्रें विसरलीं नाहींत.



# युद्धकालीन आर्थिक-परिस्थिती.

## प्रकरण १० वें.



स्वातंत्र्याच्या जाहीरनाम्यानंतर झालेल्या सप्तवार्षिक महायुद्धांत दोन्हीही राष्ट्रांत कोणाचा जय होईल हें खास सांगतां येण्यासारखें नव्हते. लढाईचें स्थलापासून इंग्लंड देश फार लांब ह्मणजे ३००० मैल असल्यामुळे, शिपाई, हत्यारें दारूगोळा वगैरे युद्धसामुग्री पाठविणे ह्मणजे मोठ्या खर्चाची बाब झाली होती. शिवाय वेळही फार मोडत असे. त्याकाळीं इंग्लंडहून अमेरिकेंत जाण्यास दोन अडीच महिने सहज मोडत असत. राष्ट्रीय कर्जाचा बोजा इंग्लंडवर फारच वाढत होता. इंग्लंडचें उत्पन्न बरेंच मोठें होते खरें, पण शांतता बिघडली किंवा कोठें लढाई सुरूं झाली कीं त्यांत बरीच खोट येई. त्याकाळीं इंग्लंडजवळ मोठें व सुसज्ज असें पुष्कळ सैन्य व जगांत पहिल्या नंबरचें आरमार जय्यत तयार होते. वसाहतींजवळ लढाऊ आरमार बिलकूल नव्हतें. पैशाचीही तरतूद नव्हती. तेराही वसाहतींनीं कमी अधिक प्रमाणांत जमा केलेल्या स्वयंसैनिकांच्या टोळ्या हेंच काय तें वसाहतींचें बल. या सैन्यास शिस्त फार कमी प्रमाणांत होती. तरी पण अमेरिकन सैन्यांत उत्तम नेम मारणारे लोक होते. तसेंच अमेरिकन लोक हाडापेरानें मजबूत व परिस्थितीमुळें अधिक काटक होते यांत शंका नाहीं. अमेरिकन सैन्यास दुसरा फायदा ह्मणजे त्याला आसपासच्या एकंदर भू-भागाची नीट माहिती होती, तिचा उपयोग आडून छापे घालण्यांत व वेळप्रसंगीं पळून जाण्यास होण्यासारखा होता. दुर्दैवाची गोष्ट ह्मणजे सर्व वसाहतींत असावी तितकी एकी नव्हती नाहीं तर युद्ध तीन चार वर्षें तरी अगोदर आटोपलें असतें. कॉंटिनेंटल कॉंग्रेस ह्मणून ज्या संस्थेखालीं सर्व राष्ट्र एकत्र झालें होतें, तिला खरी सत्ता कांहींच नव्हती. ती फक्त वादविवादाची एक संस्थाच अवस्थाप्रमाणें होती. तिला ठराविक कार्याकरितां मदत मागतां येई पण सत्तेनें एकादी गोष्ट करतां येत नसे किंवा एकादा तात्पुरता कर सुद्धां

बसवितां येत नसे. आपल्या प्रांताचे आसपास लढाई येऊन ठेपली कीं, वसाहती सैन्य जमवूं लागत व मदत करण्यास जाग्या होत. पण पर वसाहतींत जर काहीं मोठी स्वारी करण्याचा प्रसंग आला तर सैन्य जमवून धाडण्यास कुचराई करीत. सर्व वसाहती मिळून एकच देश आहे ही कल्पना त्यांचे अंगीं नाट बाणली नव्हती. प्रत्येक वसाहत जमलेला वसूल तेथल्या तेथे खर्च करून टाकी, पण सर्वांचा मिळून एक खजिना असावा ही कल्पनाच त्यांना शिवली नव्हती. वसाहतींचा विजय होण्यास खरे कारण झाले असेल तर शत्रूकडील सैन्यांतील ढिलाई हेंच म्हणतां येईल. वसाहतवाल्यांनी एकी करून जितकी उत्तम संघटणा करावयास पाहिजे तितकी त्यांचेकडून केव्हांही झाली नाहीं

शत्रुपक्षानें कर बसवून अशी परिस्थिति उत्पन्न करून ठेवली होती कीं, कर म्हणतांच प्रजाजनांचे अंगावर कांटा उभा राही. त्यामुळें नवीन कर बसवून पैसा वसूल करणे कॉंग्रेसला फार जड झालें होतें. कर चुकविण्याकरितांच पुष्कळशा वसाहतवाल्यास स्वराज्य पाहिजे होते व अशा लोकांनीं स्वराज्याखालील कर स्वखुषीने भरणें दुरापास्त होतें. कर्जरोख काढून वसाहतींचा व कॉंग्रेसचा खर्च भागविणे, हाच उपाय शिल्लक होता. या उपायास तरी व्यापारी वर्गाचा विरोधच होता एकंदरींत सर्वसाधारण लोकांत कर्जरोख्यांबद्दल अद्यापि अविश्वास उत्पन्न झाला नव्हता. लढाई सुरू होण्यापूर्वीच सद्दा वसाहतींनीं कर्जरोखे काढले सुद्धां होते. इ. स. १७७५ च्या जून महिन्यांत अमेरिकन सैन्यावर कमांडर इन चीफची नेमणूक झाल्यानंतर वीस लक्ष डॉलरचे कर्जरोखे काढण्यांत आले. त्यानंतर जुलई महिन्यांत १० लक्ष डॉलर व लगेच पुन्हा तीस लक्ष डॉलरचे कर्जरोखे काढण्यांत आले. स्वातंत्र्याचे जाहिरनाम्याचे पूर्वी एक कोटी चाळीस लक्ष डॉलरचे रोखे काढले. या रोख्यांना व्याजही नव्हतें व फेड नक्की केव्हां करण्यांत येईल, हेंही त्यांत निर्दिशित केलें नव्हतें, पण त्यानंतर आधिक कर्जरोखे काढिल्यास त्यांना कोणी विचारीनासें होईल व आपली पत राहणार नाहीं हें कॉंग्रेसला माहीत होतें. अर्थातच मग दुसरीं साधनें अमलांत आणण्याचा कॉंग्रेसनें विचार केला.

बेंजामिन फ्रॅंकलिनने फ्रान्सपासून साठ लक्ष डॉलर कर्ज मिळविलें. जॉन जे यानें स्पॅनिश सरकारकडून कर्ज मिळविण्याची व्यवस्था केली. अशा व दुसऱ्या साधनांनीं सुमारें साडेतीन कोटी डॉलर कर्जाऊ मिळाले. त्यानंतर त्यावेळीं सर्वमान्य अशा 'लॉटरीने' म्हणजे सोडत काढून पैसा जमविण्याचा उपक्रमही अमलात आला. कॉंग्रेसने एक लक्ष तिकिटें छापून काढली व पंधरा लक्ष डॉलर जमा करण्याचा प्रयत्न केला. या सोडतीच्या अटी फारशा समाधानकारक नव्हत्या. रोख पैसा देऊन तिकिटें विकत घ्यावयाचीं, व बक्षिसे मात्र ४ टक्के व्याजाचीं पांच वर्षे परतफेडीच्या कॅशसर्टिफिकिटांमध्ये मिळावयाची, अशा अटीवर फारशी तिकीटविक्री होईना. नंतर प्रत्येक वसाहतीकडे पैसा मागण्यात आला, पण वसाहतींचे खजिन्यांत फारसा पैसा नव्हता, व लढाईकरिता पैसा दिल्यास अधिक कर बसविल्याशिवाय खर्चाची तोंडमिळवणी करणे शक्य नव्हते. कर बसविण्याचे ठरल्यास लोकांमध्यें असंतोष उत्पन्न झाल्याशिवाय राहणार नाही हे प्रत्येक वसाहतीस माहीत होते.

वसाहतीकडून सुमारें साठ लक्ष डॉलर मदत मिळाली पण ती पुरेशी नव्हती. कॉंग्रेसने वसाहतींकडे शिफारस केली कीं, जे लोक इंग्रजांस मदत करितात अशी शंका येईल त्याची मालमत्ता जप्त करून लढाईच्या खर्चाकरिता पाठवावी. तसेच ज्या इंग्रज व्यापाऱ्यानी ब्रिटिश सरकारास देणें असेल, ते वसाहती कर्ज रोख्यातच वसाहतींनी वसूल करावे. अशा कांहींशा अप्रशस्त रीतीनें सुद्धां एक कोटी साठ लक्ष डॉलरपेक्षा अधिक उत्पन्न होऊं शकले नाही.

इसवी सन १७७८ साली पुन्हा सहा कोटी तीस लक्ष डॉलरचे कर्जरोखे काढण्यांत आले. त्यानंतर असें आढळून आलें कीं, बाजारांत कागदी डॉलरची किंमत त्याच्या दर्शनी किंमतीच्या पंचमांशानें सुद्धां नाहीं. मग वसाहतींना पैसा नाही तर नाही निदान धान्य व लढाऊ सामान यांचा पुरवठा केला तरी चालेल अशी विनंति करण्यांत आली. अशा रीतीनें मका, गहूं, मांस, गवत वगैरे निरनिराळ्या वस्तूंचा सांठा कॉंग्रेसचे

सैन्यास मिळूं लागला पण या वस्तू एका वसाहतींतून दुसऱ्या वसाहतीत नेण्याचा खर्च त्यावेळच्या दळणवळणाच्या परिस्थितीमुळें फारच होई, म्हणून ही पद्धतही त्याज्य ठरली. त्यानंतर कॉंग्रेसनें असा हुकूम काढला कीं सैन्याचा तळ जेथे असेल तेथल्यातेथेच सापडतील त्या वस्तू स्वतःचे अधिकाराखाली लोकापासून घ्याव्या मात्र त्या वस्तूंच्या किमतीबद्दल त्यांना रीतसर पावती लिहून देण्यात यावी. हा कांहींसा एकतंत्री कायदा व्हॅली फोर्स येथें हिवाळ्यांत सैन्याचे मुक्कामांत जे अपरिमित हाल झाले त्यानंतर अमलात आला. लढाईचे वेळीं ब्रिटिश अधिकारी वसाहतींतील धान्य व इतर सामुग्री रोख पैसे देऊन खरेदी करीत ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे वसाहती सैन्याचे तुटपुंज्या तयारीचें स्वरूप ध्यानांत येईल.

इ स. १७७९ साली वसाहत सरकारनें पुन्हा दहा कोटि डॉलरचे कर्जरोखे काढले, त्याचा परिणाम ताबडतोब दिसूं लागला कारण या कर्जरोख्याची किंमत दर्शनी किमतीच्या पाच टक्के इतकी सुद्धा राहिली नाही. त्यानंतर वसाहत सरकारतर्फे जॉन जे याने एक प्रसिद्धिपत्रक काढिले त्यात त्यानें असें आश्वासन दिलें होते कीं, एकंकर कर्जरोखे वीस कोटि डॉलर पेक्षां अधिक किंमतीचें काढण्यात येणार नाहींत, आणि सर्व वसाहतींनी मिळून तें सर्व कर्ज फेडण्याचें आश्वासन दिलेले आहे. आणि सर्व वसाहती मिळून हें कर्ज फेडण्याचे मुळीच अशक्य नाहीं. आपल्या ताब्यांत असलेला अवाढव्य मुलूख व त्यांतून निघणारे मुबलक उत्पन्न ध्यानांत घेता व वाढल्या लोकसंख्येची कर देण्याची ऐपत पहाता, कर्जरोख्यांची फेड खात्रीनें होण्यासारखी आहे. त्यामुळें लोकांनी अविश्वास दाखवूं नये. तर सर्व लोकांनीं यावेळीं राष्ट्रीय कर्जासंबंधीं योग्य विश्वास दाखविला पाहिजे. कर्ज सर्वांच्या हिताकरितां सर्वांनीं मिळून काढिलें आहे. आणि तें फेडले जावें ही सर्वांची इच्छा आहे. म्हणून अविश्वासास कारणच उरत नाहीं, वगैरे जॉन जेचा संदेश जरी स्फूर्तिदायक व गंभीर स्वरूपाचा होता तरी त्यामुळें रोख्यांची किंमत उतरण्याचें मात्र थांबलें नाहीं. इ. स. १७८० सालीं ज्यावेळीं कर्ज-

रोख्यांचा भाव शंभरांस एकवर आला त्यावेळी कांग्रेसने शिफारस केली कीं, वसाहत सरकारनें हे रोखे शेंकडा अडीच भावांत खरेदी करण्यास सुरुवात करावी. याप्रमाणें सुमारें १२ कोटी डॉलरच्या रोख्यांची अनायासें वासलात लागली. बाकीच्या रोख्यांपैकी बराच भाग इ. १७९० सालीं शेकडा एक भावाने वसाहत सरकारनें खरेदी केला. अशा रीतीने लढाईचे कर्ज त्याचा भाव घटून जवळ जवळ आपोआपच नाहीसे झालें.

पैशाचीं किंमत कमी होत चालल्यामुळें वसाहतींतील व्यापारही नीट चालेनासा झाला होता. शेतकरी धान्य विकीनात, व्यापारी माल मागवीनात, त्यामुळे पैशाचे अदलाबदलीने होणारा व्यापार बंद पडून मालाचीच अदलाबदल होऊन व्यापार होऊं लागला. लढाई बंद झाल्यावर इंग्रज व फ्रेंच सैन्याने दिलेले, चांदीचे व सोन्याचे नाणे एवढेच काय ते चलन वसाहतींत राहिले होते. व तेच कायदेशीर चलन म्हणून चाललें होते. कागदी नोटांचा भाव पडल्यामुळे फार चमत्कारिक अनुभव व्यव-हारात येऊं लागला. मूळ कर्ज कोणी कर्जदारानें खरोखरीच्या नाण्यांत घेतले असल्यास तो धनकोच्या अंगावर तितक्या दर्शनी किंमतीच्या नोटा फेकून मोकळा होई. कारण वसाहतीने काढलेल्या नोटा कायदेशीर चलन मानले गेले होते. बाजारात रोज निरनिराळ्या बातम्या उठवून व नोटांचा भाव कमी अधिक होईल असे करून सट्टेबाज व्यापाऱ्यांनीं अशा अडीअडचणीचे वेळी नफेबाजी सुरूं केली होती.

वॉशिंग्टनने कांग्रेसला लिहिलेल्या एका पत्रात असे म्हटले होतें की, " आपसातील मतभेद, नोटांच्या किमतींतील घट, सट्टेबाज लोकांनीं व्यापा-रात चालविलेली नफेबाजी, या कारणानी आमच्या शत्रूंचा आत्मविश्वास वाढतो आहे. "

शेवटी शेवटी कागदी नोटा हा निव्वळ थट्टेचा विषय झाला. व्हर्जी-निया वसाहतीनें काढलेल्या नोटांची किंमत हजारास एक इतकी उतरली होती. कित्येक वेळी न्हावी लोक या नोटा भिंतींस चिकटवून आपलीं दुकानें सुशोभित करीत. समुद्रावरील खलाशी बंदरांत उतरले म्हणजे त्यांना पगारांचे ऐवजीं नोटांची पुडकीं देण्यांत येत. या उतरलेल्या भावांतील

नाटाचे कित्येक खलाशांनी पोषाक बनविले आणि ते घालून ते गांवभर फिरत व मौज करीत. व्यापारी लोक कमी भावांत नोटा खरेदी करीत, नंतर एखादा मोठा विजय अमेरिकन सैन्यास मिळाल्याची बातमी पिकवीत किंवा फ्रान्समधून बरेंच सोन्याचें नाणे यावयाचें आहे असे लोकास सांगत त्यामुळें नोटांचा भाव किंचित् चढला कीं त्या विकीत व मोठा फायदा मिळवीत. लढाईत जर कोणाचें अधिक नुकसान झाले असेल तर ते शिपाई लोकाचें प्राणाची पर्वाहि न करतां ज्यांनी मायदेशाचे उत्कर्षासाठीं सैन्यांत नांव नोंदविले, त्यांना लढाई बंद झाल्यावर आपले पगार कागदी नोटांत मिळाले, अथवा दूरच्या प्रदेशांतील कुठल्या तरी जमिनीवर कागदी मालकी हक्क मिळाला. लढाई बंद झाल्यावर मिसिसिपीपर्यंत मुलुख वसाहत सरकारचे ताब्यांत आल्यानें शिपायांस मोठमोठ्या जमिनी देण्याचें ठरविण्यांत आलें. मात्र या जमिनी पड होत्या व अत्यंत दुर्गम अशा मुलखांत असल्यानें त्यांचा तात्कालिक फायदा शिपाई लोकास मिळाला नाहीं.

स्वातंत्र्य लाभल्यानंतर अमेरिकन लोकांचा व्यापार इंग्लंडने लादलेल्या अडचणींतून कायमचा मुक्त झाला खरा पण त्याच्यापासून फायदा न होता नुकसानच होऊं लागलें. जॉन जे नांवाच्या गृहस्थानें वसाहती व्यापार हातीं आल्यानें काय फायदे होतील याचें खालील वर्णन केलें आहे. " आमचा व्यापार फक्त ब्रिटनशींच आहे, आम्हाला आमचा माल तेथें नेण्यास भाग पाडिलें होतें आणि ब्रिटिश लोक ठरवतील त्याच किंमतीस माल विकावा लागे. आम्हाला आमचा मालही ब्रिटिश व्यापाऱ्याकडूनच घेण्यास भाग पाडलें होते. आणि ब्रिटिश व्यापारी किंवा कारखानदार यांच्याशीं स्पर्धा होईल असा कोणताही माल उत्पन्न करण्यास अडथळा केला जाई. आतां आम्ही स्वतंत्र आहों, सर्व जग व्यापार करण्यास आम्हाला खुलें झालें आहे. आतां आम्हांस ज्यांच्यापासून सर्वांत स्वस्त माल मिळेल त्यांच्यापासून खरेदी करतां येईल. व ज्यांच्यापासून सर्वांत अधिक फायदा मिळेल त्यांनाच आपला माल विकतां येईल. "

थोडा कालपर्यंत तरी जॉन जेचें हें ह्मणणें मनोराज्यच ठरलें. लढाई चालू असतांना ब्रिटिश पार्लमेंटनें अमेरिकेचा इंग्लंडशीं व वसाहतीशीं असलेला व्यवहार सक्तीनें बंद केला. व त्याचे बंदोबस्तासाठीं ब्रिटिश आरमाराची तुकडी ठेवण्यांत आली होती. अमेरिकन जहाजवाल्यांनीं लढाईचे वेळीं आपल्या जहाजावर दारूगोळा व हत्यारें ठेवण्याचा परवाना मिळविला होता. त्यांनीं ब्रिटिश जहाजें अमेरिकेचे किनाऱ्यावर अडकून धरण्याची उत्कृष्ट कामगिरी बजावली. त्यांनी सुमारें सहाशे व्यापारी व लढाऊ जहाजे यांचा पाडाव केला. या जहाजांचे किंमतींतून ब्रिटिश लढाऊ जहाजांनी केलेल्या अमेरिकेच्या नुकसानीची भरपाई करून घेण्यात आली.

वसाहतीच्या काळीं मुख्यतः सर्वच व्यापार इंग्लंडशीं चाले, किंवा ब्रिटिश वेस्ट इंडीजशीं चाले. लढाईनंतर ब्रिटिश बंदरांत व वेस्ट इंडीजमध्यें अमेरिकन जहाजें आणण्याची बंदी झाली. त्यामुळें अमेरिकन व्यापारास जोराचा धक्का बसला. सुप्रसिद्ध ब्रिटिश मुत्सद्दी पिट यानें ब्रिटिश जहाजें अमेरिकन बंदरात व अमेरिकन जहाजें ब्रिटिश बंदरांत सारख्याच अटीखाली नेण्यास प्रत्यवाय नसावा, याबद्दल पुष्कळ खटपट केली. इतर सर्व देशांचीं जहाजें ब्रिटिश बंदरांत येतात त्याच अटीवर व तितकेच कर भरून अमेरिकन जहाजे ब्रिटिश बंदरांत येण्यास काय हरकत आहे? असें पिट् प्रतिपादन करीत होता. परंतु ब्रिटिश व्यापाऱ्यांनीं ही गोष्ट हाणून पाडली. ते ह्मणत ' अमेरिकन जहाजें फार थोड्या किंमतींत बांधलेलीं असतात व त्यांना खलाशीही स्वल्प पगारांत मिळतात, त्यामुळें आमच्या दर्यावर्दी व्यापारास अमेरिकन जहाजवाले लवकरच धोका आणतील. इतर देशातील जहाजवाले व अमेरिकन जहाजवाले यांच्यात फरक आहे ! '

ब्रिटिश प्रजाजनांना अमेरिकन जहाजें खरेदी करण्यास बंदी करण्यात आली होती. नॅव्हिगेशन कायद्यामुळें अमेरिकन जहाजांना परकीय लेखण्यांत यई इतकेंच नव्हे तर प्रत्येक अमेरिकन वसाहत स्वतंत्र समजण्यांत येई. व ज्या वसाहतींतील जहाज असेल तेथील माल त्या जहाजानें आणला पाहिजे, इतर ठिकाणचा मालआणतां कामा नये असा निर्बंध

घातला होता. त्याचप्रमाणे फक्त जहाजे बांधण्यास लागणारे सामानच अमेरिकन जहाजांनी इंग्लिश बंदरांत उतरलें पाहिजे असा निर्बंध घातला होता. त्याचप्रमाणें इ. स. १७८३ सालीं वेस्ट इंडीजमध्यें कोणत्याही बंदरांत अमेरिकन जहाज येऊं देता कामा नये असा निर्बंध घालण्यात आला होता. युनायटेड स्टेट्समधून मासे-मास वगैरे कोणताही माल, मग तो ब्रिटिश जहाजातून जरी आणला असला, तरी येऊं देऊं नये असा निर्बंध घातला होता. लढाईपूर्वी म्हणजे अवघ्या दहावर्षांपूर्वी युनायटेड् स्टेट्सपैकी जवळ जवळ एकतृतीयांश व्यापार ब्रिटिश वेस्ट इंडीजशी होता, तो आतां साफ बुडाला. जमेका व बहामा येथील पंधरा हजार नीग्रो लोक, त्याना मिळणाऱ्या अन्नाचा पुरवठा युनायटेड् स्टेट्समधून बंद झाल्यामुळे मृत्युमुखीं पडले. आपण केलेल्या निर्बंधामुळे आपल्याच वसाहतींतील १५००, लोक मृत्युमुखीं पडले याचा ब्रिटिश व्यपाऱ्याचे मनाव काहीही परिणाम झाला नाही.

ब्रिटिश सरकार विकत घेत असलेल्या जिनसाचा खप बंद पडला. नीळ, दर्यावर्दी सामान, कच्चे लोखंड याना कोणी विचारीना. इंग्लंडशी होणारा व्यापार जो बुडाला त्याची भरपाई फ्रेंच, स्पॅनिश व इतर देशांशीं होणाऱ्या व्यापाराने होईना. युनायटेड स्टेटमने इंग्लंडशी व्यापारी तहाची वाटाघाट केली. पण ब्रिटिश व्यापाऱ्यांनी जोर धरला व या तहाचे वाटाघाटीत तुह्मी तेराही वसाहती एकमेकांपासून अलग आहांत तेव्हा अशा सुसंघटित नसलेल्या काग्रेसशी कसलाही तह करण्यात आह्माला फायदा नाही, असा जबाब ब्रिटिश मुत्सद्याकडून मिळाला.

दुसरीकडे स्पेनने मिसिसिपी नदीत नौकानयनाचे हक्क, स्पेन व अमेरिकन वसाहती याना समसमान असावेत, असा तहांत करार असून सुद्धां, मिसिसिपीचे दोन्हीं तीरावर व्यापार करण्याचा फक्त आपलाच हक्क आहे असा हट्ट धरिला. ॲलिघेनी पर्वताकडील रहिवाशांनीं आपला व्यापार करण्याचा मार्ग बंद झाल्याबद्दल कांग्रेसकडे तक्रार केली, व मिसिसिपींत व्यापाराचा हक्क नष्ट झाल्यास आम्हीं निराळे होऊं अशी धमकी-

दिली. त्याला वॉशिंग्टनने जबाब पाठविला कीं, आम्हीं आज सर्व एक असतांना ही दशा आहे मग उद्या तेरा झाल्यानंतर आमची काय दशा होईल त्याचा विचार करा !

निरनिराळ्या वसाहतींनी निरानिराळी व्यापारपद्धति अमलांत आणली होती. व त्यांचे आपआपसात खटके उडत- मॅसच्युसेट्स व न्यू जर्सी यांनी खुल्या व्यापाऱ्याचे तत्त्व स्वीकारले, व्हर्जीनियाने बाहेर जाणाऱ्या तंबाखूबर व आंत येणाऱ्या मद्य वगैरे पदार्थावर जकात बसवून पुष्कळ वसूल येईल असा बंदोबस्त केला. पेनसिल्व्हॅनिया, ऱ्होड आयर्लंड, व न्यू यॉर्क यांनी चैनीचे पदार्थावर ह्मणजे चहा, कॉफी, साखर इत्यादि पदार्थावर कर बसविले. व वसाहतींत तयार होणाऱ्या मालाप्रमाणे बाहेरून येणाऱ्या मालावर कर बसवून आपल्या धंद्याचे रक्षण करण्यास प्रारंभ केला. न्यू यार्क व पेनसिलव्हॅनिया यांनी ब्रिटिश जहाजातून येणाऱ्या एकूण एक जिनसांवर दुप्पट जकात बसविली. अशा तऱ्हेने अटलांटिक महासागराचे किनाऱ्यावरील तेरा वसाहतींत जकातीच्या तेरा पद्धती चालू होत्या, व त्यांचा परस्परांशी मेळ नव्हता पोटोमॅक नदींतून होणाऱ्या वाहतुकीसंबंधीं व्हार्जीनिया आणि मेरीलॅंडमध्ये वाद चालू होता. डिलॉवेर नदीतील व्यापाराबद्दल पेनसिलव्हॅनिया व डिलॉवेर हीं संस्थाने भाडत होती. या सर्व वसाहतींत जकातीचे बाबत एकच पद्धति सर्वमान्य होईपर्यंत ग्रेट ब्रिटन व स्पेनशीं व्यापारी तह घडवून आणणे फार दुरापास्त होतें.

**कारखान्यांची वाढ**—स्वातंत्र्य मिळाल्यामुळे लोकरीचा कपडा बीव्हरच्या कातड्याच्या टोप्या वगैरे वस्तू देशांतल्या देशांत किंवा परदेशांतही पाठविण्यास असलेले निर्बंध नाहीसे झाले होते. लोखंडाचे तयार भाग बनविण्यास मोकळीक मिळाली होती, लढाईचे वेळीं बाहेरून येणारे सर्वच जिन्नस बंद झाल्यामुळे बहुतेक पदार्थ देशांतल्या देशांत तयार होऊं लागले होते. तोफा, बंदुका, नांगर वगैरे वस्तूंबद्दल आतां इंग्लंडवर अवलंबून राहवें लागत नसे. त्या वस्तू ईस्ट ब्रिजवॉटर, कॅंटन, स्प्रिंगफील्ड, व ईस्टन वगैरे ठिकाणीं आतां उत्तम तयार होऊं लागल्या होत्या.

स्टर्लिंग वर्क्स नांवाच्या कारखान्यांत उत्तम तोफा ओतवूं लागले, तसेंच हडसन नदींत जहाजें येऊं नयेत म्हणून या किनाऱ्यापासून तों त्या किनाऱ्यापर्यंत एक जंगी साखळदंड बांधला होता, त्यांतील प्रत्येक दुवा अमेरिकेंतच तयार झाला होता. फ्रिन्सिपिआ येथें, लढाईंत वापरलेले अनेक तोफांचे गोळे ओतविले होते इतकेंच नव्हे तर खुद्द वॉशिंग्टन हा या कारखान्याचा मोठा भागीदार होता.

मीठ तयार करण्याचा धंदा याच सुमारास वसाहतीत सुरू झाला होता. आतांपर्यंत तें वेस्ट इंडीज व पोर्तुगालमधून येई. सर्व मीठ समुद्राचें पाणी उकळून व आटवून तयार होई. अमेरिकेंत वापरला जाणारा सर्व कपडा गेली दहा वर्षें अमेरिकेंतच तयार करवून घेणें भागच पडलें होतें. त्यामुळें अमेरिकन कापडाचे व्यापारास ऊर्जितावस्था आली होती. लढाईं-तील पुष्कळशा शिपायांच्या अंगावरील कपडे त्यांच्याच घरच्या मेंढ्यांच्या लोंकरीपासून घरच्याच बाया माणसांनीं विणलेले होते.

इ. स. १७६५ सालीं न्यू यॉर्कच्या गव्हर्नरनें बोर्ड ऑफ ट्रेडला केलेल्या रिपोर्टांत खालील विधानें आहेत. " येथील सर्व रहिवाशांच्य पायमोज्यास पुरे इतकी लोकर येथें पैदा होत नाहीं, तरी पुढील दहा वर्षांत ती तितकी उत्पन्न होईल असे पद्धतशीर प्रयत्न येथील रहिवाशांनीं चालविले आहेत. " न्यू यॉर्क येथील कला, शेती आणि काटकसर यांस उत्तेजन देणाऱ्या एका संस्थेनें तागाचें सूत, कपडा व पायमोजे करणारास बक्षिसें देण्याचें ठरविलें आहे. पायमोजे तयार करण्याकरितां लागणाऱ्या यांत्रिक चौकटी, लोखंडाच्या बनविणाऱ्या पहिल्या तीन गृहस्थांस सुवर्ण-पदक द्यावयाचें ठरविलें आहे. धुवट कपडा तयार करणाऱ्या कारखान्यास तीस पौंड बक्षीस मिळणार आहे. बॉस्टन येथें तर एक विणकामाची शाळाच काढण्यांत आली आहे. या संस्थेचा चालक विल्यम मोलिनो म्हणतो कीं, आम्ही ३०० बायका व मुलें यांना ही कला उत्तम तऱ्हेनें शिक-वित आहेत. तेथें १२ माग सतत लोकरीचें, तागाचें व शिडास लागणारें कापड तयार करीत आहेत. तेथेंच कपड्यास धुवट करण्याचें, तजेला आणण्याचें व रंगविण्याचें काम चालूं आहे. " इ. इ.

शेतीवर अवलंबून असणारे कित्येक धंदे ब्रिटिश लोकांच्या मेहेरबानीवर होते. त्यांचें स्वातंत्र्याचे उदयानंतर नुकसान होऊं लागलें. टरपेंटाईन तयार करण्याचा व नीळ पिकविण्याचा धंदा पूर्वीइतका उत्तम चालेना. देवदारी सोट वसाहतींचे काळांत ब्रिटिश जहाजांचे शिडाकरितां राखून ठेवण्यांत येत, तें नियंत्रण आतां राहिलें नव्हतें. तरी सुद्धां ते तोडल्यानें टरपेंटाईन तेलाच्या उत्पन्नाची भरपाई होईना. पुढें लवकरच या मालास युरोपांत गिऱ्हाईक मिळूं लागलें व अमेरिकेतही धंद्याची व लोकसंख्येची वाढ होऊं लागल्यामुळे पुढें लवकरच या धंद्याचा जम बसूं लागला.

जमिनीचे मालकीबद्दल व धान्याचे पद्धतीतही मोठमोठे फेरफार झाले. पूर्वीची जमीनदारीची पद्धत नष्ट करण्यांत आली. पुष्कळ जमीनदारांनीं मोठमोठ्या जमिनी वसाहती न करितां किंवा लागवडही न करितां पाडून ठेविल्या होत्या त्या जप्त करण्यांत आल्या. मोठमोठ्या लॉर्ड लोकांच्याही जमिनी जप्त झाल्या. जेफरसननें खटपट करून त्या सर्व प्रत्यक्ष लागवड करणाऱ्या लोकांसच ठरीव कर घेण्याचें ठरवून देऊन टाकिल्या- अशा रीतीनें देशांतील धान्याचे उत्पन्न वाढूं लागलें व त्याबरोबरच जमीनधान्याचें उत्पन्नही वाढलें.

**गुलामगिरीविरुद्ध चळवळ**—आफ्रिकेंतून शिद्दी गुलाम आणून त्यांना वसाहतींत कामास लावण्याचें धोरण तात्पुरतेंच अमलांत रहावें असें वसाहतींतील सर्व लोकांचें मत होतें. युरोपांतून पुरेसे वसावतवाले आल्यानंतर व येथीलही लोकसंख्या वाढल्यानंतर मग गुलाम आणण्याचें बंद करण्यास हरकत नाहीं, असें लोकमत प्रचलित होतें. दाक्षिणेंतील वसाहतींत गुलाम लोक कामास लाविल्यापासून जरी बराच फायदा मिळे, तरी त्यांची संख्या वाढल्यापासून होणाऱ्या अडचणींची तुलना करितां एकंदरींत गुलामांचा व्यापार बंद करण्यापासूनच अधिक फायदा दिसून येत होता. साउथ कॅरोलिना, मेरीलँड व मॅसॅच्युसेटस येथील वसाहतींनीं गुलाम देशांत येऊं देण्यावर जबरदस्त कर बसविला होता, तो इतका कीं, त्यांची आयात होणें अशक्य व्हावें. पण ब्रिटिश व्यापारी धोरण

गुलामांचे व्यापारास अनुकूल असल्यामुळें, गुलामाविरुद्ध कायदा वसाहतीत झाला कीं त्याला पार्लमेंटकडून व्हेटो ह्मणजे हरकत येई. इ. स. १७१३ ते १७३३ सालांचे दरम्यान रॉयल आफ्रिकन कंपनी, दरसाल पांचपासून दहा हजार गुलाम आणून अमेरिकेत विकी. या कंपनीचे चालकांचे व भागीदाराचे ब्रिटिश सरकारात फार वजन होते. १७३३ साली या कंपनीचा लायसेन्स खलास झाल्यावर खासगी व्यक्तींनी हा धंदा आरंभला. इ. स. १७१० सालींच दर गुलामामागे पाच पौंड जकात ठेवण्याची सूचना व्हर्जीनियाने केली होती. पण तेथील ब्रिटिश गव्हर्नरने ती फेटाळून लाविली. त्यानंतर त्याच वसाहतींत इ स. १७३३—६६—६९ सालीही जकातीच्या सूचना आल्या होत्या. साऊथ कॅरोलिनाने दहा पौंडांपासून १०० पौंडांपर्यंत जकात प्रत्येक आयात होणाऱ्या गुलामावर ठेविली होती. व या जकातीच्या पैशांतून युरोपातून येणाऱ्या त्याच्या वसाहतवाल्यास मदत करण्याची त्यांची योजना होती. इ. स. १७६० सालीं कॅरोलिना वसाहतीनें गुलामांची आयात अजिबात बंद केली. आणि त्या गोष्टीस तेथील गव्हर्नरची संमति मिळून सुद्धा प्रीव्ही कौन्सिलने हरकत घेतली, इतकेंच नव्हे, तर गव्हर्नरास असला लाडा कारभार केल्याबद्दल जोराची थप्पड बसली

इ स. १७७२ साली व्हर्जीनिया वसाहतीनें एक लाबच लांब अर्ज पार्लमेंटास सादर केला. आफ्रिकेचे किनाऱ्यावरून शिद्दी लोक पकडून आणून त्याना अमेरिकेत गुलाम ह्मणून विकणें हे फार अमानुष असे कृत्य आहे. तसेच त्यामुळे एकादे वेळीं आपल्या सबंध वसाहतीवर मोठें संकट कोसळून त्या वसाहतीच आपल्या ताब्यांतून जाण्याचा संभव आहे, ह्मणून असल्या अनीतिमूलक व्यापाऱ्याचा आम्ही वसाहती नायनाट करण्याचा प्रयत्न करीत असतांना सुद्धां आम्हांला जो वरचेवर अडथळा करण्यांत येत असतो त्याचा प्रतिकार करण्याची आम्ही अत्यंत नम्रतेनें आपले चरणीं विनंति करीत आहों,' असें त्या अर्जात म्हटलें होतें.

उत्तरेकडील वसाहतींत गुलामांचीं संख्या फारशी नव्हती, तेथें बहुतेक मुदतबंदीचे युरोपियन मजूरच असत, तरीपण तेथें सुद्धां, गुलामांचा व्यापार फायदेशीर होई. तेथें जकात भरून लोक गुलाम आणवीत पण

तेथल्याच कायद्यानें असें ठरविलें होतें कीं गुलाम बाहेर पाठवितांच ही जकात मालकास परत मिळेल. त्यामुळे बॉस्टन व न्यू पोर्ट हीं गुलामगिरीच्या व्यापाराचीं महत्वाची केंद्रें बनली होतीं. तेथें गुलाम आणून सांठवीत, व गि-हाईक मिळतांच त्यांस विकून टाकीत. गुलामांची आयात बंद करण्याची खटपट करणारे सर्वच उच्च हेतूने प्रयत्न करीत होते, असे मात्र ह्मणतां येणार नाहीं. कांही गृहस्थांनी दक्षिणेकडील संस्थानांत गुलामांचे कळपच्या कळप वाढविले होते. व ते त्याची अगदी गुरांच्या कळपाप्रमाणेच जोपासना करीत व त्यांना विकीत. गुलामाची आयात बंद झाल्यावर आपल्या मालास उत्तम गि-हाईक मिळेल असे वाटून कांही अट्टल-बदमाषांनी साधुत्वाचें ढोंग आणले होते, हे येथे नमूद केलें पाहिजे.

स्वातंत्र्याच्या जाहीरनाम्याचे मूळ प्रतीत इंग्लंडचे राजावर असा आरोप करण्यांत आला होता की, " आपण मानव धर्माविरुद्धच क्रूर युद्ध करीत आहांत, एका दूर देशातील लोक, ज्यानी तुमचा यत्किंचित्‌ही अपराध केला नाही त्यांच्या जीविताचे व त्याच्या स्वातंत्र्याच्या एकंदर सर्व हक्काचे अपहरण करून त्यांना गुलाम बनवून त्यांना पृथ्वीचे दुस-या भागावर विकीत आहात व इतक्या लांबीच्या प्रवासात त्यांच्यावर मरण ओढवीत आहांत " वगैरे वगैरे.

इ. स. १७८० साली जे नीग्रो गुलाम लढाईवर जातील त्यांची गुलामगिरीतून पूर्ण मुक्तता करण्याचे आश्वासन कॉंग्रेसने दिले, वॉशिंग्टनचे विनतीवरून काग्रेसने मुक्त केलेल्या सर्व गुलामाचे मालकांस नुकसानभर-पाई देण्याचे अभिवचन दिले. लढाईवर गेलेल्या मुदतबंदी मजुरांसही लढाई संपतांच मुक्त करून नागरिक बनविण्यांत आले, त्यामुळ लढाई संपतांच मुक्त असे नीग्रो गुलाम स्वतंत्र फिरतांना दिसूं लागले.

इ. स. १७१३ ते १७८० चे दरम्यान दरसाल अंदाजे वीस हजार गुलामांची विक्री होत असे. इ. स. १७७१ सालीं गुलामांचा व्यापार करणारीं दोनशे तरी ब्रिटिश जहाजे होतीं, तीं लंडन, ब्रिस्टोल व लिव्हरपूल येथील होतीं. लिव्हरपूलला आज जें वैभव प्राप्त झालें आहे तें मुख्यत्वें-करून गुलामांच्या व्यापारानेंच झालें आहे, लिव्हरपूल येथें एकदां एक

नाटक चाललें असतां प्रेक्षकांनीं नटाची टवाळी केली तेव्हां तो चिडून म्हणाला, " ऐट कशाला करितां ? तुमच्या घरांचा दगड नि दगड गुलामांच्या रक्तानें बसविलेला आहे.! " वास्तविक पाहतां अमेरिकेंतील न्यू पोर्ट व ऱ्होड आयलंड शहराबद्दल सुद्धां असेंच म्हणतां येईल. तेथील धार्मिक सुधारणा करणारांचे मनांत गुलामगिरीच्या व्यापाराची अनीतिमूलकता बिलकूल आली नाही; अगदी मातृदेशांतल्या पद्धतीबरहुकूम, त्यांची धर्मभावना व द्रव्यतृष्णा यांमधील अंतर जसेंच्या तसें कायम राहिले.

दलित मानव वर्गाचे इतिहासांत या जिवंत नरमांसविक्रीयाइतकी किसळवाणी दुसरी गोष्ट असेल असें वाटत नाही. या आफ्रिकेंतून पकडून आणलेल्या मानवी जनावरांना जहाजाच्या तळघरांत कोंडून ठेवीत. तेथे भरपूर अंधार असे व हवेचें तर नांवच काढावयास नको, त्या जहाजांवरील पिण्याचें पाणी संपलें, किंवा खाण्याचे जिनसांचा तुटवडा भासूं लागला, किंवा प्लेगपटकीसारखा अजार उद्‌भवला तर मग सगळेच्या सगळे नीग्रो समुद्रांत फेंकून देत. एकाद्या गुलामानें किंचित् जर कां प्रतिकार केला, तर त्याचे हातपाय, डोळे, कान, कशावर गदा येईल हें सांगण्यापेक्षां कल्पनाच केलेली बरी सुप्रसिद्ध इंग्रजी चित्रकार टर्नर यानें काढिलेले ' स्लेव्हशिप ' हें चित्र पाहिलें म्हणजे, खवळलेल्या समुद्राचे पृष्ठभागावर नीग्रो गुलामांची प्रेतें इतस्ततः तरंगत असतांना कोणाही सहृदय पुरुषाचें अंतःकरण तीं अवलोकन करितेवेळीं खळबळून गेल्याशिवाय राहणार नाहीं. स्वातंत्र्याचे लढाईचे पूर्वी गुलामांची संख्या पांच लक्षांचे घरांत गेली होती.



# कॉनफेडरेशन कीं फेडरेशन ?

## प्रकरण ११ वें.

## संस्थानांचा संघ कीं संघटित संस्थान ?



ज्यावेळीं स्वातंत्र्याचा जाहीरनामा सर्व वसाहतींनीं काढला, त्यावेळी युनायटेडस्टेट्सकरितां एक राज्यघटना तयार करण्याविषयी कमिटी नेमण्यांत आली होती. ही घटना करणे फार जबाबदारीचे व अवघड काम होतें, सर्व संस्थानांवर लटकत असलेली ब्रिटिशांची तलवारच या संघटनेस कारणीभूत झालेली होती. तरीपण प्रत्येक वसाहतीला मर्यादित कां होईना पण बराच काल स्वातंत्र्यांत राहता आल्यामुळे एका नवीन राज्यव्यवस्थेला मान वाकविण्याचें जड जात होतें. इ. स. १७७६ चे जुलई माहिन्यात घटना कमिटीनें आपला रिपोर्ट सादर केला त्यानंतर वादविवादांत एक महिना गेला. त्यानंतर पुढील वर्षापर्यंत लोकमत अजमावण्याकरिता वेळ घेण्यांत आला.

इ. स. १७७७ चे एप्रिल महिन्यांत संघटना कमिटीने रिपोर्टाचें काम पुन्हा हातीं घेतलें. त्यावेळीं लढाई जोरानें चालू झाली होती. प्रत्येक संस्थानांत ब्रिटिशांची सत्ता नाहीशी होऊन लोकसत्ताक राज्यव्यवस्था स्थापन झाली होती. त्यावेळीं राष्ट्रीय एकीकरणाचे विचारांस बरीच चालना मिळाली होती. परंतु असे कित्येक लोक होते कीं, त्यांना आपापल्या संस्थानापुरतेच स्वातंत्र्य पाहिजे होतें. इतर संस्थानांच्या राज्यघटनेशीं, विचारांशीं व संस्कृतीशीं आपले जमेल असें त्यांना वाटत नव्हतें.

इ. स. १७७७ चे नोव्हेंबर महिन्यांतील १५ वे तारखेस संघटणा कमेटीचे रिपोर्टावर मतें घेऊन कॉंग्रेसनें ती घटना मान्य केली. त्यावेळीं बराच वादविवाद झाला. त्यानंतरची पुढची पायरी ह्मणजे प्रत्येक संस्थानाकडे नवीन संघटना मान्यतेसाठीं पाठवावयाची. व त्यांची मान्यता मिळाविण्यास

सुमारें १७७८ च्या जून महिन्यापर्यंतचा काल लागला. प्रत्येक संस्थाना-कडून निरनिराळ्या उपसूचना आल्या. अशा रीतीनें आलेल्या निरनिराळ्या उपसूचनांचा विचार करणें हें एक मोठे कामच झालें व त्यामुळे कांग्रेसला आपलें काम झपाट्यानें आवरतां येईना. प्रथम आठ संस्थानांनीं मान्यता दिली. मेरीलॅंड वसाहतींची समजूत करून मान्यता मिळवीपर्यंत १७८१ चा महिना उजाडला. म्हणजे लढाईचा जवळ जवळ शेवट होईपर्यंत कॉनफेडरेशनच्या तत्वाचा खल चालला होता.

आतापर्यंतच्या हाकिकतीवरून वाचकाना कळून चुकले असेल कीं, स्वातंत्र्याच्या लढाईला सुरुवात मोठासा विचार करून झाली होती असें नाहीं, ती एक वावटळच उठल्याप्रमाणे झाले होते. मुत्सद्देगिरीपेक्षां शिपाईगिरी-च्याच जोरावर लढाई चालू होती. लढाईतील जे शूर शिपाई इतर वसा-हतींतील शिपायांशीं खांद्यास खांदा लावून लढत त्यांचीच राज्यव्यवस्थेच्या कामी जितकी दिल--जमाई व्हावयास पाहिजे तितकी ती होत नसे. निर-निराळ्या वसाहतींतलि लोकांच्या परस्थांविषयी परस्पर विरोधी कल्पना पाहिल्या म्हणजे निराशा वाटूं लागे.

ज्या तऱ्हेची घटना कमेटीनें तयार केली होती ती अगदीं सहज सर्व वसाहतीना मान्य होण्यासारखी होती, पण ती मान्य मात्र लवकर झाली नाहीं. प्रत्येक संस्थानाचा परस्पराविषयीं अविश्वास, संशय, दिरंगाई, परांङ्मुखता अशा अनेक कारणांनीं ही घटना लांबणीवर पडली. एक-राष्ट्रीयत्वानें उत्पन्न होणारी सत्ता हातीं नसल्यामुळें, लढाईचे वेळीं स्थापन झालेल्या तात्पुरत्या सरकारास बंदोबस्त ठेवणें फार दुर्घट झाले. त्यावेळच्या कांहीं धोरणी व उदार मुत्सद्यांनीं जर जिवापाड मेहनत केली नसती तर सर्व स्वातंत्र्याची लढाई म्हणजे पोरखेळ झाला असता व अपयश खात्री-नेंच आलें असतें.

स्वातंत्र्याचें लढाईत विजय प्राप्त झाला त्यावेळपर्यंत युनायटेड स्टेट्सचे राज्यघटनेस कॉनफेडरेशनचें म्हणजे संस्थान संघाचें निश्चित स्वरूप आलें होतें. पूर्ण सत्ताधारी अशा लहान लहान तेरा संस्थानांची ती

एक जूट होती. सर्व कार्यकारी व कायदेकानू करण्याची सत्ता कांग्रेसकडे होती. संस्थानें लहानमोठीं होतीं त्यामानानें प्रत्येक संस्थानाचे दोनपासून सातपर्यंत प्रतिनिधी कांग्रेसमध्यें असत त्या सर्वांची मिळून एकच सभा होती. कांग्रेसचे हातीं जी सत्ता सर्व संस्थानांनीं दिली होती तेवढीच सत्ता कांग्रेसला उपभोगतां येई. मुख्य अधिकार प्रत्येक संस्थानास स्वतंत्र असत.

कांग्रेसचे हाती लढाई किंवा तह करणें, व्यापाराचे नियत्रण करणे, परराष्ट्रात वकील पाठविणे, नाणें पाडणें व त्याची किंमत नियंत्रित करणे, परस्पर सस्थानांत हद्दीचे तंटे उत्पन्न झाल्यास निवाडा करणे व इतर सार्वजनिक हिताची कृत्ये करणे यासंबंधीं सत्ता होती. सर्व संस्थानाकरिता मिळून एक कोर्ट किंवा न्यायाधीश नव्हता. कोणताही कायदा करणें असेल तर त्यास निदान नऊ संस्थानांची सम्मति आवश्यक होती. मतें देतांना प्रत्येक संस्थानास एकच मत होते व ही संघटणा अमर्याद कालपर्यंत टिकावी असे ठरविण्यांत आलें होतें.

ही नवीन घटना अमलांत आणण्याचे कामी फार मोठाल्या अडचणी येऊं लागल्या. इ. स. १७८१ सालीं मेरीलँडनें आपली मान्यता दिल्यानंतर तेराही संस्थानांची एकवाक्यता होऊन कॉनफेडरेशनची राज्यघटना अमलात आली. पूर्वीच्या लढाऊ सरकारनें राजीनामा देऊन दुसरे दिवशीं त्याच मेंबर लोकांनी नवीन घटणेंत प्रवेश केला. अजून लढाई संपली नव्हती. नवीन घटणा त्यावेळच्या परिस्थितीस अनुसरून असावी तितकी सुसूत्र आहे असे दिसेना. कारण पहिल्याप्रथम या घटनेनें स्वातंत्र्याचे जाहीरनाम्यांतील कांहीं अटींनांच बाध येऊं लागला. असें दिसून आलें की कॉंग्रेसला मिळालेली सत्ता अगदी अपुरी आहे, ती लोकांपासून न मिळतां तेरा संस्थानांकडून मिळालेली आहे. आणि हीं तेरा संस्थानें पहावीत तर सर्वतंत्र स्वतंत्र. जी राज्यघटना एकराष्ट्रीयत्वाचें उच्च हेतूंना धरून घडविण्यांत आली, तिच्यांतील कलमें एकराष्ट्रीयत्वाचे विरुद्ध आहेत, असें दिसून येऊं लागलें. सुदैवानें लवकरच लढाई आटोपली म्हणून बरें झालें, नाहीं तर या तात्विक वादानें आपसांत मतभेद व घोटाळे उत्पन्न होऊन लढाईचे कामांत व्यत्यय आला असता.

नवीन राज्यकारभारावरील पहिली जबाबदारी राष्टीय कर्जफेड करण्याची होती. ही कर्जाची रक्कम आतांपर्यंत अडतीस कोट डॉलरपर्यंत फुगली होती. प्रत्येक संस्थानास कर्जफेडीस पुरे इतका पैसा नवीन कर बसवून उत्पन्न करण्याची शिफारस करण्याची सत्ता कॉंग्रेसचे हातीं नव्हती, तरी पण वेळ प्रसंग पाहून कांहीं संस्थानांनीं आपल्या वाट्याइतका कर्जाचा भार आपखुषीने पत्करिला. कांहीं संस्थाने कुचराई करूं लागलीं व कांहींनी तर राष्ट्रीय कर्ज फेडण्याचे साफ नाकारिले. अशा तऱ्हेनें नवीन सरकारला पहिल्याप्रथमच आपले कार्य करण्यास मोठा अडथळा उत्पन्न झाला, आणि कर्जफेडीची बाब तर अगदी महत्वाची होती. तिच्यावर तर सर्व राष्ट्राची व नवीन सरकारची पत अवलंबून होती शिपायांचे पगार थकले होते, ते रिकाम्या खजिन्यातून कसे द्यावयाचे हाही एक महत्वाचा प्रश्न होता

रॉबर्ट मॉरिस नावाच्या एका अतिधनाढ्य गृहस्थानें आपले सर्वस्वी कांग्रेसला अर्पण करून तिचा अडचणींचे वेळीं थोडासा बचाव करण्याचा प्रयत्न केला. पण त्यामुळे त्याला स्वतःला दारिद्र्यात रहावें लागले, आणि कांग्रेसला तेवढ्या पैशाने आपली गरज भागविणे शक्य नव्हतें. नवीन संघटणा अमलांत येऊन तीन वर्षे झालीं तरी या नवीन सरकारला सांपात्तिक स्थिति सुधारता आली नाहीं. त्यानंतर अशी भीति वाटूं लागली कीं, राज्यघटनेत महत्वाच्या सुधारणा करून कांग्रेसचे हातीं अधिक सत्ता दिल्याशिवाय निभाव लागणें शक्य नाहीं. इ. स. १७८३ पासून १७८७ पर्यंत या राज्यघटनेचीं शकलें होऊन ती पूर्वीप्रमाणे विस्कळीत होते काय अशी चिंताजनक परिस्थिति उत्पन्न झाली होती. एकदां वॉशिंग्टननें बोलून दाखविले कीं, स्वातंत्र्य मिळविण्यासाठीं लढाईत इतक्या जीवांचा संहार करून आपण इतर राष्ट्रांकडून हंसून घेण्यापेक्षां दुसरें कांहींही मिळविलें नाही. हल्लींची आपली राज्यव्यवस्था म्हणजे एका फाटक्या गोधडीप्रमाणें आहे. जर या राज्यव्यवस्थेंत महत्त्वाच्या सुधारणा सुधारणा घडवून आणल्या नाहींत तर, एकराष्ट्रीयत्व मिळविण्याकरितां आपण सर्वांनीं जो स्वार्थत्याग केला व इतकें रक्त सांडलें त्याचें कांहींएक चीज होण्याचा संभव नाहीं. याचें आपणांस वाईट वाटत आहे.

कॉनफेडरेशनचे हातीं असलेली सत्ता जरी अगदी अपुरी होती व त्यांचे मार्गांत अडचणी जरी अपरिमित होत्या तरी त्याने दोन महत्वाच्या गोष्टी केलेल्या आहेत. पहिली गोष्ट ह्मणजे ओहाओ नदीचे उत्तरेकडील व पश्चिमेकडील प्रांतात प्रवेश करून तेथील वस्ती वाढविण्याचे कामीं व लवकरच हा सर्व प्रदेश लागवडीस आणण्याचे कामी फार खटपट केली. जॉर्ज रॉबर्ट क्लार्क याने ब्रिटिश लोकापासून ॲलिघेनी पर्वत व मिसिसिपी नदी यांचे दरम्यानचा सर्व प्रदेश युनायटेड स्टेट्सतर्फे जिंकला होता. तेथें जंगल अत्यंत दाटे व जमीनही सुपीक होती. हा मुलुख तेरा वसाहतीं-पेक्षां किती तरी मोठा होता. तेथे इंडियन लोकांच्या टोळया शिकार भरपूर असल्यामुळे फिरत असत, पण त्यांची कायम वस्ती या प्रदेशांत नव्हती. लढाईनंतर अमेरिकन लोकांचे ताब्यात हा मुलुख पूर्णपणे आला त्यामुळे युनायटेड स्टेट्सची हद्द अटलांटिक महासागरापासून मिसिसिपी नदीपर्यंत वाढली होती. परंतु इतक्या अवाढव्य मुलखात बंदोबस्त कसा राखाव-याचा, वस्ती कशी करावयाची व तो लागवडीस कसा आणावयाचा हा मोठा प्रश्न होता. थॉमस जेफरसनने या नवीन प्रदेशाचे बंदो-बस्ताकरितां व वाढीकरता एक योजना तयार केली होती ती पुढे कांग्रेसने मान्य केली. या योजनेप्रमाणेच या एकंदर मुलुखाची पांच दुसरी संस्थाने बनविण्यांत आली होती. त्यांची नांवे :— ओहाओ, इंडियाना, इलिनॉय, मिचीगन, व विसकॉनसिन याप्रमाणे होती. या नवीन संस्थानांचा दर्जा पूर्वीच्या तेरा संस्थानाप्रमाणेच सर्व बाबतींत रहावयाचा होता. तेथे राहण्यास जाणार लोकाना उत्तम शिक्षण देण्याची योजना केलेली होती, व तेथे मुदतबंदीचे मजूर अथवा गुलामगिरीतील मजूर कामास लावण्यात येणार नव्हते. या प्रांतावर जनरल ऑर्थर सेंट क्लेअर नांवाच्या लष्करी अधिकाऱ्याची नेमणूक करण्यात आली होती. हा त्यावेळी कांग्रेसचा अध्यक्ष होता. त्याने मारिट्टा येथे आपले ठाणे दिले. व या अवघड कामास मोठ्या उत्साहाने प्रारंभ केला.

दुसरी महत्वाची गोष्ट कांग्रेसने केली ती चलनाच्या नाण्याची शास्त्रशुद्ध व सोपी अशी पद्धति अमलांत आणणे ही होय. आतांपर्यंत

प्रचलित असलेल्या चलनी नाण्याच्या पद्धती घोटाळ्याच्या, अवघड व अडचण करण्याच्या होत्या. पूर्वी तेराही संस्थानात गिनी, पाऊंड, शिलिंग, पेन्स वगैरे इंग्लंडांतील नाणीं चालत असत स्वातंत्र्य मिळाल्यानंतर चालू नाण्याचे पद्धतींत कांही तरी सुधारणा करण्याची इच्छा साहजिकच उत्पन्न झाली. याही कामीं थॉमस जेफरसन याने पुढाकार घेतला होता लढाईमुळें व इतर देशांशीं व्यापार असलेमुळे आणि स्वतःची अशी पद्धति नसल्यामुळें बहुतेक सर्व प्रकारची नाणीं वसाहतींत चालत असत इतकेंच नव्हे तर, कोठल्याही दोन वसाहतींत एकाच नाण्याची किंमत सारखी नसे इंग्रजी नाण्याखेरीज फ्रेंच क्राऊन्स, स्पॅनिश रिल्स, व डॉलर्स, हॅवानातील नाणीं वाटेल तें वसाहतींत चालत असे. कधीकाळी नाण्याचे अर्धे अथवा चतुर्थांश भाग सुद्धां चालत असत.

नाण्याच्या सुधारणेचे काम मुख्य फडणीस रॉबर्ट मॉरिस याचे-वर सोंपविलें होतें. त्यानें इंग्लंडमध्ये चालत होती त्या नाण्यांच्या अंदाजे तशींच नाणीं पाडण्याची शिफारस केली होती. पण जेफरसन यास ती बिलकुल आवडली नाही. डॉलर हे स्पॅनिश नाणेच आधारभूत समजून दशांशांत हिशेब करितां येईल अशी पद्धति अमलात आणण्या-करितां त्यानें डॉलरचे शंभर भाग करावे असे सुचविलें. त्यानंतर या विषयीं बराच वादविवाद होऊन एकमत होण्याची आशा दिसेना पण जेफरसननें नेट धरून कांग्रेसकडून आपल्या योजनेस संमति मिळविली.

कॉनफेडरेशन स्वरूपाच्या राज्यव्यवस्थेखालीं कारभार चालविणे अत्यंत अवघड गोष्ट होऊन बसली. अजूनही बारीकसारीक तंटे व धुसफूस निरनिराळ्या वसाहतींत चालूच होती. विचारी अशा मुत्सद्यांना आढळून आलें कीं जर संघटित अशी राज्यव्यवस्था पाहिजे असेल तर हल्लीची राज्य-घटना अगदीं निरुपयोगी आहे. तिच्यांत महत्वाचे फरक शक्य तितक्या लवकर घडवून आणले पाहिजेत. या कामीं खुद्द वॉशिंग्टननेंच पुढाकार घेतला. त्यावेळीं वॉशिंग्टनपेक्षां बुद्धिवान लोक नव्हते असे नाहीं पण वॉशिंग्टनच्या अंतःकरणाची कळकळ व कार्यप्रवणता इतरांमध्ये नव्हती. तसेच

वॉशिंग्टनवर लोकांचा अढळ विश्वास असल्यामुळें त्याचे शद्वांस मान होता, त्यामुळेंच पुढील राज्यघटनेचे काम कांहींसे सुकर झालें.

इ स. १७८६ साली वॉशिंग्टनने ॲनापॉलिस येथें एक सभा बोलाविली. तींत राष्ट्रांतील निरनिराळया मुत्सद्यांना आमंत्रण दिलें होतें. व तींत राज्यकारभारा संबंधीं व व्यापारी धोरणासंबंधीं राष्ट्राच्या गरजा काय आहेत हें समजून घेण्याचा प्रयत्न केला होता. या सभेस पांच संस्थानांतून निरनिराळे सभासद आले होते देशांत येणाऱ्या निरनिराळया मालावर काय जकात घेतली जावी, यासंबंधी या सभेंत बराच उहापोह करण्यात आला. व हें जकातीचे धोरण अमलांत आणण्यांत कॉनफडरेशन घटनेची कोणकोणती कलमें आड येतात ते विशद करून सर्व सभासदांस सांगण्यांत आले.

याच पद्धतीने दुसऱ्या अनेक सार्वजनिक बाबींची चौकशी करण्यांत आल्यानंतर, आपल्यास हव्या त्या सुधारणा करण्याचे मार्गांत आपली राज्यपद्धति कशी आड येते यासंबंधीं पुष्कळच सभासदांची खात्री झाली. या सभेंत पुरेशा संस्थानांतून प्रतिनिधी न आल्यामुळे तिला खरें प्रातिनिधिक स्वरूप येऊं शकलें नाहीं तरी पण तिची उपयुक्तता लोकांस पूर्णपणें पटल्यामुळे पुढील सालीं मोठ्या प्रमाणावर असलीच एक सभा बोलावण्यांत आली, व सर्व वसाहतींना आपापले प्रतिनिधी पाठविण्याविषयीं आग्रहाचे आमंत्रण देण्यात आले कांग्रेसनेही याकामी पुढाकार घेऊन निरनिराळया संस्थानांस आपआपले प्रतिनिधी पाठविण्यास कळविलें.

पुढील वर्षाचे सभेत ऱ्होड आयलंडखेरीज इतर सर्व संस्थानांचे प्रतिनिधी हजर होते. खऱ्या अडचणी काय आहेत यासंबंधीं एकमत होतच होतें. खाजिन्यात शिल्लक नाही, व इतर राष्ट्रांपाशीं पत नाही, लोकांचें देणें देण्याचे तगादे लागलेले, कॉंग्रेसला कर बसविण्याची सत्ता नाहीं, इतर रीतीने उत्पन्न मिळविण्याचें साधन नाहीं, या सर्व गोष्टींचा पगडा सभासदांचे मनावर बसून नवीन राज्यपद्धति अमलांत आणण्यासंबंधीं त्यांचें अनुकूल मत होऊं लागलें होते. शेवटीं इ. स. १७८७ च्या

मे महिन्यात राज्यकारभारात इष्ट फरक घडवून आणण्यासाठी फिला- डेल्फिया येथे या सभेचे एक अधिवेशन भरलें.

या सभेस जॉर्ज वॉशिंग्टन हा व्हर्जीनिया संस्थानतर्फे प्रतिनिधि या नात्यानें हजर होता. अर्थात् त्यालाच अध्यक्ष निवडण्यांत आलें. या सभेस दुसरे पन्नासवर प्रतिनिधी हजर राहिले होते बहुतेक सर्वांची समजूत अशी होती की, चालू राज्यघटनेत काही इष्ट फरक घडवून आणावयाचे आहेत. काही प्रमुख मंडळींखेरीज, या सभेत आजिबात नवीनच राज्यपद्धति सुचावण्यात येणार आहे, याची कोणास कल्पना सुद्धा नव्हती. ही प्रमुख मंडळी म्हणजे वॉशिंग्टन, फ्रँकलिन, मॅडिसन इत्यादि होती. त्यांनी थोड्याच वेळांत चालू राज्यघटना अजिबात बदलून दुसरीच म्हणजे फेडरेशनच्या ( संघटित संस्थान ) पद्धतीवर राज्यघटना पाहिजे अशी सूचना आणली. ही सूचना आजिबात नवीन असल्यामुळे तीवर कडाक्याचा वाद झाला. नंतर एक कमिटी नेमण्याचे ठरून त्या कमिटीकडे हल्लींची राज्यघटना शक्य तोंपर्यंत मोठमोठे फेरफार करून राखतां आल्यास पहावी, नाहीतर नवीन राज्यघटना तयार करावी, असा अधिकार देण्यांत आला. सप्टेंबर महिन्यात कमिटीची नवीन राज्यघटना तयार झाली. ही राज्यघटना बऱ्याच अंशी हल्ली युनायटेड्स्टेट्समध्ये चालू असलेली राज्य- घटना होय.ह्याही राज्यघटनेवर बराच वादविवाद, दुरुस्त्या,उपसूचना वगैरे होऊन शेवटी गव्हर्नर मॉरिस याने केलेला मसुदा मान्य करण्यात आला. व हा मसुदा पुन्हा कमिटीकडे पसंतीकरिता व फेरतपासणीकरितां धाड- ण्यांत आला. या कमिटीचा अध्यक्ष हॅमिल्टन हा होता त्यानें एकंदर राज्यघटनेच्या मूळहेतूसंबंधी पूर्वीच्या घटनेस एक पुस्ती जोडली होती. तींत कॉंग्रेसला लोकांकडून सर्व सत्ता मिळाली आहे असें तत्व प्रतिपादन करून, संस्थानांकडून मिळालेल्या सत्तेस बाजूस सारिले त्यामुळे अर्थात् मुख्य अधिकारी कॉंग्रेस बनली. व राष्ट्राचे एकीकरण आपोआप साधलें.

अशा तऱ्हेनें सर्व राज्यघटनेचा मसुदा फेडरेशनचे तत्वावर करण्यात आल्यावर त्या घटनेची एक एक नक्कल प्रत्येक संस्थानचें मत अजमा-

वण्याकरितां व मान्यता मिळविण्याकरिता पाठविण्यात आली. एकराष्ट्रीयत्वाखाली आपल्या हातांत चालू असलेली सत्ता एकदम सोडण्यास बहुतेक संस्थानाची मने कचरत होती. इतकेच नव्हे तर एकराष्ट्रीयत्वाचे तत्वावर केलेला कायदा सर्वांना सुखकर होईलच असाही अद्यापि त्यांना भरंवसा वाटत नव्हता. ग्रेट ब्रिटनची सत्ता नाहीशी होऊन वसाहती स्वतंत्र संस्थाने बनलीं, इतक्यावरच त्यांची स्वातंत्र्याची तहान भागली होती. इ. स. १७८७ च्या साधारण देशभक्तास एकराष्ट्रीयत्वाची नीटशी कल्पना नव्हती, त्यामुळे एक राष्ट्रीयत्वांत काय जोम असतो ते केवळ विचारी अशा थोड्याशा मुत्सद्याखेरीज इतरास पटणे त्यावेळीं तरी शक्य नव्हते.

या नवीन संघटणेबरोबर पक्षभेदाचे राज्यकारणास अमेरिकेत सुरुवात झाली असे ह्मटले पाहिजे. फेडरल घटणेचा पुरस्कार करणाऱ्या पक्षाला फेडरॅलिस्ट असे ह्मणूं लागले व दुसऱ्या पक्षास अँटी फेडरॅलिस्ट किंवा रिपब्लिकन ह्मणूं लागले. फेडरल पक्षाने आपले फेडरलिस्ट नावाचे एक नियतकालिक सुरू केले. त्यात अँटी फेडरॅलिस्ट पक्षाचे शंकास बिनतोड अशी उत्तरे प्रसिद्ध होऊं लागलीं. या नियत कालिकाचे चालक मॅडिसन, जे, व हॅमिल्टनसारखे राजनीतिशास्त्र प्रवीण लोक होते हॅमिल्टन यास तर अमेरिकेतील राजनीतिशास्त्राचा आद्यगुरु समजण्यात येते. त्याने ज्या मजबूत पायावर हल्लींच्या युनायटेड स्टेट्सची राज्य घटना तयार केली तिच्याबद्दल युनायटेड स्टेटस त्याची सदैव ऋणी राहिल यांत शंका नाही.

निरनिराळ्या संस्थानांतील परिस्थिती अजमावितां अद्यापि नवीन घटनेस बराच विरोध दिसून येत होता. फेडरॅलिस्ट नियतकालिकानें जरी मतप्रसाराची पुष्कळ खटपट केली होती व तिला ठिकठिकाणीं कल्पनेबाहेर यश येत होते, तरी केवळ दुराग्रहामुळे अनुकूल नसणाऱ्या लोकांची संख्या कांहीं कमी नव्हती. आणि दुराग्रहाचें समाधान कशानें करावयाचें ?

प्रथम डिलावेर संस्थानानें आपली बहुमताने पूर्ण संमति जाहीर केली. पेनसिलव्हेनियानें नंतर थोड्याच दिवसांनी आपली संमति जाहीर

केली. पेन्सिलव्हॅनियात दोन तृतीयांश लोक फेडरेशनला अनुकूल झाले तर एकतृतीयांश प्रतिकूल होते. त्यानंतर न्यू जर्सेने एकमताने आपले अनुकूल मत जाहीर केले त्यानंतर जार्जिया व कनेक्टिकट यांनी अनुकूल मते दिली. मॅसच्चुसेटमध्ये नवीन घटनेस पूर्ण विरोध दिसूं लागला. तेथील लोक देशाभिमानांत कोणासही हार जाणारे नव्हते लोकानुवर्ती राजकारभाराचें तत्वही त्यांना पूर्ण सम्मत होते पण प्रेसिडेंटचे हाती सर्व सत्ता गेल्यास तोही राजाप्रमाणे प्रबल होऊन बसेल अशी त्यांना शंका येत होती. विचारे नुकतेच एका एकतंत्री राजाचे तावडीतून बाहेर आले असल्यामुळे त्यांना वाटत असलेली भीति निराधार आहे असे ह्मणता येण्यासारखे नव्हते. तेथेही पुष्कळ स्वमतप्रसार करून मते मोजण्यात आलीं. व अगदी थोड्याच अधिक मतांनी नवीन घटनेस एकदाची संमति मिळाली. यानतर न्यू हॅमशायरने अगदी थोड्याशा मताधिक्याने आपले अनुकूल मत जाहीर केले. अनुकूल मत देणारे हे नववे संस्थान मिळाल्यामुळें नवीन राज्यघटना कायद्याप्रमाणे अमलात येण्यास अडचण राहिली नाहीं. खुद्द व्हर्जीनियात सुद्धा एकमत झाले नाही. तेथे वॉशिंग्टन व मॅडिसन अनुकूल होते पण जेफरसन व पॅट्रिक हेनरी प्रतिकूल होते. शेवटी तेथेही अल्प मताधिक्याने अनुकूलता मिळाली.

ऱ्होड आयलंड व नॉर्थ कॅरोलिना ही दोन संस्थाने विरुद्ध होतीं. पण नॉर्थ कॅरोलिनामध्ये दुसरे वेळी मत अजमावितां तें अनुकूल झालें. ऱ्होड आयलंड सर्वांपेक्षां कमी महत्वाचे संस्थान होते. पण हटवादीपणांत त्याच्या तोडीला कोणी उतरले नाहीं. शेवटी त्या संस्थानातील दोन शहरांनी अनुकूल मत देताच ती शहरे वेगळी करून मॅसच्चुसेटला जोडण्याची धमकी देण्यात आली व दुसरा भाग कनेक्टिकटला जोडण्याची धमकी देताच, आपले अस्तित्वच नाश पावत आहे असें पाहून तेथील जनता शुद्धीवर येऊन तिनें एकदाचे फेडरल घटनेला अनुकूल मत दिले. अशा रीतीनें कॅनडाखेरीज इतर सर्व आंग्ल भाषा बोलणारे लोकांचे एक नवीन राष्ट्र युनायटेड स्टेट्स ऑफ अमेरिका, या नांवानें जन्मास आलें.

ही जी नवीन राज्यघटना अमलांत आणण्यांत आली तिचीं मूलतत्वे तरी काय होती हे जाणण्याची उत्सुकता सर्वांस असणें स्वाभाविक आहे, ह्मणूनच तिचे थोडक्यांत दिग्दर्शन केलें पाहिजे.

मुख्य राजसत्तेचे तीन विभाग केले होते. ते येणेप्रमाणें कायदे करण्याची सत्ता, अंमलबजावणीचा अधिकार, न्याय देण्याचा अधिकार.

कायदे करण्याची सत्ता कांग्रेसला देण्यात आली होती, कांग्रेसमध्यें सीनेट व प्रतिनिधी अशी दोन अंगे होती. सीनेटचे सभासद प्रत्येक संस्थानचे कायदेमंडळ निवडून देई व त्याचा अधिकार सहा वर्षे चालावयाचा होता. प्रत्येक संस्थानचे–मग ते लहान किंवा मोठे असो–दोनच सभासद सीनेटमध्ये असत प्रतिनिधी मंडळातील सभासद प्रत्येक संस्थानेच लोकांतर्फे निवडले जात. व त्यांची संख्या संस्थानचे संख्येप्रमाणे कमीअधिक असे. प्रतिनिधी मंडळाच्या सभासदांची मुदत दोन वर्षांची असे सर्व देशाकरिता कायदे करण्याची सत्ता कांग्रेसला होती व कोणत्याही सार्वजनिक महत्वाचे बाबीत कांग्रेसला हात घालता येई.

युनायटेड स्टेटसचे ज्या अधिकाऱ्यास अंमलबजावणीची सर्व सत्ता असे, त्यांची निवडणूक प्रत्येक चार वर्षांनी होई. ती निवडणूक प्रत्येक वसाहतीतील लोकांनीं त्या कामाकरितांच खास निवडून दिलेले लोक करीत. तेच लोक युनायटेड स्टेटसच्या उपाध्यक्षाचीही निवडणूक करीत. प्रत्येक संस्थानने अध्यक्षांच्या निवडणुकीकरितां निवडून दिलेल्या लोकांची संख्या तेथील सीनेटर व प्रतिनिधी मंडळाइतकीच असे. अध्यक्षाचे मुख्य काम ह्मणजे कायदेमंडळाने केलेल्या कायदेकानूंची नीट अम्मलबजावणी होते आहे की नाहीं हे पाहण्याचें आहे. अध्यक्षास लष्कर व आरमार यांचेवरील प्रमुख अधिकार आहे. कायदेमंडळाने केलेल्या कोणत्याही कायद्यास फेटाळण्याचा अधिकार अध्यक्षास आहे पण ज्यावेळी दोन तृतीयांश बहुमतानें एखादा कायदा पास होतो तेथे अध्यक्षांस तसा अधिकार नाहीं. मंत्रिमंडळाने सभासद व परदेशांत

वकील नेमण्याचा अधिकार अध्यक्षास आहे. मात्र त्या नेमणुकीस सेनेटची अनुमति पाहिजे. त्याचप्रमाणे तह घडवून आणण्याचा अधिकारही सीनेटच्या अनुमतीने अध्यक्षास आहे. उपाध्यक्ष हा नेहमी सीनेटचा अध्यक्ष असतो. पण अध्यक्ष मृत झाला असल्यास, त्याने राजीनामा दिल्यास, अथवा त्याला नोकरविरून बडतर्फ केल्यास तात्पुरते अध्यक्षाचे अधिकार उपाध्यक्षाकडे येतात.

या फेडरल राज्यघटनेप्रमाणे न्यायखात्याची मुख्य जबाबदारी सुप्रीम कोर्टाकडे सोपविली आहे त्याचे हाताखाली दुय्यम कोर्टे असतात न्याय्यखात्यांतील मुख्य अधिकाऱ्यास चीफ जस्टिस् असे ह्मणतात युनायटेड स्टेट्सचे कायद्याविरुद्ध, राज्यघटनेविरुद्ध, व तहाविरुद्ध चौकशी करणे न्यायकोर्टाचे अमलात येते फक्त सरकारी अधिकाऱ्याचे दुर्वर्तनाशिवाय इतर कोणत्याही गुन्ह्याची ज्यूरीने चौकशी होऊं शकते. राजद्रोह फक्त युनायटेड्स्टेट्सशी प्रत्यक्ष युद्ध केल्यास अथवा युनायटेडस्टेट्सच्या शत्रूंस मदत केल्यास होतो तसेच दोन लायख साक्षीदारांशिवाय राजद्रोहाचा गुन्हा शाबीत करतां येत नाही.

प्रत्येक संस्थानने ठेवलेल्या रेकॉर्डवर पूर्ण विश्वास ठेविला जातो, तसेच एका संस्थानच्या मनुष्यास दुसऱ्या कोणत्याही संस्थानमध्ये स्वत च्या संस्थानाइतकेच मूलभूत हक्क उपभोगता येतात जी नवीन संस्थानें या फेडरेशनमध्ये दाखल करिण्यात येतील त्यानाही जुन्या संस्थानाइतकेच हक्क व जबाबदारी प्राप्त होईल. प्रत्येक संस्थानामधील राज्यव्यवस्था लोकमतानुवर्ती असेल चाल राज्यव्यवस्थेतील काही कलम फिरवावयाचे झाले तर, त्याला सीनेटच्या व प्रतिनिधी मंडळाच्या दोन तृतीयांश इतके बहुमत पाहिजे व प्रत्येक संस्थानातल्या कायदेमंडळांतील तीन चतुर्थांश बहुमत पाहिजे. वरील पद्धतीने आतापर्यंत पंचवीस उपसूचना पास झाल्या आहेत त्यांत धार्मिक स्वातंत्र्य, अध्यक्ष व उपाध्यक्ष यांच्या नेमणुकीच्या पद्धतीत सुधारणा, गुलामगिरीची बंदी वगैरे महत्वाच्या उपसूचना आहेत.

## युनायटेडस्टेटस्चा पहिला अध्यक्ष, जॉर्ज वॉशिंगटन—

युनायटेडस्टेटस्चे पहिल्या अध्यक्षाची निवडणूक फेडरल राज्यघटनेस अनुसरून व काँग्रेसने केलेल्या ठरावाप्रमाणे,इ.स. १७८९ च्या जानेवारी महिन्यातील पहिल्या बुधवारीं होण्याचे ठरले. या निवडणुकीकडे सबंध युनायटेडस्टेटस्चे लक्ष लागून राहिले होते. जॉर्ज वॉशिंगटनचे नाव पहिल्या अध्यक्षाचे जागी सुचविण्यांत आल्याबरोबर जिकडे तिकडे आनंदीआनंद झाला उपाध्यक्षाचे पद अडाम्स यास मिळाले

वॉशिगटन यास आपल्या निवडणुकीचा निकाल समजल्या नंतर तो न्यू यॉर्ककडे जाण्यास निघाला. त्याचे मार्गावर जिकडे तिकडे त्याचा जयजयकार होत होता मेरीलँड संस्थानाने त्याचे जॉर्ज टाऊन येथे जंगी स्वागत केले फिलाडेलफिया येथे एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलने व युनिव्हर्सिटीने त्याचे स्वागत केले सिन्सिनॅटी शहरातर्फेही त्याचे थाटाचें स्वागत झाले. ट्रेटन येथील लढाईत ज्या शूरवीराने जिवाकडे न पाहता लढून त्या शहराची मुक्तता केली तेथील नागरिकास या शूर योध्याचे स्वागत करण्यास केवढा बरे आनंद वाटला असेल?अमानपिक येथे त्याचे अभिनंदनार्थ मोठी कमान उभी करण्यात आली पांढरे शुभ्र पोषाक करून त्याच रस्त्यावर फुले पसरून कुमारिकानी आपले त्याच्यावरील प्रेम व्यक्त केले. अशा थाटामाटाने प्रवास करीत तो न्यू यॉर्क येथे येऊन पोहोचला, व आपल्या जबाबदारीचे हुद्यावर रुजू होण्याचे पूर्व तयारीस लागला.

तारीख तीस एप्रिल १७८९रोजी जार्ज वॉशिंगटनने,आपल्या राहत्या घरांतून मोठ्या समारंभाने निघून न्यू यॉर्क येथील वॉल स्ट्रीट नामक रस्त्यावर नवीन बांधलेल्या फेडरल हॉलमध्ये, प्रेसिडेंटचे अधिकार ग्रहण करण्याकरिता प्रवेश केला. तेथे मुद्दाम तयार केलेल्या जागेत उभे राहून चॅन्सलर लिव्हिंगस्टोन याने कथन केल्याप्रमाणे त्याने शपथविधि केला. शपथ–विधि होतांच लिव्हिंगस्टोनने नागरिकांकडे तोंड करून ' युनायटेड स्टेटस्चे अध्यक्षांना दीर्घायुष्य लाभो ' असा जयजयकार केला. त्या जयजयकाराचे आरोळीने सर्व शहर दुमदुमून गेले. तो दिवस सर्व नागरिकानी सणाप्रमाणे पाळला.

## कॉनफेडरेशन कीं फेडरेशन ?

नगरांत जिकडे तिकडे आनंदीआनंद दिसून येत होता. रस्त्यांतून व घरावरील गच्च्यांतून नागरिकांची गर्दी जमलेली दिसून येत होती. राष्ट्रिय निशाणे सर्व ठिकाणी फडकत होती. तोफांची सरबत्ती ऐकू येत होती.

त्यावेळी लोकप्रतिनिधिसभा व सीनेट ही दोन्हीही भरविण्यांत आली होती. शपथविधि व सार्वजनिक स्वागत आटोपताच वॉशिंगटनने सीनेटमध्ये प्रवेश केला व आपले प्राथमिक भाषण सुरू केले व अशा रीतीने फेडरल घटनेप्रमाणे नवीन राज्यकारभारास सुरुवात झाली.

**भाग पहिला समाप्त.**

# सूचि

# शुद्धिपत्र



| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १ | १६ | मॅडिट | मॅड्रिड |
| २ | २२ | इ. स. १८४६ | इ स. १४४६ |
| ३ | १० | नाावाने | नावाने |
| ४ | २० | मागलान | मागेलान |
| ६ | १ | गंठली | गाठली |
| ६ | २७ | हे | होता |
| ११ | २ | डिलावेट | डिलावेर |
| १४ | २३ | फसले | फसेल |
| १८ | ९ | बिटर्ना | ब्रिटनी |
| २२ | १३ | इंग्लिग | इंग्लिश |
| २३ | १ | फेच | फ्रेंच |
| २७ | ५ | स्थाने | संस्थाने |
| २९ | १० | पोर्टबेली | पोर्टोबेलो |
| ३० | २५ | जामिनीहीर्हा | जमिनीही |
| ३२ | १० | हा | ही |
| ३३ | २२ | ततके | तितके |
| ३३ | २६ | नसल | नसेल |
| ३६ | ४, १३ | राबर्टविल्यम | विल्यम राजर्स. |
| ४८ | १२ | त्रियाचा | त्रियांचा |
| ५८ | ८ | प्रेसब्रिटोरयन | प्रेसबिटेरियन |
| ६२ | १३ | समजुतीनेही | समजुतीही |

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ८० | १८ | ओटारिओ | ओटारिओ |
| ८१ | २४ | मिसिसिपाचे | मिसिसिपीचे |
| ८२ | २७ | प्रदशापर्यंत | प्रदेशापर्यंत |
| ८२ | २७ | रस्त्यांचा | रस्त्यांची |
| ८२ | २८ | तयारीत | तयारी |
| १०२ | १० | भाढवल | भाडवल |
| १११ | २ | इंग्लंड | इंग्लंड |
| १११ | १० | पर्यवसाग | पर्यवसान |
| १२१ | १९ | केकेल्या | केलेल्या |
| १२२ | १५ | फायद | फायदा |
| १२८ | २२ | मूलभून | मूलभूत |
| १३४ | २५ | पावून | पाठवून |
| १३५ | ७ | माडली | माजली |
| १३७ | ३ | घातल | घातला |
| १४२ | १६ | लानले | लागले |
| १४६ | १ | क्किबे | क्किबेक |
| १५३ | २४ | आपल्य | आपल्या |
| १६१ | १६ | नेलेले | गेलेले |
| १६४ | ४ | शूल्डर | शूलर |
| १६८ | १२ | हात | होत |
| १७० | ७ | फॅकलिन | फ्रॅंकलिन् |
| १७२ | २ | जगरल | जनरल |
| १७७ | १२ | पर्तताचे | पर्वताचे |
| १७७ | २२ | हेसिमान | हेसियन |

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- | --- |
| १७८ | १ | ध्या स्वातंत्र्य | स्वातंत्र्य घ्या |
| १८७ | २८ | दिल | दिला. |
| १८९ | १३ | करूग | करून |
| १८९ | १६ | ऑकिसरांचे | ऑफिसराचे |
| १८९ | २१ | पितळी तोफा | बंदुका |
| १९६ | १ | यका | नको |
| १९६ | २७ | मुलभ | सुलभ |
| २०४ | १६ | लाकार्चा | लोकांची |
| २१२ | १ | नाटाचे | नोटांचे |
| २१४ | १२ | मनाव | मनावर |
| २१६ | १५ | रहिवाश्याच | रहिवाशाच्या |
| २२० | ९ | विक्रीया | विक्रया |
| २२२ | ९ | जनिक | जानिक |
| २२४ | १२ | मर्वस्वी | सर्वस्व |
| २२४ | २२ | राज्यव्वत्रस्थेत | राज्यव्यवस्थेत |
| २३० | ८ | विचारे | बिचारे |
| २३२ | ५ | नोकरविरून | नोकरीवरून |

